


राणी सगुणाबाईंची दासी पुतळा सगुणाबाईंच्या पेटत्या चितेला साक्ष ठवून
राणी सकवारबाईंवर सूड घेण्याची शपथ घेत आहे. [ पृ ९




[redacted] किंमत [redacted] २ रु.

'कादंबरीमय पेशवाई"मधील
आजवरच्या कादंबऱ्या

पेशवाईचें पुण्याहवाचन
पेशवाईची प्राणप्रतिष्ठा
पेशवाईचें ध्रुवदर्शन
पेशवाईचा ध्रुव ढळला?
पेशवाईचा पुनर्जन्म
पेशवाईचें पुनर्वैभव
पेशवाईचा दरारा
पेशवाईतील दुर्जन
पेशवाईतील पश्चिमदिग्विजय
पेशवाईतील धर्मसंग्राम
पेशवाईतील उत्तरदिग्विजय
पेशवाईवरील गण्डान्तर
पेशवाईचें मन्वंतर
पेशवाईचा पुनर्विकास
पेशवाईचा मध्यान्ह

* *



* *

प्रकाशक -बळवंत विष्णु परचुरे, परचुरे पुराणिक आणि मंडळी,
बुकसेलर्स व पब्लिशर्स, माधवबाग, मुंबई नं. ४
मुद्रक.-विठ्ठल वामन हडप, आदर्श मुद्रणालय, सातारा सिटी.

'पेशवाईचा मध्यान्ह'

# ऐतिहासिक पाया

—-.*.—

" शाहूमहाराजांना दुःखसागरात लोटून राणी सगुणाबाई ता. २५-८-१७४८ रोजीं कैलासवासी झाली. सगुणाबाईच्या मृत्यूनें राणी सकवारबाईचा सापत्नभाव ओसरला. परतु महाराजाच्या शेषायुष्यात दत्तकाचा प्रश्न त्याच्या राशीला नेटानें आला. नानासाहेब पेशव्यानीं पेशवाईचीं वस्त्रें धारण करण्याच्या सुमाराला कोल्हापुरकर संभाजीराजाशीं एकीचा गुप्त करार केला होता. सातारा व कोल्हापूर ह्या दोन्ही राज्याची एकी करण्याचें पेशव्याचें धोरण यशस्वी झालें असतें तर त्यामुळें मराठी साम्राज्याचें निःसशय हित झालें असतें. परंतु शाहूमहाराज व संभाजीराजे याचा आपसातील तीव्र बेबनाव कमी होण्याचीं चिन्हें दिसेनात. राणी सगुणाबाईची चुलत बहीण रघूजी भोंसल्याला दिलेली होती. तिचा मुलगा मुधोजी हा दत्तक घ्यावा असा सगुणाबाईचा शाहूमहाराजाना मूळपासून आग्रह होता. मुधोजी भोंसले आपल्या सवतीच्या तंत्रानें वागेल व आपलें पट्टराणी या नात्याचें महत्त्व कमी होईल या भयानें सकवारबाई प्रथम मुधोजीला दत्तक घेण्याच्या विरुद्ध होती. परतु सगुणाबाई कालवश होताच तिनें मुधोजीला दत्तक घेण्याचें ठरविलें, व पेशव्याचे प्रतिस्पर्धी (जगजीवनराव प्रतिनिधि, यमाजी शिवदेव वगैरे) त्या कामीं तिला सामील झाले...हा प्रकार ताराबाईच्या कानीं जाताच तिनें गडावरून आपला कारभारी महाराजाकडे पाठवून विचारिलें, 'शिवाजीचा वंशज तुमच्या गादीवर बसण्याला लायक असा असताना तुम्ही दत्तक काय म्हणून घेता?' यावर महाराजांनीं खुलासा विचारला. तेव्हा ताराबाईनें खुलासा केला, माझा पुत्र शिवाजी वारला तेव्हा त्याची राणी भवानीबाई गरोदर होती. पतीच्या निधनानतर तीन महिन्यानीं तिनें पन्हाळ्यावर पुत्राला जन्म दिला. कोल्हापूरकरांच्या काकदृष्टींतून त्या मुलाचा बचाव करण्यासाठीं मी भवानीबाईला सल्लामसलत देऊन तो पुत्र एका विश्वासू रजपूत जोडप्याच्या स्वाधीन करण्यास सांगितलें. रजपूत स्त्री नुक्तीच प्रसूत होऊन तिचें अपत्य गेलें होतें. ती राजपुत्राला

पाजून त्याचा प्रतिपाळ करण्याला तयार झाली. त्याच रात्रीं मीं राजपुत्राला बरीच अफू दिली, त्यामुळे तो रात्रभर मृतवत् झोपीं गेला मध्यरात्रीच्या सुमाराला मी व भवानीबाई पूर्वसंकेतानुसार राजपुत्राच्या निधनाबद्दल ओक्साबोक्शी रडूं लागलो. पहारेकरी काय गडबड आहे असे विचारावयाला आला, तेव्हा तान्हा राजपुत्र वारल्याचें आम्ही त्याला सांगितले नंतर राजपुत्राला पुरण्याविषयीं मी संभाजीची परवानगी मिळविली त्या निमित्तानें मी बाहेर गेल्ये, तेव्हाच अफूच्या गुंगीत असलेल्या राजपुत्राला रजपूत स्त्रीच्या हवालीं केलें. लगेच मी एक कापड घेऊन त्यात एक भाकरी व दोन बळी दिलेलीं कोंबडीं गुंडाळली, व तें गाठोडे पन्हाळ्याच्या उतरणीवर एका जागीं पुरून टाकले. अशा प्रकारे मीं राजपुत्राच्या प्रेताला मूठमाती दिली, असे माझ्या पाठीवर असलेल्या पहारेकऱ्याना चकविलें... दरम्यान् त्या रजपूत जोडप्याने राजपुत्राला बावडे गावीं नेले, व माझ्या सांगीवरून सर्व प्रकार भगवंतराव अमात्याना निवेदन केला पांच वर्षेपावेतो अमात्यानी त्याना द्रव्यसाह्य केले. दरम्यान् राजपुत्र जिवंत आहे अशी बातमी राणी राजसबाईच्या कानीं गेली व तिने आपल्या त्या पुतण्याचा कसून शोध चालविला. तिच्या काकदृष्टींतून राजपुत्राचा बचाव करण्यासाठीं त्या रजपूत जोडप्याने राजपुत्राला घाटाखालीं कोंकणात पळविले, व तेथे दोन वर्षेपावेतो गुप्तपणे वास्तव्य केले. तेथें राजपुत्राची दूधमाय रजपुतीण मेली. मग रजपुताने राजपुत्राला पानगाव येथे नेऊन दर्याबाई निंबाळकर हिच्या स्वाधीन केले. तिने त्याला तुळजापुराजवळच्या खेड्यातील एका गोंधळ्याच्या घरात लपविलें. दोन वर्षांनंतर तो रजपूत वारला पण राजपुत्र पानगावींच राहिला, व अद्यापिही तो तेथेंच आहे ' महाराजाचा या हकिकतीवर विश्वास बसेना त्यांनीं ताराबाईला ह्याला साक्ष कोण आहे असे विचारलें. तिनें अमात्याचें नाव पुढें केलें. अमात्य येताच महाराजांनीं त्याना आडवे तिडवे प्रश्न विचारून खात्री करून घेतली. तथापि आणखी खातरजमा करून घेण्यासाठी त्यांनीं जगजीवनराव प्रतिनिधींना सांगितलें की, अमात्याना संगमावर घेऊन जा व तेथे ह्या सर्व निवेदनाचा कृष्णाजल हातीं घेऊन शपथेवर पुनरुच्चार करावयाला लावा. त्याप्रमाणेही भगवंतरावानीं केले. तेव्हा मात्र महाराजाचे समाधान झाले व त्यानी गोविंदराव चिटणिसाना बोलावून सांगितलें कीं मासाहेबाचें म्हणणें खरे आहे. आता

दत्तकाचा विचार करण्याचें कारण नाहीं. ताराबाईनें त्या राजपुत्राला त्याच्या आजोबाचें राजाराम हे नाव ठेवले होतें. परंतु ते तिच्या पतीचे नाव असल्याने तिला उच्चारता येत नसे, म्हणून ती त्याला रामराजा म्हणे. सकवारबाई दत्तक पुत्राची माता होऊन राजसत्ता उपभोगण्याला हपापलेली होती. तिला हा प्रकार ऐकून संताप आला . ."

[किंकेड–पारसनीस कृत 'ए हिस्टरी ऑफ दि मराठा पीपल्' भाग २ रा.]

× × ×

[ याखेरीज सकवारबाईनें नानासाहेब पेशव्याना ठार मारण्याचा डाव मुतालिकाच्या साह्याने रचिला, मुतालिकानीं चिटणिसाच्या व्यक्तिद्वेषाला पडून पेशव्याऐवजी चिटणिसावरच तुळाजी खिदमतगार हा मारेकरी घातला, पण तो डाव फसून तुळाजी मारला गेला, सकवारबाईने महाराजाना रंगमहालात चौकीपहाऱ्यात ठेवून पेशवे, चिटणीस वगैरेना भेटीची बंदी केली, पेशव्याना विरोध करण्यासाठी प्रतिनिधि वगैरेंच्या साह्याने गुप्तपणे सैन्य जमविले व कोल्हापूरकराशीं फितूर केला, मुधोजी भोसल्याला दत्तक घेण्याचा प्रयत्न केला तो रघूजी भोसल्याच्या उदासीनत्वामुळे फसला, पेशव्यानींही महाराजाच्या अनुमतीने प्राप्त प्रसंगाला तोंड देण्यासाठी पस्तीस हजार सैन्य महाराजाच्या मरणसमयीं जमा केलें होतें, ताराबाई महाराजाच्या मृत्युसमयी त्याना व पेशव्याना अनुकूल झाली होती, वगैरे सर्व ऐतिहासिक पडताळे किंकेड पारसनीस कृत इतिहासात व सरदेसाई कृत मराठी रियासत मध्यविभाग २ यात एकत्र सापडतील. महाराजाच्या अंतकाळाचें व रामराजाच्या राज्यारोहणाचे ह्या कादंबरींतील वर्णनही या दोन ग्रंथात दिलेल्या माहितीला धरून व इतर अनेक पुराव्याचा समन्वय करून यथावत् करण्यात आलें आहे.]

× × ×

राणी सगुणाबाईचा मृत्युः–ता. २५ आगस्ट इ. स. १७४८.

× × ×

शाहूमहाराजाचा मृत्युः–ता. १५ डिसेंबर सन १७४९. [ किंकेड–पारसनीस याच्या मतें महाराजाचा मृत्यु रात्रौ झाला. नानासाहेब पेशव्याच्या रोजनिशीप्रमाणे त्या दिवशीं मार्गशीर्ष व॥ ३ भृगुवारीं पुष्यनक्षत्र, शके १६७१ शुक्ल संवत्सरीं सकाळीं चार घटका दिवसास (महाराजानीं) विष्णुलोक केला ]

प्रस्तुत कादंबरींत शाहूमहाराजांनीं नानासाहेब पेशव्यांना अंतसमयीं एका मागून एक अशीं दोन आज्ञापत्रें अथवा याद्या दिल्याचा उल्लेख आहे. तीं पुढीलप्रमाणें.

**यादी नं. १** " राजमान रा बाळाजी प्रधान पडित यास आज्ञा. तुम्हीं फौज धरनें. सर्वांस आज्ञा केली त्यांच्या दैवीं नाहीं. महाराजांस लिखनें जालें नाहीं. बरे होत नाहींत. राज्यभार चालला पाहिजे. तर पुढें वश बसवनें. कोलापूरचे न करने. चिटणिसास सर्व सागितलें तसें करनें. वश होईल त्याच्या आज्ञेत चालून राजमडळ चालवने. चिटणीस स्वामींचे विश्वासू. त्याच्यातुमच्या विचारें राज्य राखनें. वश होईल तो तुमची घालमेल करनार नाहीं. सुज्ञ असा.

**यादी नं २** राजमान रा बळाजी पडित प्रधान आज्ञा जे. राज्यभार तुम्ही चालवाल हा भरवसा स्वामींस आहे. पहिलें सागितलें खातरजमा, ती चिटणिसानी आढळ केली. तुमचे मस्तकीं हात ठेविला आहे. वश होईल तो तुमचें प्रधानपद चालवील. करील अतर तर शपथ असे. त्याचे आज्ञेंत चालून सेवा करनें. राज्य राखनें. बहुत काय लिहिनें. सुज्ञ असा.

# भूमिका

'पेशवाईचा मध्यान्ह' ही 'कादबरीमय पेशवाई' मालेंतील पंधरावी कादबरी होय. या मालेंतील चौदाव्या 'पेशवाईचा पुनर्विकास' कादबरीची अखेर, आणि प्रस्तुत कादबरीचा प्रारभ यात जवळ जवळ अतर नाहींच. किंबहुना ह्या दोन्ही कादबऱ्या एकत्र एकाच ग्रथरूपाने प्रसिद्ध झाल्या असत्या तर पूर्वार्ध व उत्तरार्ध म्हणून शोभल्या असत्या. परतु तसें केलें नाहीं याला कारण विस्तारनियमन हें तर एक होतेच, पण शिवाय दोन्ही कथानकाचे गाभेही जमिनींतून एकाच मुळींतून उगवलेल्या दोन अकुराप्रमाणे तत्त्वतः एक पण प्रत्यक्षतः अलग अलग असे आहेत. नानासाहेब पेशव्याना पेशवाई-पदावरून भ्रष्ट करण्याचा व अज्ञातवासात असलेल्या रामराजाचा वध करून राजसत्ता बळकावण्याचा सकवारबाई व तिचे हस्तक याचा कट हा 'पेशवाई-चा पुनर्विकास' मधील कथानकाचा आत्मा आहे, तर प्रस्तुतच्या कादबरीचा आत्मा सकवारबाईची अघोर राज्यतृष्णा व त्या तृष्णेपायीं शाहूमहाराजाच्या निधनापावेतों व रामराजाच्या राज्यारोहणापावेतों घडलेले अनर्थ हा आहे.

मागील चौदाव्या कादबरींत आरभिलेल्या नव्या उपक्रमानुसार प्रस्तुत कादबरीच्या कथानकाचा 'ऐतिहासिक पाया' व शेवटी कथानकातील 'ऐति हासिक व्यक्तींची ओळख' अलाहिदा देण्यात आली आहेच. कथाप्रसंगाची ऐतिहासिकता अजमावण्याला स्थूलमानानें हें पुरेसें होईल व टिपाची उणीव भासणार नाहीं अशी आशा आहे.

नानासाहेब पेशव्याचा कार्यव्याप एवढा दाडगा होता, कीं त्याला मराठ्यां-च्या इतिहासात तुळा नाहीं त्याना पेशवाई प्राप्त झाल्यापासून तों शाहू महा-राजाच्या निधनापावेतों आठ वर्षांच्या काळात आपले बधु चिमाजीअप्पा व पुतण्या सदाशीवराव भाऊ याच्या साह्याने नुसत्या उत्तरेंतच सुरंजभेलशाची स्वारी (इ. स. १७४०–४१), उत्तर हिंदुस्थानातील दुसरी मोठी स्वारी (इ. स. १७४१–४३), रघूजी भोंसल्यावर आक्रमण व युद्धप्रसग (इ. स. १७४२–४३), ओर्च्छावर स्वारी, ओर्च्छाचा पाडाव व झाशीची स्थापना (इ. स. १७४२), याशिवाय माळव्याच्या सुभेदारीची बादशहाकडून प्राप्ती,

वगैरे अनेक अचाट पराक्रमाचीं कृत्यें पार पाडलीं. कर्नाटकातही त्याप्रमाणेंच दिग्विजय त्यानीं केले. त्या सर्वांचें साकल्येंकरून कथारूपानें विवरण करावयाचें म्हटल्यास 'शेषदेखील सहस्र मुखानीं वर्णन करता करता थकला' अशी कबुली द्यावी लागेल, व जितक्या कादंबऱ्या तीं प्रतापगीतें गाण्यासाठीं लिहाव्या तितक्या थोड्याच वाटतील तथापि वरच्याप्रमाणें अनेक अप्रतिम दिग्विजय जरी नानासाहेबानीं केला व हिंदुपदपादशाही हें नाव, दरारा, वैभव व विस्तार ह्या चतुर्विधतेने सार्थ केलें, तरी ते सर्व पराक्रम पित्याप्रमाणे वीरोचित पराक्रम नसून 'न धरी शस्त्र करीं मी गोष्टी सागेन युक्तिच्या चार' या स्वरूपाचे होते आणि 'कादबरीमय पेशवाई' मधील कादबऱ्या तर विशिष्ट प्रसगगर्भ व पेशवाईचा उगम–उत्कर्ष–अपकर्ष सुसगतीने निवेदन करण्यास्तव विरचिल्या जातात म्हणून नानासाहेबाच्या एथवरच्या आठ वर्षांच्या कारकीर्दींतील अत्यत महत्त्वाच्या परतु दूरवर्ती प्रसगाकडे कथानकाचा ओघ मीं वळविला नाहीं. तथापि पानिपतचा पूर्वरग, पानिपत व पानिपतचा उत्तररग या निमित्तानें तीं मराठ्या पेशव्याची यशापयशात्मक प्रतापगीतें वाचकाना ऐकविलीं जातीलच.

'पेशवाईचा पुनर्विकास' व 'पेशवाईचा मध्यान्ह' ह्या दोन कादबऱ्या पेशवाईतील मराठी राजसत्तेच्या अतस्थ बखेड्याचे चित्रण करण्यात खर्ची पडल्या आता 'पेशवाईचे दिव्य तेज' ही या मालेतील सोळावी कादबरी यथाकालीं प्रसिद्ध होईल

**आदर्श वाङ्मय प्रकाशन,**
सातारा, ता. १-४-१९३९

**विठ्ठल वामन हडप**

# पेशवाईचा मध्यान्ह

## प्रकरण १ लें

## चितेसमोर प्रतिज्ञा

श्रावण शु. ११ शके १६७० या दिवशीं सुमारें दोन प्रहर रात्रीच्या एकान्तवेळीं माहुली क्षेत्रात कृष्णाकाठीं एक अंगारमय चिता सरसरत होती. सभोंवार सर्वत्र स्मशानशातता पसरली होती. मधून मधून पावसाचे चार तुषार आकाशातून खाली जमिनीवर शिंपडले जात, परंतु त्या शिंतोड्यानीं ती चिता थोडीच विझते! उलट त्यामुळे चितेची रसरस जास्त वाढतच होती. एरव्हीं वास्तविक ती चिता त्या वेळेपावेतों बहुतेक पिचून जावयाची, व दिसलेच तर पेटत्या निखाऱ्याचे पिचून पिचून शिल्लक उरलेले काळोख्या रात्रीं लुकलुकणाऱ्या काजव्यासारखे अवशेष चितारक्षेच्या ढिगाऱ्यातून लुकलुकताना दिसावयाचे. पण अग्नीने त्याना प्रज्वलित करावे व पावसाच्या शिंतोड्यानीं त्याना विझविण्याचा फोल प्रयत्न करावा, असा क्रम मधून मधून एकसारखा सुरू असल्याने त्या चितेतील निखाऱ्याचा रसरशीतपणा दीर्घ काळपावेतो कायम टिकला होता.

तेथें त्या पेटत्या चितेपाशीं कोणी नाहीं म्हणावयाला एक श्वान मात्र उबाऱ्यासाठीं कीं काय अमळ दूर वाळूत माड घालून बसले होते.

श्वानाचें कर्णेंद्रिय व घ्राणेंद्रिय फार तीव्र असते म्हणतात. त्या श्वानान मध्येंच एकदा कान झाडून व वास घेण्याचा प्रयत्न करीत माड उचलून मागें दूरवर डोकावून पाहिलें. तों दुरून कोणीतरी येत असल्याचा भास त्याला झाला. भास कसला तो! ती खरोखरच कोणीतरी व्यक्ति चितेच्या अनुरोधाने येत होती.

ती व्यक्ति आणखी अमळ पुढे आल्यावर–तेथे जर कोणी माणूस त्यावेळीं असतें, तर ती कोणी मराठा तरुणी असल्याचे त्या पाहणाराला दिसून आलें

असतें. ती तरुणी त्या श्वानाला पाहतांच क्षणभर दूरवर थबकून उभी राहिली. श्वानानेंही प्रथम त्या तरुणीवर आपल्या स्वभावधर्मानुसार तोंड टाकण्याला कमी केलें नाहीं.

पण काय चमत्कार ! काहीं क्षणानतर ती तरुणी त्या श्वानाच्या भुकण्याला न जुमानता तशीच चितेच्या अनुरोधानें पुढें येऊ लागली, व श्वानही तिची ओळख पटल्यामुळेच कीं काय, भुकावयाचें थाबून उलट तिला सामोरें गेलें व शेंपूट हलवीत तिचे पाय चाटण्याला सुरुवात केली.

त्या तरुणीनें त्या श्वानाला उचलून हृदयाशीं कवटाळीत म्हटलें, " राई ! धन्य तुझ्या इमानदारीची ! धाकट्या आईसाहेबाना तू त्याच्या मरणानतर-देखील विसरली नाहींस. "

राईला त्या तरुणीचे ते बोल कळले कीं काय न कळे. तिनें शेंपूट हलवीत आपल्या भाषेत त्या व्यक्तीशीं काहींतरी सभाषण केलें.

" समजलें—समजलें. पण राई ! आता शोक करून काय उपयोग ! आपल्या धाकट्या आईसाहेब आपणाला सोडून देवाघरीं गेल्या त्या आता माघाऱ्या थोड्याच येणार आहेत ! "

एवढें बोलून त्या तरुणीनें राईला खालीं ठेवलें व चितेच्या अनुरोधानें पावलें उचललीं. राईही तिच्या मागोमाग चालू लागली.

" वेडे ! तू माघारी जा. तूं माझ्याबरोबर कोठवर येणार ? " एवढें बोलूनही राई माघारी वळेना असे पाहून ती तरुणी पुन्हा तिला उचलून हृदयाशीं कवटाळीत स्वतःशीं म्हणाली, " हे एक यःकश्चित् जनावर. पण याच्या ठिकाणीं जितकें ज्ञान आहे, तितके—त्यातील अणुरेणु इतकेंदेखील ज्ञान आम्हा माणसाच्या अगीं असू नये ना !... " बोलता बोलता त्या तरुणीनें पुन्हा एकवार सभोंवार निरखून पाहत राईला खालीं ठेवून म्हटलें, " बाई ! तूं जा कशी ! मला माझ्या पापाचे प्रायश्चित्त घेण्याच्या कामीं तुझा अडथळा होतो आहे. "

त्या मुक्या जनावराला त्या तरुणीशीं बोलण्याला वाचा थोडीच होती ! पण ती तरुणी पुढें चालली, तिच्या मागून शेंपूट हलवीत राई चालली. त्या व्यक्तीचें तिकडे लक्ष्य नव्हतें. तिनें मुद्दाम तिकडे लक्ष्य दिलें नाहीं असें नाहीं. पण तिच्या मनात भावनाचा एवढा हलकल्लोळ माजला होता कीं त्या गर्दीत

बाह्योपाधींचें यथावत् अवधान तिला कोठून राहावयाला! ती तरुणी त्या रसरसत्या चितेपाशीं जाऊन उभी राहिली व चितेकडे पाहून नमस्कार करून स्वतःशीं उद्गारूं लागली, "पुण्यपतिव्रता आईसाहेब! मला चाडाळणीला आपलें जिवतपणीं दर्शन देखील घेण्याची चोरी झाली होती, तें आपल्या चितेचें तरी दर्शन घेऊन पावन व्हावें म्हणून मी अशा अपरात्रीं सर्वांचा डोळा चुकवून इकडे आल्यें आहें. ही दासी आपणाशीं बेइमान झाली, आपणाला विसरली, आपल्या सवतीला सामील झाली, असा तुमचा माझ्या विषयीं गैरसमज आहे हें मला माहीत आहे. तो गैरसमज अयथार्थ आहे असें मी तरी कोणत्या तोंडाने म्हणू! वरवर दिसावयाला माझें वर्तन तसें आहे यात सशय नाही. पण मी थोरल्या राणीवर त्या चाडाळणीवर सूड घेण्याला प्रतिज्ञेनें बाधली गेल्यें आहें, त्या प्रतिज्ञेच्या सागतेसाठीं माझ्यावर जितके जितके म्हणून आरोप लादले जातील तितके तितके मला निमूटपणें सहन केलेच पाहिजेत. त्या प्रतिज्ञेला आज आणखी नवी जोड देणें प्राप्त झालें आहे. जीं जीं कोणी चाडाळ माणसें आईसाहेब, आपणाला विषप्रयोग करण्याच्या कामीं थोरल्या राणीला सामील असतील, त्याचा शोध करून त्याना देहान्त प्रायश्चित्त दिल्याखेरीज माझ्या जिवाला शाति मिळणार नाहीं. तो नरपशु गमाजी त्या कृष्णकारस्थानात सामील आहे एवढें मला कळलें. पण आणखी कोण कोण त्या कटात आहेत याचा शोध मी लावीन, त्याना प्रथम ह्या जगांतून नाहींशीं करीन, आणि आईसाहेब! ह्या आपल्या पेटत्या चितेला साक्ष ठेवून सांगत्यें, इथे आपल्या शेजारीं थोरल्या राणीची–आपल्या त्या निष्ठुर सवतीची चिता पेटलेली पाहिल्याशिवाय मी देवापाशीं मरण मागणार नाहीं."

अशी भयंकर प्रतिज्ञा त्या पेटत्या चितेसमोर करून त्या तरुणीनें त्या चितेला त्रिवार प्रणाम केला, व त्या चितेंतलीच चिमूटभर राख घेऊन आपल्या कपाळाला लावून ती तेथून माघारी निघाली. जाता जाता राईकडे तिचें लक्ष्य गेलें, व राई आपल्या मागोमाग आल्यास आपणाला आपल्या एथील आगमनातील गुप्तपणा राखणें अवघड जाईल असें तिला भय वाटू लागलें. राईविषयीं तिला जिव्हाळा वाटत होता. पण थोरल्या राणीवर आणि तिच्या कृष्णकार्यांतील साथीदारावर सूड उगविण्याच्या सकल्पाने ती इतकी बेहोष

झाली होती कीं त्या संकल्पाच्या आड प्रत्यक्षतः अथवा अप्रत्यक्षतः तरी येणाऱ्या प्रत्येक सजीव निर्जीव वस्तूला बेदरकारपणे पायाखालीं तुडवून पुढें जाण्याइतके तिचे मन कठोर बनले होतें. त्या बेहोषपणाच्या भरात तिच्या मनात राईविषयीं असाही आसुरी विचार आला कीं राई जर आपल्या मागोमाग येऊ लागली तर तिला उचलून त्या पेटत्या चितेत फेंकून द्यावें. राईला जगात मायेचा असा कोणाचाही आधार नाहीं म्हणून ती असें करीत आहे हें त्या तरुण स्त्रीला माहीत असावे. एरव्हीं तिच्याविषयीं त्या तरुण स्त्रीला इतकी अनुकंपा वाटली नसती.

राई पुढें पुढें जाऊन त्या तरुण स्त्रीच्या पायात घोंटाळू लागल्यामुळें त्या तरुण स्त्रीला चालताना पचाईत पडू लागली. "गरीब बिचारा मुका जीव! ह्या अफाट जगात त्याला मायेचें असें कोण आहे" असा विचार त्या तरुण स्त्रीच्या मनात उत्कटतेनें घोळू लागला. आपण चितेकडे येताना राई सामोरी आली व पाठ सोडीना, तेव्हा त्या तरुण स्त्रीनें तिला माघारी जा म्हटलें. पण आता ती स्वतःच माघारी निघाली व राई तिच्या मागोमाग जाऊ लागली, तेव्हा तिनें राईला कुठें जा म्हणून सांगावें?

"अभागी जीवा! तू माझ्या मागोमाग कोठवर येणार? मी सर्वस्वावर पाणी सोडून माझ्या वैऱ्यावर—आईसाहेबाच्या वैऱ्यावर सूड घेण्यासाठीं निघाल्यें आहें. आता मला दुसरी कोणतीही उपाधि नको आहे." असें पुटपुटत त्या तरुण स्त्रीने राईला पुन्हा एकवार उचलून हृदयाशीं कवटाळून तिचा मुका घेतला. राईचें तोंड आपल्या गालाला चिकटवून ती कांहीं क्षण जागच्याजागीं उभी होती.

"माझ्या मागोमाग येऊ नकोस, कुठेंही निघून जा." त्या तरुण स्त्रीनें राईला खालीं सोडून सांगितलें. राई बोलून चालून मुकें जनावर! तिला मानवी भाषा काय कळणार! परंतु मुक्या जनावराची भाषा अथवा त्याच्या भावना आपणा मनुष्याना तरी कुठे कळतात, तें जनावराना कांहीं कळत नाहीं असें आपण म्हणावे! राई जनावरच खरी, पण तिला जर भावना मुळींच नसती, तर पावसाळ्या दिवसात भयाण स्मशानात ती एकटीच शहाण्या प्रेमळ माणसासारखी आपल्या धनिणीच्या पेटत्या चितेपाशीं कां बसून राहिली असती!

# पेशवाईचा मध्यान्ह

ती तरुण स्त्री राईला खालीं लोटून एकदम झपझप पावलें उचलीत माघारी जाऊ लागली. तिनें राईकडे माघारें वळून पाहिलेंदेखील नाहीं. उलट पक्षीं राईही त्या तरुण स्त्रीकडे वळून न पाहता सरळ चितेपाशीं गेली, व पूर्वीसारखीच चितेशेजारीं रेतीत बसकण मारून बसली. त्या इमानी जीवाच्या इमानाचें जगात कौतुक करणारें कोणी नव्हतें ही गोष्ट निराळी.

ती तरुण स्त्री चादण्यातून वाट काढीत माहुलीहून साताऱ्याकडे जाणाऱ्या राजरस्त्याजवळ येते न येते तोंच थोड्या अतरावरून तिला गलबला ऐकू आला, "मारा! त्या हरामखोराला ठार मारा आणि त्याच्या जवळचा खालिता हिसकावून घ्या."

## प्रकरण २ रें

# पूर्व दिवशीं

पूर्वी वर्णन केलेल्या प्रसंगाच्या पूर्व दिवशींची गोष्ट. तो प्रसंग मोठा आणीबाणीचा होता.

* * *

छत्रपति शाहूमहाराजासारख्या विलासी व वैभवशाली राजाचा राजवाडा तो! त्याला 'रंगमहाल' नावही अगदीं शोभून दिसे. पण राणी सगुणाबाई त्याच राजवाड्यातील आपल्या महालात मृत्युशय्येवर पडल्यामुळें जणू काय साक्षात् मृत्यूची छायाच राजवाड्यावर पडली होती. राणीसभोंवार अनेक दासी शुश्रूषेला सज्ज होत्या, दोन निष्णात राजवैद्यही काळाच्या जबड्यातून राणीला ओढून काढण्यासाठीं जे जे उपाय करावे ते ते उपाय निष्फळ ठरल्यामुळें काय केले म्हणजे राणीला आराम वाटेल याची चिंता करीत चिंतातुर होऊन त्या शय्यामंदिराशेजारच्या दालनात बसले होते. प्रत्येकाच्या चर्येवरील चिंतेची व उदासीनतेची छटा भविष्यकाळाच्या भेसूरतेची साक्ष पटवीत होती.

वास्तविक सकाळची वेळ म्हणजे आनंदानें ओथबलेली, उत्साहानें डंवरलेली अशी असावयाची. पण त्या दिवशींची ती सकाळ अगदीं नितान्तसुंदर अशा यौवनसंपन्न विधवेच्या पाढऱ्या फटफटीत भालप्रदेशाप्रमाणें अगदीं उदास—भयाण भासत होती. दिवस पावसाळ्याचे खरे, पावसाळ्यात असे अनेक दिवस उगवतात व मावळतात कीं त्या दिवशीं सूर्यदर्शन करें तें मुळींच होत नाहीं पण त्यातले काहीं दिवस असेही असतात कीं त्या दिवशीं धड पाऊस नाहीं, धड ऊन्ह नाहीं, धड आकाश निरभ्र नाहीं, वाराही नाहीं; जिकडे तिकडे स्मशानातील वातावरणासारखी उदासवाणी निस्तब्धता!

# पेशवाईचा मध्यान्ह

आजची सकाळ उजाडली ती अशीच उदासवाणी होती. वैद्यराजांचें मत असे कीं अशा कुद हवेत राणीसाहेबाच्या दुखण्याला जोर चढणार. पण निसर्गाधीन गोष्टीपुढे कोणाचा काय इलाज चालणार ! तरीही वैद्यराजानीं आपल्या परीनें उपायाची शिकस्त चालविलीच होती.

वैद्यराज ज्या दालनात बसले होते, त्या दालनात मुद्दाम एक घटिपात्र ठेवण्यात आले होते. ते तेथे वैद्यराज आणि ज्योतिषी ह्या दोघासाठीं ठेवण्यात आलें होतें. वैद्यराजाचे मत कीं राणीसाहेबाचा शारीरिक रोग दुर्धर आहे, व ज्योतिषाचे मत असे कीं राणीसाहेबाच्या बलवत्तर ग्रहदशेचा हा परिणाम आहे, सर्व आधिव्याधि त्यामुळे होतात अमूक वेळा टळली कीं राणीसाहेबाना उतार पडू लागेल अशी वैद्यराजाची अपेक्षा, तर अमक्या वेळीं अमूक ग्रह बदलला कीं राणीसाहेबावरील गण्डान्तर टळेल अशी ज्योतिषाची अपेक्षा.

एक घटका भरली, त्याबरोबर वैद्यराजानी समोरच्या दासीला खुणावून जवळ बोलावलें व राणीसाहेबाना औषध देण्याची वेळ झाली असे सागून त्याना देण्यासाठीं परिश्रमपूर्वक तयार केलेलें औषधी चाटण तिच्या स्वाधीन केलें.

जिजा चाटणाची सोन्याची वाटी घेऊन राणीच्या बिछान्यापाशीं गेली. राणी तेव्हा जागीच होती तिने निराशापूर्वक जिजाकडे पाहिलें

" आईसाहेब ! औषध घेणार ना ?" जिजानें नम्रतापूर्वक विचारलें.

" औषध ? " राणीने औषधाच्या वाटीकडे क्षणभर टक लावून पाहत विषादपूर्वक अमळ स्वतःशीं हसून म्हटलें, " घेऊ म्हणतेस औषध ? आण. "

जिजाने वाटी पुढे आणताच राणीने एखाद्या दुबळ्या पाखराप्रमाणें तोंड उघडले व जीभ बाहेर काढली. जिजानें राणीला तें चाटण चाटविलें.

" झाले ? " राणीने विचारलें.

" झाले. " जिजा हळव्या वृत्तीनें उत्तरली.

" आता एक काम कर महाराज झोंपून उठले असतील तर पाहा. ते जर उठले असले, तर त्याना मीं बोलाविलें आहे असे साग. मात्र ते जर उठले नसले तर त्याना उठवू नकोस. आणि तशीच थोरल्या राणीसाहेबाकडे जाऊन त्यानाही बोलावले आहे म्हणून साग. त्याना म्हणावे, रागावूं नका, एकदा कृपा करून मला अखेरच्या भेटून जा. "

राणीचे ते शब्द जिजाचे व तेथें उभ्या असलेल्या इतर दासींचें अंतःकरण कापीत गेले. वास्तविक आजारी माणसाला सभोंवारच्या लोकांनीं धीर द्यावयाचा. पण इथें त्याचाच धीर सुटला. सर्वजणी एकमेकींच्या तोंडाकडे दीनवाण्या वृत्तीनें टकमका पाहू लागल्या.

"आईसाहेब! असे काय बरें बोलता! देवाच्या दयेनें आपणाला लौकरच बरे वाटेल." जिजा म्हणाली. त्याच अर्थानें इतर सर्वजणींनीं राणीकडे पाहिले.

"वाटेल हो! तुम्ही कांहीं चिंता करू नका." राणी सगळ्याजणींना उद्देशून बोलली व लगेच जिजाला म्हणाली, "तू मात्र सांगितले तेवढे काम लौकर कर जा" तेव्हाच तिने एका हुजऱ्याला हाक मारून त्याच्या हातीं पेशव्यानाही तसाच निरोप पाठविला.

जिजा विषण्ण चित्ताने जड पावलानीं बाहेर गेली. बाकीच्या दासींपैकीं एकजण भयभीत चित्तानें राणीचे आताचे उद्गार वैद्यराजाना कळविण्यासाठीं पलीकडच्या दालनात गेली पण त्यापूर्वीच वैद्यराजानी ते उद्गार ऐकले होते. ते दासीला पाहताच म्हणाले, "मला आईसाहेबांची प्रकृति पाहावयाची आहे."

"मी तरी तुम्हाला तेंच सांगणार होत्यें." असे म्हणून दासी माघारी राणीच्या शयनगृहात गेली. ती घाईघाईने आलेली पाहून राणीनें विचारलें, "का ग?"

"वैद्यराज आपली प्रकृति पाह्यला येत आहेत." असें म्हणून दासीनें राणीच्या अंगावरील वस्त्र व्यवस्थित सावरलें.

वैद्यराजानीं आत येऊन राणीची नाडी पाहिली. त्याच्या चर्येवरील निराशेत जास्त भर पडली. पण ते चर्येवर बळेच उत्साह आणून राणीला धीर द्यावयाला चुकले नाहीत. त्यानीं दासीकडून दुसऱ्या वैद्यराजाना बोलावून घेतले व त्यानी नाडी पाहिली, तेव्हा त्याचीदेखील खात्री होऊन चुकली कीं आता राणी केवळ घटका दोन घटकाची सोबतीण आहे. पण त्यानींही राणीला वरकरणी धीर दिलाच.

दूध आणि पिठाचे पाणी याचा रंग एकसारखा पाहण्यात असला तरी पिणाराच्या जिभेला त्याच्या रुचीतील फरक कळत नाही असें थोडेच्च आहे! राणीने त्या धीराचा अर्थ तेव्हाच ओळखला, व म्हटले, 'मी मरणाला भीत नाही. मला माहीत आहे कीं आता ह्या जगाची मी अगदी थोड्या

वेळेपुरती सोबतीण आहे. म्हणून म्हणत्ये, औषधोपचार आतां पुरे झाले. आता माझी अखेरची एकच इच्छा आहे. औषधोपचार आता थाबूद्यात, गगोदक माझ्या मुखीं घाला, आणि हे जग सोडून जाता जाता अखेरचा परमेश्वराचा मगल नामोच्चार माझ्या कानीं पडू द्या."

इतक्या समजूतदारपणे राणी बोलल्यावर धीराचे लटके बोल वैद्यराजानीं तरी कोणत्या तोंडाने बोलावे ! ते दोघेही 'परमेश्वराची इच्छा' असें म्हणून हताशपणें बाहेर गेले. गगोदक अगोदरच तेथे आणून ठेवण्यात आलें होते. तें आणून तुळशीपत्राने राणीच्या मुखीं घालण्यात आलें. ज्योतिषाला कळून चुकलें कीं ह्या ग्रहपीडेतच राणीचा अंत होणार तो वैद्यराजाच्या सागण्यावरून गीता वाचू लागला व राजोपाध्याना तातडीचे निमत्रण जाऊन महाराजाना बोलावण्यासाठीं एक दासी महाराजाच्या महालाकडे धावत गेली. यापूर्वींच जिजाने जाऊन राणीचा निरोप महाराजाना अगोदरच कळविला होता, व महाराज आपल्या महालातून तातडीनें राणीच्या भेटीला यावयाला निघालेही होते. ते राणीच्या ह्या आजारात तिच्यापासून सहसा दूर जात नसत. रात्रौ देखील घटकेघटकेला त्यानीं राणीच्या महालात येऊन समाचार घ्यावा. रात्रौ प्रहरभर झोंप मिळाली तर मिळाली. उजाडते न उजाडतें तो ते पुन्हा राणीच्या महालात यावयाचे. पण आज त्याना येण्याला अंमळ उशीर लागला, त्यामुळे राणीला वाटले कीं महाराजाना रोज रात्रदिवस अतोनात श्रम पडत असल्याने त्याचा उजाडल्याव डोळा लागला असेल. परतु तसें काहीं नसून महाराजानीं राणीच्या प्रकृतीला आराम पडावा म्हणून आजपासून पहाटेच्या मोठ्या प्रहरीं उठून गडावर मगळाईच्या देवालयात जाऊन प्र र्थना चालविली होती. पण जिजाने येऊन निरोप सागताच आपण अरिष्टनिवारणार्थ चालावलेल्या प्रार्थनेत विघ्न आल, ह्या अपशकुनाने त्याचें काळीज चर्रर झाले. तोच दुसरी दासी त्याना भेटली. त्यामुळे तर त्याच्या मनाला जबरा धक्का बसला.

सहचारिणीच्या निधनाचा दारुण प्रसग आज महाराजावर त्याच्या आयुष्यात काही पहिलाच ओढवणार होता असं नाहीं सावित्रीबाई व अंबिकाबाई ह्या दोन राण्या महाराजाना पूर्वींच दु:खसागरात लोटून परलोकीं निघून गेल्या होत्या. त्या राण्याचीही राणी शोभणारी व तितकीच—किंबहुना जास्तच

महाराजाना प्रिय असणारी त्याची प्रियतमा विरूबाई निवर्तली, तेव्हा तर त्याच्या दुःखाला पारावार उरला नाहीं. राहता राहिल्या राण्या दोन, एक सकवारबाई व दुसरी सगुणाबाई. ह्या दोन राण्यामधील तीव्र सवतीमत्सर महाराजाना हृद्रोगाप्रमाणे नेहमीं दुःखी करी हें खरें, व त्यामुळें महाराज पूर्वीं अनेकदा वनवासीही झाले होते. अनेकदा त्यानीं म्हणावेही कीं, ह्या जाचातून परमेश्वर कधीं सोडवील तो सुदिन ! परतु असले क्षणिक वैराग्य कोणाला उत्पन्न होत नाहीं ? त्यातलाच तो प्रकार. त्या घरगुती आपत्तींच्या परमावधींतदेखील प्रेमळ वृत्तीच्या महाराजाना स्वतःला मरण यावें व ही भगभग मागची सुटावी असे वाटे पण आपल्या दुःखाला कारण ज्या आपल्या भाडखोर राण्या, त्याच्याविषयीं असली अमगळ कल्पना त्याच्या मनाला कधीं शिवतदेखील नसे.

तेव्हा हयात असलेल्या दोन राण्यात राणी सगुणाबाई ही त्यातल्यात्यांत अमळ जास्त विवेकी, प्रेमळ व महाराजाविषयीं कळकळ बाळगणारी होती. तिचा सवतीविषयीचा मत्सराग्नि कितीही भडकला तरी महाराज त्यात होरपळून निघेपावेतो ती त्याला भडकू देत नसे. आणि अगदीं अलीकडे तर सगुणाबाईचा स्वभाव पूर्वींपेक्षा पुष्कळच निवळला होता. राजमाता म्हणून मिरवण्याच्या महत्त्वाकाक्षेने वर्षानुवर्षे सकवारबाई व सगुणाबाई याच्यात जी भयकर स्पर्धा सुरू होती, त्या बाबतीत सगुणाबाईने समजूतदारपणानें अलीकडे माघार घेतली होती. महाराज इतक्या राण्याशीं लग्नें करूनही दुर्दैवाने निपुत्रिक राहिले असल्यानें त्याच्या पश्चात् राज्याला वारस हा कोणीतरी पाहिजेच होता. व तो वारस दत्तकपुत्र घेऊन निर्माण करावयाचा, तर त्या दत्तकपुत्राचें मातृपद आपणाला मिळावे असे महाराजाच्या हयात राण्यापैकीं दोघींनाही वाटणे अगदी स्वाभाविक होते. त्या दोघींतही वडीलपणाचा मान सकवारबाईचा. त्यामुळे राजमाता होण्याचा मान वाट्याला यावयाचा झाला तर तो तिच्याच वाट्याला येणार, हें ठरल्यासारखेच होतें. पण महाराजाच्या घरातील व राजवटीमधील दुफळीमुळें दत्तकपुत्र कोणत्या राणीच्या माडीवर बसतो यापेक्षा कोण बसतो यालाच जास्त महत्त्व होतें. कारण जिच्या वर्गीचा मुलगा दत्तक होऊन राज्याला वारस होणार, तिच्या तत्राने पुढें राज्यकरभार चालणार हें उघड होते. म्हणूनच सकवारबाईचा प्रयत्न आपल्या वशिल्याचा

दत्तक घेतला जावा या धोरणानें सुरू होता. त्यासाठीं तिनें प्रतिनिधि, प्रतिनिधींचे मुतालिक यमाजी शिवदेव वगैरे पेशव्याच्या प्रतिस्पर्ध्यांना आपणासभोंवार गोळा करून राजवटींत आपला एक स्वतंत्र पक्षच निर्माण केला होता. श्रीमंत नानासाहेब पेशव्यांना पेशवाई पदावरून हुसकून लावण्याचे सारे प्रयत्न विफल होऊन महाराजांच्या अनुज्ञेने मराठशाहीचे सर्वाधिकार नानासाहेबांच्या हातीं एकवटले गेल्यामुळे व त्या निमित्तानें महाराजांच्या मनांत सकवारबाईविषयीं उलट अविश्वास उत्पन्न झाल्याकारणानें सकवारबाई फारच चिडून इरेला पेटली होती स्वतःचा हेका पुरा करण्याच्या बाबतींत ती महाराजांचीदेखील पर्वा करण्याला राजी नव्हती तिच्या राष्ट्रविघातक प्रयत्नांना महाराजांचा मुळींच पाठिंबा नसल्याने ती आपलीं हेकेखोर कारस्थाने आपल्या हस्तकांच्या साह्याने पूर्वीपेक्षाही जास्त सावधपणे व गुप्त रीतीनें चालवू लागली होती अर्थात् सकवारबाई महाराजांच्या भलेपणाचा हा अवास्तव फायदा घेत होती. असे अंतःपुरातील स्त्रीसाम्राज्यामधील वास्तव्य महाराजांना जितके डोईजड तितकेच असह्य होऊन बसलें होते.

सगुणाबाईही प्रथम जवळ जवळ तशीच वागे. पण अलीकडे तिची चूक तिला कळू लागल्यापासून तिची वृत्ति पालटली होती, व होताहोईतो जेणेंकरून महाराजांच्या मनाला कष्ट होतील अशी कोणतीही गोष्ट न करण्याकडे तिचा कल असे ही सगुणाबाईच्या स्वभावातील सुधारणा महाराजांना कितीतरी सुखदायक झाली होती. कारण त्यामुळे गृहकलहांना बराच आळा बसला, व दोन राण्यांपैकीं एकीकडून तरी महाराजांना गृहसौख्य मिळू लागलें.

पण तें गृहसौख्य दीर्घकाल लाभावें इतके महाराज भाग्यशाली नव्हते, म्हणूनच राणी सगुणाबाई साध्या दुखण्यानें आजारी पडून जी एकदा अंथरुणाला खिळली, तें तिचें डोकें काहीं केल्या वर म्हणून होईना. उपचारांना काहीं कमतरता नव्हती. राणीच ती, तशांत ती महाराजांची प्रिय राणी. तिला वाचविण्याचे कोणतेही उपाय शिल्लक राहणे शक्यच नव्हतें. पण ईश्वराच्या घरचीच ज्या जीवाच्या आयुष्याची दोरी तुटली, तिथें त्या जीवाला वाचविण्याला मानवी प्रयत्न काय पुरे पडणार !

असो. महाराजांनीं आपली प्रार्थना दासी येताच आवरती घेतली व ते त्याच पावलीं धाकट्या राणीच्या महालाकडे निघाले.

# कादंबरीमय पेशवाई

दक्षिणेंतील निजामी अरेरावीला पायबंद लावून व उत्तर हिंदुस्थानांत हिंदुपदपादशाहीची पूर्वीपेक्षाही मजबूत घडी बसवून श्रीमंत नानासाहेब पेशवे नुकतेच पुण्याला आपल्या शनिवारवाड्यात येऊन दाखल झाले होते. तिकडे निजामाचा पक्षपाती रामदासपंत व निजामाचा मुलगा नासीरजंग ह्या दोन कसलेल्या प्रतिस्पर्ध्यांशीं झगडून विजय संपादन करणें ही कांहीं सामान्य गोष्ट नव्हती. तें ध्यानीं घेऊनच नानासाहेबांनीं मोठ्या सावधगिरीनें आपली सर्व तयारी करून चढावाचें धोरण पत्करून नेवाईवर स्वारी केली व सतत सहा-सात महिने प्रतिस्पर्ध्यांशी टक्कर दिली. अखेर शत्रूला चांगलेंच जेरीला आणून आसुब्री एथे त्याच्याकडून हिंदुपदपादशाहीला पोषक असा तह करून घेतला.

पण मराठी साम्राज्याचें ऊर्फ हिंदुपदपादशाहीचें वैभव नानासाहेबासारख्या तरुण व कर्तबगार पेशव्याच्या पुढारीपणाखालीं व शिंदेहोळकरादि इतर मातबर सरदारांच्या अमोल साह्यानें जरी झपाट्यानें वाढत होते, तरी तितक्याच झपाट्यानें दिल्लीच्या बादशाही सत्तेचे एकूणएक सारे आधारस्तंभ मराठ्यांच्या त्या वर्धिष्णु वैभवाला जिकडून पायबंद लावतां येईल तिकडून लावण्यासाठीं आपल्या जिवाची अगदीं कमालीची आटापेट करीत होते. साठ वर्षांनीं बाम्बूच्या बेटांना सर्वत्र एकदम फूल येऊन तीं बेटें मरून सोपाटीं होतात व त्या कुलक्षयातून कोठें कोठें एखादा अंकुर मरता मरता वाचलेला आढळतो त्याप्रमाणें सारा बादशाही अमल सभोंवारच्या विविध राजसत्ताकडून—विशेषतः मराठ्यांकडून होणाऱ्या विरोधामुळें मृत्युपथाला लागलेला असतांना त्या अमलांतील एकटा निजाम काय तो मराठ्यांशीं टक्कर देण्याला समर्थ असा तुल्यबल उरला होता. त्यालादेखील प्रथम श्रीमंत बाजीराव पेशव्यांनीं व मागाहून नानासाहेबांनीं जरी जरबेंत ठेवलें होतें, तरी त्यांना त्याची पक्की दहशत होती हें कांहीं खोटें नाहीं आतां शाहूमहाराजांनीं अनेकदां निजामाशीं संबंध आला त्या प्रत्येक वेळीं तेजस्वी स्वतंत्र राजाला न शोभणारें नरमपणाचें धोरण ठेवल्यामुळेंच निजाम इतका शेफारून गेला होता हें मात्र खरें. त्याचा दृश्य परिणाम इतका ठळक होता कीं निजामाची सत्ता पेशव्यांना डोळ्यांत तेल घालून वागावयाला लावण्याइतकी प्रबळ झाली होती.

पण त्या निजामाच्या सत्तेला उत्तरेंत आसुब्रीच्या तहानें जोराचा फटका बसला, व त्याच सुमाराला निजाम उल्मुल्क कालवश झाल्यामुळें तत्कालीन

# पेशवाईचा मध्यान्ह

हिंदी राजकारणाचे ओघ बरेचसे बदलले. त्या अनुरोधानें उत्तरेकडील राजकारणाची वासलात लावल्यावर नानासाहेब प्रथम पुण्यात आले व आप्त-मडळीच्या भेटी गाठी घेऊन तेथे चार दिवस राहतात न राहतात तोंच गोविंदराव चिटणिसाचें धाकट्या राणीच्या आजाराविषयींचें व सकवारबाई पक्षाच्या कारवाईविषयींच्या खुलाशाचें तातडीने निघून येण्याचें पत्र येऊन थडकलें. त्या चार दिवसात साताऱ्यातील राजकीय भानगडींचे त्याना अनेक कारभाऱ्यामार्फतही बरेंच ज्ञान झालें होतें त्या भानगडींचा समाचार घेण्या-साठीं ते ताबडतोब साताऱ्यात आले. ते जे साताऱ्यात आले, ते राजकारणा-चीं अत्यत जरुरीचीं कामें पुण्यात कैक दिवसाचीं साचलीं होती, निजामाशीं झालेल्या असुलीच्या तहाच्या अमलबजावणीचीही निश्चित योजना आखा वयाची होती. पण चिटणिसाची चिठ्ठीही तशीच तातडीची असल्यानें एक दिवसाच्या सवडीनें त्याना साताऱ्यात येणें प्राप्तच झालें नाहीं तरी एरव्हीं देखील उत्तरेकडील सर्व कामगिरीचा झाडा महाराजाना देण्यासाठीं त्याना साताऱ्यात यावयाचें होतेंच.

साताऱ्यात येताच नानासाहेबांना धाकट्या राणीच्या आजारीपणाची बातमी समजली. तेव्हाच ते तिच्या समाचाराला जावयाचे राजवाडाही काहीं दूर नाहीं, अगदीं वाड्याला वाडा भिडलेला होता असे म्हटले तरी चालेल. परतु पहिला दिवस महाराजाची भेट घेऊन उत्तरेकडील स्वारीचा सारा वृत्तान्त त्याना निवेदन करण्यातच गेला. कैक दिवसाचीं जरूरीचीं कामें इतकीं साचून राहिली होतीं की त्याचा फडशा केल्याखेरीज गत्यतर नव्हतें त्यातच आणखी राजधानींत माजलेल्या घरगुती कलहाची भर पडली होती. त्यांतूनही नानासाहेब पडले सशयी स्वभावाचे व सुतानें स्वर्गाला जाणारे. पेशवाई पदाच्या बाबतींत झालेल्या भानगडींना अजून काहीं दीड वर्षही लोटलें नव्हतें, व सकवारबाई आणि तिच्या पक्षाची प्रतिनिधि वगैरे इतर मडळी याना त्या कारस्थानात अपयश आलें असले तरी त्याच्या कारस्थानाना खळ काहीं पडला नव्हता. बुद्धिबळाचा डाव माडलेलाच होता, व शहाला प्रतिशह देण्याचें काम सुरूच होतें. नानासाहेबानीं एकवार त्या डावात प्रतिपक्षावर मात करून एक डाव जिंकून हातचे गेलेले पेशवाईपद पुन्हा मिळविलें असलें, तरी दुसऱ्या डावांत आपण त्याच्यावर प्यादी-

हुचमल्ली व साधल्यास घोडमल्लीदेखील करून सव्याज उट्टें फेडून घेऊं असा पेशव्याच्या प्रतिपक्षानें जणू चग बाधला होता. इतक्या सर्व भानगडींना तोंड देऊन राजवटीचा कारभार हाकण्याला नानासाहेबासारखा चतुरस्र पुरुष म्हणूनच पुरा पडत होता.

धाकटया राणीकडील हुजऱ्या येऊन पोहोचला तेव्हा नानासाहेब नुक्तेच स्नान करून देवाला गधफूल वाहण्याच्या बेतात होते. त्यानीं धाकटया राणीचा निरोप कळताच घाईघाईनें कसे बसें गधफूल देवाला वाहिले, व कपडे करून एकदम धाकटया राणीच्या महालाची वाट धरली. जाता जाता त्याच्या मनाला हुरहूर लागली होती कीं आपण दोन दिवस साताऱ्यात येऊन झाले तरी भेट घेतली नाहीं याबद्दल धाकटी राणी आपणाला काय म्हणेल!

पण राणी नानासाहेबाना तसे काहींदेखील म्हणाली नाहीं उलट नानासाहेबाना, ते समोर येताच ती गौरवून बोलली, "नाना! फारा दिवसाचीं राजकारणाचीं खरकटीं तुम्हाला निस्तरायचीं असतील, म्हणूनच तुम्हाला माझ्याकडे यायला वेळ मिळाला नसावा हें मी जाणत्ये. राजकारणाची जबाबदारी म्हणजे केवळ सुळावरची पोळी! मीदेखील तुम्हाला त्रास देणार नव्हत्यें. पण माझा आता घटकेचाही भरवसा नाही असे माझे मलाच वाटू लागलें आहे म्हणून मी तुम्हाला एवढा त्रास दिला. तुमच्या घरची सर्व मडळी खुशाल ना?"

"होय. खुशाल. आईसाहेब! मी यापूर्वीच आपल्या भेटीला यावयाला हवें होतें."नानासाहेब उत्तरले.

"पण मी म्हणत्यें, आपण आपलेपणा मानल्यावर असल्या शिष्टाचाराची काय गरज? अगदीं पूर्वीच्या गोष्टी झाल्या त्या होऊन गेल्या. पण तुमच्यावर थोड्या दिवसापूर्वीं जी तोहमत घालण्यात आली—"

"तें सकट जसें आलें तसें आपणा सर्वांच्या कृपेने दूर झाले शेवट गोड तें सारेंच गोड म्हणावे आणि आपण स्वस्थ बसावे. त्या गोष्टी आठवून विनाकारण आपण मनाला कष्ट का बरें करून घेता?"

"मी मनाला कष्ट करून घेत नाहीं, उलट माझ्या मनाला आजवर होणारे कष्ट थाबविण्यासाठीं मी हें बोलत्यें आहें. मीं यापूर्वी तुमच्याशीं अनेक कारणामुळें स्पर्धा केली आहे. तेव्हा एक तर मी भलत्याच लोभाला बळी

पडत होत्यें, व दुसरें, तुमच्याविषयीं सभोंवारच्या मडळीने माझा फारच गैरसमज करून दिला होता."

"पण देवदयेने तो गैरसमज पुढे दूर झाला ना?"

"हो! दूर झाला तेव्हापासून तुमची भेट केव्हा होते आणि तुम्हाला मी माझें मन निःसशय झाल्याचे केव्हा सागत्ये असे मला झालें होतें. तेव्हापासूनच मीं माझ्या मनाशी निर्धार केला आहे कीं यापुढे तुमच्या कारभारात बखेडा असा मुळींच उत्पन्न करायचा नाहीं. शक्य तेवढें तुम्हाला साह्यच करायचें, व तुमच्या हातून राष्ट्रकार्य करून घ्यावयाचें. पण परमेश्वराची इच्छा ही अशी होती. तुम्ही आरभिलेल्या हिंदवी स्वराज्याच्या जगड्व्याळ कार्याला विधायक कार्याचा व साह्याचा हातभार माझ्याकडून लागूच नये अशी जणू विधिघटनाच होती! त्याला काहीं इलाज नाहीं. मला आता भरल्या चुड्यानीं मरण येते आहे यातच आनद आहे."

"आम्ही कमनशिबी, ही राजवट फुटक्या कपाळाची, म्हणून हें असें होतें आहे विरूबाईसाहेबाचा राजवटीला असलेला पहिला जबरदस्त आधार तसा तुटला, आणि—"

पुढे नानासाहेबाच्या तोंडून शब्दच निघेना, त्याचा कठ दाटून आला.

"असें वाईट वाटून घेण्यात काहींच अर्थ नाहीं नाना! होणें जाणें कोणाला टळत नाहीं आता तुम्हाला माझी अखेरची विनति एवढीच कीं झाल्यागेल्या सर्व गोष्टी विसरून जा, आणि महाराजानीं कोणाच्याही कसल्या ही विरोधाला न जुमानता पोटच्या पुत्राप्रमाणे तुमचा प्रतिपाळ करून राजवटीचा सर्व भडिभार तुमच्यावर घातला आहे, त्या उपकाराची फेड महाराजाचे धर्मपुत्र या नात्यानें कृतज्ञतेने आमरण करा. तुम्ही आपलें कर्तव्य चुकणार नाहीं अशी माझी पूर्ण खात्री आहे. तुम्ही अगिकारलेल्या हिंदवी स्वराज्याच्या पवित्र कार्यात तुम्हाला पूर्ण यश मिळेल असा माझा तुम्हाला आशिर्वाद आहे."

नानासाहेबानीं राणीसमोर नम्रतापूर्वक मस्तक नमविले, व राणीनें आपला वरदहस्त त्याच्या मस्तकावर ठेवला.

इतक्यात महाराज त्या महालात येऊन पोहोंचले. त्यानीं प्रथम वैद्यराजापाशीं जाऊन धाकटया राणीच्या प्रकृतीची चौकशी केली. वैद्यराजानीं

निराशेचा अभिप्राय दिला, तो कानीं पडतांच महाराजांचा धीर खचला. त्यांनीं दुःखातिरेकानें आपल्या कपाळावर ताड्कन् हात मारून घेतला. तो प्रसगच असा होता कीं साक्षात् धैर्यमेरुदेखील तेव्हा दैवाधीनतेसमोर नम्र होऊन खचला असता.

" महाराज आले का ? " पुढें राणीनें कण्हत कण्हत दासीला विचारलें.

तोंच महाराज ते ऐकून राणीच्या महालात येऊन प्रविष्ट झाले. त्या पतिपत्नींची दृष्टादृष्ट झाली मात्र, त्याच क्षणी दोघाच्याही डोळयातून अश्रूच्या गगायमुना उगम पावून वाहू लागल्या.

" राणीसाहेब ! " महाराजाचा कठ दाटून आल्यानें त्याच्या मुखावाटे शद्बच निघेनात. नानासाहेब शेजारीं होते. पण त्याच्याकडेही त्याचें लक्ष्य गेलें नाहीं.

" असें काय बरें करायचें तें ! आपणाला दुःख झालेलें मला पाहवत नाहीं. मला भरल्या चुडयानीं मरण येत आहे, यातच मला आनद आहे. माझ्यासारखी पुण्यवान मीच. मला आपल्या पायावर एकदा मस्तक ठेवावयाचें आहे. ते पाय पुढें करायचे ना ? "

महाराजानीं नानासाहेबाकडे नुमते एकवार पाहिले मात्र. पण तिकडे लक्ष्य न देता अगावरच्या उत्तरीयानें आसवे पुसलीं, व त्याच उत्तरीयानें राणीचींही आसवें पुसलीं.

राणी पुन्हा म्हणाली, "कृपा करून आपले पाय पुढें करायचे म्हणत्यें जरा." महाराजानीं राणीच्या बिछान्याशेजारच्या उच्चासनावर बसून केवळ राणीचा–पतिव्रतेचा भोळा भाव म्हणून पाय पुढें केले, व राणीनें धन्यतापूर्वक त्या पायावर आपलें अशक्ततेनें कापणारे मस्तक ठेवलें.

"अखेर निष्ठुर काळाला दयेचा पाझर काहीं फुटला नाहीं !" महाराज स्फुदत स्फुदत व अडखळत डोळ्यातील आसवें पुशीत उद्गारले.

राणीला महाराजाची ती दुःखाकुल अवस्था पाहून तितक्याच उत्कटतेनें भडभडून आलें पण तिला बोलावयाला शक्ति कोठे होती ! तिला मरणाची ओढ लागली होती तिच्या अखेरच्या मनोरथापैकीं महाराजाच्या पुण्यचरणावर मस्तक टेवावें हा एक मनोरथ पूर्ण झाला. पण थोरली राणी सकवारबाई अजून आली नव्हती; तिला भेटण्याचा मनोरथ अजून अपूर्णच होता.

राणी म्हणाली, "थोरल्या आईसाहेब अजून आल्या नाहींत. आणि जिजाही आली नाहीं. कोणी तरी जरा तपास करा बरें!"

"मी जातों आणि थोरल्या आईसाहेबाना बोलावून आणतो." असें म्हणून नानासाहेब जाण्यासाठीं उठले. पण राणीनें त्याना हाताने खूण करून थांबावयाला सांगितलें. तोंच महाराज मागें वळून दासीजनाना उद्देशून म्हणाले, "कोणी तरी थोरल्या महालात जाऊन या पाहू!"

जिजा दासी लगेच सकवारबाईच्या महालाकडे जावयाला निघाली.

विरूबाई आईसाहेबाच्या निधनाने आम्ही सारे जरी दुबळे पडलों, तरी धाकट्या आईसाहेबानीं दिवसेंदिवस त्याचाच कित्ता गिरवून आम्हाला त्याचा विसर पाडला होता. पण हें कृपाछत्र आमच्या मस्तकावर सावली धरून होतें, तेंही देवाला सहन होऊ नये ना!" नानासाहेब खेदपूर्ण घोगऱ्या स्वरात उद्गारले.

"मी हें कृपाछत्र नव्हे, कृपाछत्र खरें हें!" राणी महाराजाकडे बोट दाखवून हळुहळू उद्गारली, "आणि ह्या कृपाछत्राची मी नुसती सावली आहें." तिनें पुन्हा महाराजाकडे वळून म्हटलें," नानाला मी अखेरचे दोन शद्ब काय सांगायचे ते सांगितलेच आहेत. त्यानीं आपल्या पायाना जन्मभर अंतरू नये, आपणही त्याना अंतर देऊ नये. त्याला मी माझा धर्मपुत्र मानलें आहे, व आपण तर त्या नात्यानें त्याचें लहानपणापासूनच संगोपन केलें आहे. गादीला वारस म्हणून आपण अवश्य एखादा मनाजोगा मुलगा मांडीवर घ्यावा. पण नाना हा देखील आपला मुलगाच आहे; त्याच्या हातून सर्व कारभार करून घेऊन हिंदवीचा दुवा मिळवावा. ईश्वर आपणा उभयतांचा पाठीराखा आहे."

आणखी थोडा वेळ त्या तिघाचे असेंच जीवाभावाचें संभाषण झालें. नानासाहेबाना पेशवाईपद प्राप्त झाल्यापासून आजवर सहा सात वर्षांत धाकटी राणी त्याच्याशीं त्याच्या जन्मदात्या मातेपेक्षाही जास्त प्रेमानें वागली असा त्या उभयताच्या आयुष्यातील तोच पहिला दिवस होता. तोच शेवटचाही दिवस ठरणार ह्या जाणिवेने नानासाहेबाच्या अंतःकरणात भयंकर कालवाकालव झाली. धाकटी राणी ह्या जिवावरच्या दुखण्यातून वाचत नाहीं हें महाराजांप्रमाणेंच नानासाहेबही आता पूर्णपणें ओळखून चुकले होते. अशा

प्रसंगीं राणीपासून दूर जाण्याचें त्याच्या अगदीं जिवावर आलें होतें. पण अलम् मराठशाहीच्या त्या नरश्रेष्ठ नेत्याला असल्या प्रापंचिक गोष्टींसाठीं जरुरीच्या राजकारणाकडे दुर्लक्ष्य करता येणें शक्य नव्हतें. त्यानीं अगदीं मोजक्या शब्दात प्रचलित राजकारणाचे आणीबाणीचें व गंभीर स्वरूप राणीला समजावून सांगितले, व तिचा निरोप मागून ते म्हणाले, " मी अत्यंत निकाडीच्या कामाची तेवढी निरवानिरव करून पुण्याहून लागलाच माघारा येऊं का ? "

राणी शांतपणानें उत्तरली, " हें पाहा, शिष्टाचार पाळायला तुम्ही कोणी परके नाहीं. तुम्हाला भेटायची माझी अखेरची इच्छा होती तेवढी सफल झाली, मनमोकळेपणाने काय बोलायचें तें आपण बोललों. आता तुम्ही अगोदर पुण्याला जा कसे ! माझें जिणें आता ईश्वराधीन आहे. तुम्ही इथे राहून मला आयुष्य थोडेंच घालू शकणार आहा ? राजकारण ही कोटमाप मराठी रयतेच्या भवितव्याची बाब आहे. तिच्याकडे दुर्लक्ष्य कराल तर, परमेश्वरापाशीं दोषी ठराल. तुम्ही तांबडतोब जावें, आणि तातडीचीं सर्व कामें यथास्थित आटोपल्यावर सवड मिळाली तर यावें. तुमच्या मातोश्रींना व सर्व मुलामाणसांना माझा आशिर्वाद सांगा... " एवढें बोलून धाकटी राणी ग्लानि आल्यामुळें थांबली.

नानासाहेब महाराजाचाही निरोप घेऊन तसेच त्या पावलीं पुण्याला जाण्याला निघाले. जाताना त्यानीं राणीचें प्रकृतिमान आपणाला पुण्यात रोजच्या रोज कळावें यास्तव रोज घोडेस्वार पुण्याला यावा अशी व्यवस्था मुक्कामामुक्कामावर करून ठेवली.

नानासाहेब गेल्यावरदेखील राणीनें महाराजांपाशीं नानासाहेबांच्या अचाट कर्तबगारीविषयीं अनेकवार कळकळीचे प्रसंशोद्गार काढले.

परंतु पातक्याची सावली पडताच गंगा लुप्त व्हावी त्याप्रमाणें राणीच्या सुखदुःखाच्या गोष्टी एकाएकीं तेथें कसला तरी कानोसा मिळताच एकदम थांबल्या.

तो कानोसा कसला ?

## प्रकरण ३ रें

# सकवारबाईचें कृष्णकारस्थान

धाकट्या राणीच्या महालात स्वतः राणी व महाराज यांचें जिव्हाळ्याचें संभाषण चाललें असताना त्याच वेळीं रंगमहालातील दुसऱ्या एका महालात राणी सगुणाबाईला विषप्रयोग करून ठार मारण्याचे राक्षसी बेत चालले होते!

धाकटी राणी इकडे अशी मृत्युशय्येवर पडली होती. पण थोरल्या राणी सकवारबाईला त्याचे काय होय! ती उलट परमेश्वराला मनातून आळवीत होती कीं धाकटी राणी एकदाची आटोपू द्या, आपल्या वाटेंतला हा कांटा एकदाचा दूर होऊ द्या. आणि त्यासाठीं ती तेव्हा मनातून तेहतीस कोटि देवांना नानापरींचे नवसही करीत होती!

सकवारबाईला धाकट्या राणीचा कांटा अलीकडे फारच बोंचू लागला होता. कारण धाकटी राणी आजकाल महाराजाची प्रियतमा होऊन बसली होती. ती महाराजांना आपल्याविरुद्ध कांहींच्या बाहीं शिकवते व म्हणून महाराज आपणाशीं तुसडेपणानें वागतात, असा सकवारचा समज होऊन बसला होता. एका वर्षापूर्वी नानासाहेब पेशव्यांना स्थानभ्रष्ट करण्याच्या कारस्थानांत माघार घ्यावी लागल्यापासून सकवारबाई पिसाळल्यासारखी झाली होती. इतका दांत ह्या थोरल्या राणीचा धाकट्या राणीवर होता, तो केवळ दत्तक पुत्राच्या निमित्तानें. ताराबाईचा नातू राजपुत्र राजाराम ऊर्फ रामराजा पानगावीं वेषांतरानें दर्याबाई निंबाळकराकडे असल्याची वार्ता कळताच सकवारबाईनें यमाजी शिवदेवाचा मुलगा गमाजी याची त्या राजपुत्राचा नाश करण्याच्या कामीं योजना करून आपल्या मतानें राजपुत्राचा नायनाट केला होता. 'आपल्या मतानें' म्हणावयाचें अशासाठीं कीं तो राजपुत्र खरोखर अजूनही जिवंत होता. तो सुखरूपपणें पूर्व स्थळीं नांदत होता.

कारस्थानी दासी पुतळा व तिचा पति प्रतापराव यांच्या स्वामिनिष्ठेमुळें त्या राजपुत्राच्या जिवावरचें संकट टळलें होतें. पण तो खरा प्रकार गोविंदराव चिटणीस, महाराज, नानासाहेब पेशवे, पुतळा व प्रतापराव अशा मोजक्या मंडळीलाच काय तो माहीत होता. सकवारबाई मात्र आपल्या वाटेंतला एक औरस राजसंततीचा कांटा दूर झाला अशा समजुतीनें मनांत मांडे चुरीत तेव्हांपासून आपल्या तंत्रांतील एखादा दत्तक घेण्याच्या जारीच्या प्रयत्नांत गढून गेली होती.

सगुणाबाईनें जिजाच्या हातीं बोलावणें पाठविलें तेव्हां सकवारबाई जगजीवनराव प्रतिनिधि व यमाजी शिवदेव यांना घेऊन आपल्या महालांत त्याच प्रश्नाविषयीं खलबतें करीत बसली होती.

सकवारबाईच्या इच्छेमुळें म्हणूनच नव्हे, तर तत्कालीन राजकारणाच्या ओघामुळेंही आपोआपच दत्तकाचा प्रश्न तेव्हां साताऱ्याच्या राजवटींत चांगलाच घसाला लागला होता. महाराज वारंवार आजारी पडत, त्यांना आपल्या देहाची शाश्वति वाटेनाशी झाली होती. व्हावयाचें टळत नाहीं हें खरें, पण ते निपुत्रिक मरण पावल्यास त्यांच्या पश्चात् गादीवर कोणीं बसावें याविषयीं बखेडे माजणार व त्या बखेड्यांत हिंदुपदपादशाहीच्या विराट उद्योगाचा नायनाट होण्याचा संभव! त्या भयानें राजवटीच्या जबाबदार कारभारी मंडळीनें महाराजांना दत्तक घेण्याचा आग्रह चालविला होता. पण दत्तक कोणाला घ्यावयाचें?—हाच तर मोठा प्रश्न होता. धाकटा राजाराम हा औरस राजपुत्र असल्याचें महाराज व इतर कारभारी मंडळी यांच्या कानीं आलें असलें तरी मुळांत कारभाऱ्यांत देखील चांगलीच फूट होती. प्रतिनिधि, यमाजी शिवदेव, सुमंत, सुमंताचे जावई व महाराजांचे कारभारी देवराव मेघःश्याम, रघूजी भोसले, बारामतीकर बाबूजी नाईक, वगैरे मंडळी सकवारबाईच्या तंत्रानें वागणारी होती. त्या सर्वच मंडळीला पानगांवचा वृत्तान्त माहीत होता अशांतली गोष्ट नाहीं. तो प्रकार माहीत असलेली सकवारबाईच्या पक्षांतील मंडळी म्हणजे प्रतिनिधि, यमाजी शिवदेव, व गमाजी हे तिघेजणच होत. त्यांना तरी सकवारबाईनें राजपुत्राला ठार मारण्याचें केलेलें कारस्थान यशस्वी झालें एवढेंच काय तें माहीत! ती गोष्ट त्यांनीं अखेरपावेतों गुप्त राखण्याचें ठरविलें होतें याचें कारण प्रतिपक्षाला अर्थात् महाराज, पेशवे,

चिटणीस, ताराबाई याना चकवावयाचें, त्याच्या डोळ्यात धूळ फेंकावयाची. राजपुत्र आहे, तो महाराजाच्या पश्चात् गादीवर येईल ह्या विश्वासावर त्या मडळीने स्वस्थ बसावें, व आपण ऐन वेळीं राजपुत्राचा वध झाल्याचें पुराव्यानें सिद्ध करून आपल्या वशिल्याचें तट्टू पुढे दामटावें, असा तो डाव होता. परतु तो डाव महाराजाच्या हयातींत सिद्धीला जाणें फारच अवघड होतें. समजा, राजारामाचा वध झाला अशी महाराजाची व इतराची खात्री पटली, तरी दुसरा कोण दत्तक घ्यावयाचा हा प्रश्न शिल्लक राहतोच. तशात महाराजाचा ओढा अलीकडे सगुणाबाईकडे विशेष असल्याने व आपल्या चुलत बहिणीचा—नागपूरकर रघूजी भोसल्याचा पुत्र मुधोजी भोसले याला दत्तक घ्यावें अशी सगुणाबाईची इच्छा असल्यानें महाराजाना तिचाच शब्द रुचण्याचा सभव फार अलीकडे दत्तकाच्या प्रश्नाचा जारीनें खल होऊ लागल्यापासून सगुणाबाईही आपल्या परीने मुधोजीलाच दत्तक घ्यावें अशा प्रयत्नाना लागली होती, व महाराजाच्या अनुज्ञेने मुधोजीला आणण्यासाठीं नागपुराकडे माणसेंही रवाना झालीं होतीं. आपल्या वशातील औरस राजपुत्र पानगावीं जिवत आहे हें महाराजाना माहीत असताना व त्यालाच दत्तक घेणें इष्ट असतानाही महाराजानी सगुणाबाईच्या योजनेला तोंडदेखला होकार दिला होता, तो राजारामाचें रहस्य योग्य काळापावेतो गुप्त राहावें याच हेतूनें होय. तें रहस्य उलगडलें गेल्यास पुन्हा सकवारबाई त्या राजपुत्राच्या नाशाची खटपट करूं लागावयाची, व कोल्हापूरकरानाही पुन्हा राजपुत्राच्या नाशाचा उमाळा यावयाचा ! त्या सर्व गिधाडाच्या जबड्यातून औरस राजपुत्राचें रक्षण करण्यासाठीं महाराज इतकी दक्ष । बाळगीत होते. परतु सगुणाबाईनें मुधोजी भोसल्याला दत्तक घेण्याचा प्रश्न निकरावर आणलेला पाहून सकवारबाईला मात्र तिचा पराकाष्ठेचा हेवा दावा वाटू लागला. सगुणाबाई एकदाची मरेना का असे तिला वाटू लागले. त्यासाठीं तिने आपल्या हस्तकाकरवीं देवदेवस्की, व्रतें अनुष्ठाने सुरू केली होती, टिकाटिकाणच्या म्हसोबा नरसोबाना नवस चाललेच होते, व त्याच्या जोडीला आपल्या मानवी प्रयत्नाची शिकस्त करण्याचेही तिने आता मनावर घेतलें होते

प्रतिनिधि व यमाजी शिवदेव निघून गेले ते बाहेर जातात न जातात तोंच सोवळें नेसलेला गमाजी पळीपंचपात्री घेऊन तेथ येऊन दाखल झाला.

" गमाजी ! काम झाले का ? " सकवारबाईनें गमाजीला प्रथमदर्शनींच प्रश्न केला.

" होय आईसाहेब ! काम झालें. " असें म्हणून गमाजीने पळीपचपात्री सकवारबाईसमोर ठेवली व म्हटलें, " हें तीर्थ आपण धाकट्या आईसाहेबाना प्राशन करावयाला लावा, कीं एका अर्ध्या घटकेच्या आत सर्व आधि-व्याधींचा नाश झालाच असें समजा. "

" कुणाच्या ? माझ्या कीं माझ्या सवतीच्या ? " सकवारबाईने त्या पचपात्रींतील तीर्थाकडे पाहत गालातल्यागालात हसत विचारले, व म्हटलें, " ठीक आहे. तू आता जा. "

गमाजी निघून गेला. लगेच सकवारबाईने पुतळेला हाक मारली पुतळा येऊन समोर हजर झाली. तिला सकवारबाईने म्हटले, " अग ! तुझी आवडती मालकीण मरायला टेकली आहे, तिला वाचवायची कांहीं खटपट करायला नको का ? "

" असें मला पुन्हा पुन्हा का बरें हिणवता आईसाहेब ! "

पुतळा ही मूळची राणी सगुणाबाईची अत्यत विश्वासू कुळबीण. पण एक वर्षापूर्वीं सवतीसवतींच्या चुरशींत सकवारबाईने तिला इरेला धरून आपल्या पायापाशीं शरण आणले, व ती धाकट्या राणीच्या आश्रयाला मुकून ह्या थोरल्या राणीची दासी बनली. दरम्यान धाकट्या राणीच्या जीवितात जबरदस्त स्थित्यतर झालें. महाराजानी तिची परोपरीने समजून घालून तिला माघारी आणविली व ती महाराजाशीं अत्यत प्रेमळपणाने वागू लागून त्याच्या जिवाची खरी जिवलग होऊन बसली. त्याप्रमाणेंच पुतळेच्या भाग्य-चक्रानेंही पुष्कळच फेरे घेतले. सकवारबाईनें राजारामाला ठार मारण्याच्या कामगिरीवर जीं माणसें पाठविलीं होतीं, त्यात पुतळेचा पति प्रतापराव हाही होता. तो त्या झटपटींत पानगावीं ठार मारला गेला अशी बातमी प्रथम साताऱ्यात येऊन धडकली, पण मागाहून लौकरच प्रतापराव शीरसलामत येऊन पुतळेला—नव्हे, पेशव्यानीं तिचा गौरव करून तिला पुतळा हें नवें नाव देण्यापूर्वीच्या त्याच्या सजणेला भेटला प्रतापराव हा केवळ पुतळेनें त्याची निर्भर्त्सना करून त्याला कर्तव्योन्मुख केल्यामुळेच राजपुत्राच्या रक्षणार्थ पानगावीं जाऊ शकला, व त्याने आपली कामगिरी सोळा आणे बजावल्या

बद्दल पेशव्यानीं त्या नवराबायकोंना त्याचा राहता गांव इनामही करून दिला होता. त्या गावीं पुतळा व प्रतापराव यानीं महिनाभर सुखाचा ससारही केला. पण थोरल्या राणीला तें सहन झालें नाहीं. तिला भय होतें, पुतळा परत धाकट्या राणीच्या पदरीं नोकरीला तर जाणार नाहीं ना ? आणि ती गेली तर आपल्याकडचीं सर्व कारस्थानें धाकट्या राणीला कळून आपल्या साऱ्या बेताचें ओंफस होईल ! शिवाय गमाजी व त्याचा हुजऱ्या तुळाजी याचाही एकमेकाना नकळत पुतळेवर डोळा होताच. प्रतापराव पानगावीं ठार मारला गेला अशी वार्ता कानीं येताच त्या दोघानाही कमालीचा आनंद झाला होता. आता ही ससारात वाट चुकून निराधार बनलेली हरिणी आपल्या हातीं लागेल, असें पुतळेविषयीं त्याना वाटत होतें. पण प्रतापराव आला व त्या जोडप्याला राहता गाव इनाम मिळाला, त्याचा ससार सुखाचा चालू लागला हे पाहून त्या राहू—केतूच्या पापवासनेचें तोंड काळें झालें. तरीही त्यानीं—विशेषतः तुळाजीने नाउमेद न होता पुतळेविषयीं भलभलत्या कड्या पिकवून व ती फितूर झाली आहे अशा लटक्या सबबीनें थोरल्या राणीचें मन तिच्याविषयीं कलुषित करून तिचा गाव थोरल्या राणीमार्फत जप्तींत काढावयाला लावला व तिला पकडून थोरल्या राणीच्या पायापाशीं आणविण्यात आले. याप्रमाणें बिचारी पुतळा पुन्हा राजवाड्यात दासी-पणाच्या कामाच्या घाण्याला जुपली गेली, व तिची आणि प्रतापरावाची ताटा-तूट होऊन शिवाय प्रतापरावाचीही अन्नान्नदशा झाली. अखेर तो चिटणिसां-च्या पदरीं आश्रयासाठीं येऊन त्याची सेवा करून राहू लागला. थोड्या दिवसात पुतळेनें थोरल्या राणीला पूर्ववत् प्रसन्न करून घेऊन स्वतःचा गरिबीचा ससार थाटण्याला परवानगी मिळविली, व दोघेंही नवराबायको आतां चिटणिसानीं त्याना बाजीराव पेठेंत कोटेश्वराशेजारीं पेशव्याकडून बक्षीस देवविलेल्या लहानशा खोपटात गरिबीचा सुखाचा ससार करूं लागलीं होतीं.

याप्रमाणें पुतळेनें जरी पुन्हा सुखाचे दिवस पाहिले, तरी ती आपणाला निष्कारण दुःख देणाऱ्या शत्रूना विसरली नव्हती, व त्यांचीही तिच्यावरील पापी दृष्टि लेशमात्र ढळली नव्हती. त्याच्या वरकरणीं समाधानाच्या राखेच्या आवरणाखालीं द्वेषाग्नि धुमसत होता.

# कादंबरीमय पेशवाई

थोरल्या राणीनें पुतळेला आपल्या पदरीं बळेंच ओढून आणलें, तेव्हां-पासून पुतळा तिची सेवा करीत होती. पण राणी मात्र अधून मधून तिला मागच्यासारखे टोमणे देण्याला चुकत नसे. त्यातलाच आजचा प्रकार.

"तसें नव्हे ग! मीं आपले उगाच थट्टेनें म्हटलें. पण कशी झाली तरी ती राणीच ना? माझा आणि तिचा एरव्हीं कितीही दावा असला तरी तिने मरावे असें मला कधींतरी वाटेल का? तिला गुण पडावा म्हणून मीं किती नवस सायास चालविले आहेत ते तू पाहतेच आहेस."

"आपण पुण्यवत महासाध्वी! आपल्या पुण्यायीनें तरी त्याना एकदाचा गुण पडो" पुतळा म्हणाली.

"माझी पुण्यायी कसली? देवाची कृपा झाली तर सर्व कांहीं नीट होईल. प्रयत्न करणे तेवढे आपल्या हातीं आहे कोणाला आयुष्य घालणें थोडेच आपल्या हातीं आहे! पाहू देव काय करतो तें."

"हें पाहा, धाकट्या राणीला गुण पडावा म्हणून मी देवीला मुद्दाम अनुष्ठान करवून देवीचे हें तीर्थ आणविले आहे. एवढे नेऊन धाकट्या राणीसाहेबाना दे, आणि ताबडतोब तुझ्यासमक्ष तू त्याना तें घ्यायला लाव. त्याना हें सारे साग आणि म्हणावे, भिऊ नका, देवीच्या कृपेने तुम्हाला लौकरच गुण वाटेल"

पुतळा म्हणजे कोणी परकी दासी नव्हे. ती इतकीं वर्षे दोन्ही राण्याच्या सगतीत रुळलेली. सकवारबाई धाकट्या राणीचा किती दुष्टावा करते तें तिला पूर्ण माहीत त्या धाकट्या राणीला सवतीची इतकी कळकळ कशी उत्पन्न झाली? पाषाणाला फुलें कशीं फुलली? क्रूर वाघिणीची गरीब गाय कशी बनली? विस्तवाच्या अगीं गारवा कोठून आला?

पण पुतळा न बोलून शहाणी होती. आपण दासी पडलो, आपल्या शब्दाला सकवारबाईपाशीं कवडीचीही किंमत नाहीं, हें पूर्णपणें ओळखूनच ती वागे. तिला त्या तीर्थाचा मनातून जबर सशय आला. पण तो चर्येवर मुळींच न दर्शविता ती 'बरे आहे' असे म्हणून तेथून निघाली. ती सकवार-बाईच्या महालाबाहेर पडावयाला व धाकट्या राणीची दासी जिजा तेथें येऊन पोंचावयाला एक गाठ पडली.

पुतळा थबकून क्षणभर जागच्या जागीं उभी राहिली.

# पेशवाईचा मध्यान्ह

"काय ग?" सकवारबाईनें कपाळाला आठ्या घालून जिजाला विचारलें.

जिजा सकवारबाईची ती रागीट व तिरस्काराने जळमटलेली मुद्रा पाहून मनातल्या मनात किंचित् हिंपुटी होऊन म्हणाली, "धाकट्या आईसाहेब फार आजारी आहेत. . . ."

"ते मला माहीत आहे मीं म्हटलें, त्यापुढची काहीं शुभवार्ता सागायला आली असशील!" सकवारबाई उद्गारली.

पुतळेनें हातातील तीर्थ व सकवारबाईच्या मुखातून आताच निघालेले बोल याचा आपल्या मनाशीं काय मेळ घालावयाचा तो घातला. जिजालाही ते फार चमत्कारिक वाटले. पण करते काय! तीही बोलून चालून दासी पडली. जशास तसें उत्तर देण्याचा अधिकार तिला थोडाच होता!

"धाकट्या आईसाहेबाचा आता काहीं घटकाचाही भरवसा देववत नाहीं. आपण त्याना भेटाल ती अखेरचीच भेट ठरेल कीं काय असें भय सर्वाना वाटू लागले आहे" जिजा अदबीनें म्हणाली.

"असे भय वाटायची ही काहीं पहिली वेळ नव्हे. ही शिळोप्याची गप्प आजवर मीं कितीदा तरी ऐकली आहे. आता मरत्ये आणि घटकेंत मरत्यें असे सागून सभोवारच्या लोकाना फसवायची कला तुझ्या धाकट्या बाईसाहेबाना चागली साधली आहे"

"त्या रोजच्या वेळा निराळ्या आणि आजची वेळ निराळी." जिजा उत्तरली.

"का? आज आपण खात्रीनें एका घटकेच्या आत हें जग सोडून जाणार असे त्यानीं सागितलें आहे का? तसे असलें तर साग. म्हणजे मी येत्यें. त्या येण्याचा काहीं उपयोग झाला तर ठीक नाहींतर आपल्या रोज बसा खेपा घालीत. सदा मरे त्याला कोण रडे?"

जिजा यावर काय बोलणार! ती स्तब्ध उभी राहिली. पुतळा तो दोघीचा सवाद ऐकत मुद्दाम तेथेच उभी होती. आपला सकवारबाईला सशय येऊ नये म्हणून तिने मुद्दाम मध्येंच विचारलें, "धाकट्या आईसाहेबाना आणखी काहीं निरोप सागायचा आहे का? तेवढे विचारण्यासाठीं मी थाबल्यें आहे.

महाराजाची धाकटी राणी आताशा विशेष आवडती झालेली, तिच्याशीं आपण तिच्या आयुष्याच्या अखेरच्या क्षणालाही जर इतकी बाकाची वागणूक

ठेवली, तर महाराजाना तें रुचणार नाहीं व महाराजाच्या त्या रोषाचा परिणाम आपणाला पुढे दत्तक प्रकरणीं भोगावा लागेल, इतका दूरवर विचार करून सकवारबाई पुतळेला म्हणाली, "तू जरा थाब." लगेच ती जिजा कडे वळून तिला म्हणाली, "जा तू, मी इतक्यात येतें आहें असें साग." लगेच ती वस्त्रपालट करण्यासाठीं अतर्महालात गेली.

पुतळेला मनातून कमालीची हळहळ वाटली.

सकवारबाईनें धाकट्या राणीला देण्यासाठीं तीर्थ म्हणून पुढें केलें त्यांत विष कालविलेलें असावें असा तिला संशय होता. तें विष कोणालाही न कळता गुपचूप ओतून टाकून त्या ऐवजीं शुद्ध पाणी पेल्यातून धाकट्या राणीसाहेबाना पाजावें, हा डाव तिनें आपल्या मनात तेव्हा रचिला होता. पण तो कांहीं साधला नाहीं. आपण धाकट्या राणीच्या खुनाला कारण होणार ह्या जाणिवेनें पुतळेला अगदीं हैराण करून सोडण्याला सुरुवात केली. पण सकवारबाई तिला आपल्या दृष्टीपुढून दूर जाऊ देईना, तिथे तिचा तरी काय इलाज! आता ती दूर जाण्याचा यत्न करणार, तोच तिला सकवारबाईनें हाक मारली.

"काय आईसाहेब?" पुतळेनें सकवारबाईच्या अतर्महालात धावत जाऊन विचारलें. त्या तीर्थरूपी विषाची अदलाबदल करण्याला अवसर मिळाला नाहीं तर नाहीं, आपण ठेंच लागल्याचें निमित्त करून तें विष साडून टाकलें तर कसें होईल असा एक विचार तेव्हा तिच्या मनात घोळू लागला होता.

पण पुतळेचा तोही विचार व्यर्थ ठरला. सकवारबाई तिला म्हणाली, "अग! तुला अशासाठीं हाक मारली, तें तीर्थ खालीं ठेव. मी दुसऱ्या दासीला बरोबर घेऊन धाकट्या राणीच्या समाचाराला जाणार आहें. तीच तीर्थ घेऊन माझ्याबरोबर येईल."

"का? मी येत्यें ना आपणाबरोबर!" पुतळा मनातून जास्तच हळहळत पण बाह्यात्कारीं आज्ञाधारकपणें म्हणाली.

"तूं नको येऊस. तुला मी दुसरी एक महत्त्वाची कामगिरी सांगणार आहें."

"बरें, सागावी कायती."

"पण अगदीं या कानाचें त्या कानाला न कळतां काम केलें पाहिजे. काय समजलीस?"

# पेशवाईचा मध्यान्ह

" आजवर मीं आपलीं जबाबदारीचीं कामें पार पाडलीं नाहींत का ! त्यांचा माझ्याकडून कधींतरी बोभाटा झाला का ? "

" नाहीं. म्हणूनच तर तुझ्यावर माझा एवढा भरवसा आहे. हें पहा, गडावर जाऊन ताराबाई आईसाहेबांच्या वाड्यात कोण कोण मडळी आहेत, त्याचीं काय काय खलबतें चाललीं आहेत, याचा अमळ कानोसा घेऊन ये. जाशील ती सहज, धाकट्या राणीची प्रकृति काळजी करण्यासारखी आहे हें त्याना कळवण्यासाठीं म्हणून जा. तूं माघारी येतेस तोंवर मीही तिकडे जाऊन येत्येंच. "

पुतळेला आता त्या कामगिरीवर जाणें भागच होतें. कारण मालकिणी-ची आज्ञा ! आता तें विषरूपी तीर्थ सकवारबाई धाकट्या राणीला प्राशन करावयाला लावणार व अशा प्रकारें धाकट्या राणीचा खून करणार, ह्या जाणिवेनें आपलें अतःकरण कोणीतरी काट्यावरून फरफरा ओढून त्याच्या फाडफाडून जणू चिंधड्या करीत आहे, अशा प्रकारच्या वेदना तिच्या अंत-करणात होत होत्या.

पुतळा गडावर निघून गेल्यावर सकवारबाईनें वस्त्रातर आटोपताच दुसऱ्या एका दासीला हाक मारली, व तो तीर्थाचा पेला त्या दासीच्या हातीं देऊन तिला पाहूनच धाकट्या राणीनें आपले पेशव्याच्या गौरवपर बोल आवरते घेतले होते.

## प्रकरण ४ थें

# धाकट्या राणीचा अंत

तो देखावा सकवारबाईला न रुचो, पण एरव्हीं तो पाषाणालाही पाझर फोडणारा होता!

एवढ्या धनतर मराठी साम्राज्याचे धनी शाहूमहाराज आपल्या त्या आवडत्या राणीच्या उशाशीं बसून एखाद्या लहानग्या लेकराप्रमाणें अश्रु ढाळीत होते. सभोंवती उभ्या असणाऱ्या दासी वगैरे मंडळीच्या चर्येवर पूर्ण उदासीनता पसरलेली दिसत होती जिजाही खिन्न वदनानें धाकट्या राणीच्या पायथ्याशीं उभी होती.

पण सकवारबाईनें दासींसह त्या महालात प्रवेश करताच तो देखावा पाहिला मात्र, त्याबरोबर तिच्या सर्वांगाची सवतीमत्सरजन्य संतापानें नुसती लाही लाही झाली. इतकी महाराजांनीं धाकट्या राणीची काळजी वहावी म्हणजे काय! पण सकवारबाईनें तो संताप मनातल्या मनात गिळला बरो-बर आलेल्या दासीच्या हातीं तीर्थपात्र होतें तिकडे तिने एकवार पाहिलें. तिच्या चित्ताचें राक्षसी समाधान त्या तीर्थात साठलेलें होतें. जिजा तेथे उभी असलेली पाहून तिला प्रथमदर्शनीं शंका आली कीं आपण दुरुत्तरे बोलल्याचे जिजानें इथें येऊन सांगितले तर नसेल ना! पण दुसऱ्याच क्षणाला तिची तिलाच ती बाबत अशक्य कोटींतली वाटली. धाकट्या राणीचा स्वभाव तसा चौकस होता, व ती वारंवार अशी चौकशी करीही. त्यामुळें तिच्या दासदासीं-नाही ऐकलेल्या अथवा पाहिलेल्या गोष्टी पदरचे तिखटमीठ लावून सांगण्याला हुरूप येत असे. पण आज तशी स्थिति नव्हती, जिजाही काळ वेळ पाहून वागण्याइतकी धूर्त होती म्हणूनच ती सकवारबाईच्या महालात काय प्रकार घडला तो गिळून स्तब्ध होती.

सकवारबाईला पाहताच धाकट्या राणीला अत्यंत समाधान वाटले. कोमेजून निर्जीव होऊन भुईतळीं पडलेल्या फुलावर दहिंवराचे चार थेंब पडल्यावर त्याला क्षणभर टवटवी यावी त्याप्रमाणें धाकटी राणी हसण्याचा प्रयत्न करीत म्हणाली, ' या बाई ! तुम्ही आला मला समाधान वाटले. राग रुसवा मनात काहींदेखील न धरता तुम्ही मला भेट देण्याची कृपा केली, हे खरोखर माझ्यावर डोंगराएवढे उपकार झाले."

"राग रुसवा कसला घेऊन बसला बाई ! तें ज्या वेळचे त्या वेळीं. हें असे चालायचेंच. भाड्याला भाडे लागलें कीं नाद निघायचाच तें मनात ठेवून का कधीं कुणाचा पल्ला आला आहे ? माझ्या मनात ईश्वरसाक्ष तें काहींदेखील नाहीं, आणि तुम्हीदेखील तसले काही मनात आणून उगीच मनाला त्रास करून घेऊ नका. मी यापूर्वीच तुमच्या समाचाराला येणार होत्यें. पण म्हटलें नुसता समाचार घेऊन काय घ्यायचा ? तुमची ही दशाच पाह्यची कीं नाहीं ? पण माझा देवीवर भरवसा आहे. तुम्ही आजारी पडल्यापासून तुम्हाला गुण पडावा म्हणून मी कितीतरी देवाना नवस बोलल्यें आहें, आणि जपजाप्य अनुष्ठानें तर चाललींच आहेत कोणीं काहीं तर कोणीं काहीं जे जें सागावें, तें तें मी निष्ठेनें करीत आहे काल एका सत्पुरुषानें स्वप्नात येऊन सागितलें कीं देवीला अनुष्ठान करून देवीचें तीर्थ तुम्हाला प्यायला द्यावे म्हणजे ताबडतोब आराम पडेल. लगेच उजाडताच प्रथम देवीला अनुष्ठान करविले, आणि हें तीर्थ आणले आहे. हें घेणार ना ?" असें म्हणून सकवारबाईनें दासीच्या हातातून तीर्थपात्र आपल्या हातीं घेतलें.

महाराज किंचित् बाजूला सरकले. धाकट्या राणीनें मुकाट्यानें पाखरासारखा टाळा पसरला सकवारबाईनें तें तीर्थ तिच्या मुखीं घातलें. धाकट्या राणीला आपली आयुष्यघटका आता भरत आली आहे हे जरी पक्कें माहीत होतें, तरी तिनें श्रद्धापूर्वक त्या तीर्थाचा आवढा गिळला. कधीं नव्हत्याची सकवारबाई आज प्रेमळपणानें निच्याशीं बोलत होती व इतकी कळकळ दाखवीत होती. तो सवतीमत्सराचा वणवा आपल्या आयुष्याच्या अखेरच्या क्षणाला का होईना पण विझलेला पाहून धाकट्या राणीला हायसें वाटले. स्वतःचा मृत्यु टळेल व स्वतःचे पाय पुन्हा जमिनीला लागतील ह्या आशेनें नव्हे, तर सभोंवारच्या मंडळीला—विशेषतः सकवारबाई व महाराज याना

समाधान वाटण्यासाठीं धाकट्या राणीनें तें तीर्थ सेवन केलें. तिच्या घशाला कोरड पडली होती, ती मात्र त्या ओलाव्यानें अमळ कमी झाली व तिला दोन शब्द बोलावयाला हुरूप आला.

" बाई! तुम्ही माझ्या आयुष्याची दोरी बळकट करण्यासाठीं इतके श्रम घेतले, ह्या तुमच्या उपकाराची फेड ह्या जन्मीं माझ्या हातून होणें शक्य नाहीं. देवाची इच्छा मीं त्याच्या चरणीं लौकर जावें अशी आहे. मी आता अवघी अर्ध्या पाव घटकेची सोबतीण आहें... " बोलता बोलता थकवा आल्यामुळें धाकटी राणी किंचित् उसत घेऊन पुन्हा बोलूं लागली, " तुमची भेट मला एवढ्याचसाठीं घ्यायची होती,– मी तर आता जाणार. आतां महाराजांची काळजी घेण्याची जबाबदारी एकट्या तुमच्या शिरावर येऊन पडली आहे. आधींच एकाहून एक दारुण दुःखाचे असे एकाहून एक कठोर वज्राघात सहन करून त्यांच्या दुःखाला पारावार नाहींसा झाला आहे. त्यात आणखी राजकारणातील भानगडींची भर. त्या भानगडी मिटाव्या म्हणून एकदम थोड्याच मिटतात! पण तुमच्या हातीं जेवढें म्हणून आहे तेवढें करून तुम्हीं महाराजाना सुखी करा. घरगुती कलह आता मी गेल्यें कीं माझ्याबरोबरच लयाला गेले असें म्हणायला हरकत नाहीं. आता सर्वांच्या मनाला टोंचून राहिलेली एकच बाब आहे; ती दत्तकाची. त्या बाबतींत तुम्ही महाराजाचें मन दुखवू नये. दोघानीं एका विचारानें योग्य तो दत्तक घ्यावा; आणि आपल्या आयुष्याचे अखेरचे दिवस आनदात घालवावे बाई! एवढी कृपा तुम्ही माझ्यावर करणार ना? "

केवढा व्यापक व महत्त्वाचा हा प्रश्न! त्या एका प्रश्नावर दृष्टि ठेवूनच मराठशाहींतील सारे लहानमोठे मुत्सद्दी राजकारणाचे डाव खेळत होते. पण मृत्युपंथाला लागलेल्या धाकट्या राणीला त्या गोष्टी सागून काय करावयाचें आहे, असा विचार करून सकवारबाई तिला म्हणाली, " तुम्ही बोलू नका बरें! मुळींच बोलूं नका. देवदया होईल तर सर्व काहीं सर्वांच्या मनाजोगें होईल. असल्या गोष्टी मनात आणून तुम्ही मनाला मुळींच ताप करून घेऊ नका. देवाचें नाव घ्या—रामराम म्हणा. " लगेच तिनें गीतापाठ करणाऱ्या ब्राह्मणाला जवळ बोलावून गीता वाचावयाला बसविलें. तिच्या मनात त्या-वेळीं निराळेच—त्या विषारी तीर्थाचे—विचार घोळत होते. महत्प्रयासांनीं व

अत्यंत गुप्तपणें संपादन केलेलें तें जहर धाकटया राणीचें आयुष्य खास संपुष्टांत आणणार व राजमाता होऊन प्रत्यक्ष राज्यकारभार करण्याच्या आपल्या सर्व महत्त्वाकांक्षा आता फलद्रूप होणार, अशा आसुरी आनंदाच्या उकळ्या त्या वेळीं त्या मायाविनीच्या मनात उसळूं लागल्या होत्या.

"पण माझी विनंति तुम्हीं मान्य केली ना?" धाकटया राणीनें मरण-वाटेच्या खोल आवाजानें कण्हत म्हटले, "तर मला तसें वचन द्या!" असें म्हणून धाकटया राणीनें आपला कृश हस्त पुढें केला.

सकवारबाईनें मुकाटयाने धाकटया राणीच्या हातावर हात दिला.

"आता निश्चिंतपणे हा लोक सोडून जायला मला मोकळीक झाली." धाकटी राणी दम छाटेना म्हणून मधून मधून उसत घेत बोलूं लागली, "बाई! आपल्या अजाणपणाच्या वर्तणुकीमुळें आजवर महाराजाना किती-तरी त्रास सोसावा लागला, व राजवटीचेंही फारच नुकसान झालें आहे. मला तरी वाटतें कीं राजवटींत आज जी दुही माजलेली आहे, तिला कारण आमचे आपसातील कलहच होत मी याबद्दल तुम्हालाच दोष देतें असें नाहीं, मी स्वतः त्या दोषाला तुमच्यापेक्षाही जास्त पात्र आहें. पण आतां ते सर्व प्रश्न आपोआपच मिटत आहेत. तुमच्या वाटेतील विरोधाच्या सर्व घरगुती अडचणी आता दूर झाल्यासारख्याच आहेत. आता राजवशात तुम्ही कराल तें होणारें आहे. त्याबरोबरच महाराजाना फुलात घालून वागवण्याची, त्याना सर्वतोपरी सुख देण्याची जबाबदारी तुमच्यावर आहे...माझ्याच्यानें जास्त बोलवत नाहीं."...असें म्हणून ती बोलावयाची एकदम थाबली. तिचा शक्तिपात फारच झपाट्यानें होत होता.

क्षणभर सर्वत्र भीषण स्तब्धता पसरली. मधून मधून सकवारबाई मात्र मायावी बोल बोलत होती. जणू काय धाकट्या राणीच्या अंतकाळच्या यातनानीं तिचें हृदय शतधाविदीर्ण होत होतें. त्या नाटकी दुःखानें कळवळत तिनें वैद्यराजाना हाक मारली. वैद्यराज समोर येऊन उभे राहिले. पण त्यानीं काहीं औषधयोजना सुचविण्यापूर्वींच धाकट्या राणीनें काहीं नको अशी खूण केली. वैद्यराज जागच्याजागींच थबकून उभे राहिले. तोंच पुतळा तेथें आली व सकवारबाईला म्हणाली, "ताराबाई आईसाहेबाना मीं धाकटया आईसाहेबा-च्या आजारीपणाची बातमी सांगितली, त्यावरून त्याची इकडे समाचाराला

येण्याची फार इच्छा आहे. त्यानीं महाराजाची परवानगी विचारली आहे."

ताराबाईने आपण होऊन धाकट्या राणीच्या समाचाराला येण्याची इच्छा प्रदर्शित करणें हा एक प्रकारें धाकट्या राणीचा गौरवच होता. महाराजाना त्यात केवढेंतरी भूषण वाटलें ते म्हणाले, "त्याना येऊ द्या."

"कशाला ? काहीं नको." सकवारबाई म्हणाली. कुणाला कशाचें आणि सकवारबाईला दत्तकाचें ! न जाणो, ताराबाई व धाकटी राणी याची भेट होऊन दोघींत काहीं सगनमत ठरले व दोघींनीं मिळून महाराजाना एखादी भीड घातली तर आपल्या योजनेचा अगदींच बोजवारा उडावयाचा, ह्या भयास्तव त्या दोघींची मुळीं भेटच होऊ नये अशी सकवारबाईची इच्छा होती.

धाकट्या राणीने पुतळेला पाहताच चर्येवर तिरस्कार दाखविला खरा; पण ताराबाईचे नाव ऐकताच तिला किंचित् समाधान वाटलें असावें. तिला समाधान का वाटणार नाहीं ! ताराबाई महाराजाच्या सर्व राण्याना आपल्या वैरिणी मानी, व राण्याही तिला त्याच मोलाने लेखीत. असें असताही ताराबाईविषयीं धाकट्या राणीच्या मनात फार आदरभाव वसत होता, व तो आदरभाव ती वेळ येई तेव्हा तेव्हा उघडपणें बोलूनही दाखवी. आता, दोघींच्याही भूमिका परस्पराच्या अगदीं विरुद्ध पडल्या, तिथे कोणाचा काय इलाज ! सकवारबाईचे मात्र तसे नव्हतें. ती स्वतःपुढें दुसऱ्या कोणाचेंही शहाणपण कबूल करावयाला तयार नव्हती. ती मनातून ताराबाईला जणू कस्पटासमानच लेखीत होती.

धाकट्या राणीनें ताराबाईचे नाव कानीं पडताच दोन्ही हात सद्भावानें जोडून नमस्कार करण्याचा प्रयत्न केला. तिने अर्थात् त्या कर्तबगार वडील स्त्रीला भक्तिभावानें केलेला तो नमस्कार होता. त्याहीपेक्षा गभीर व खोल अर्थ त्या नमस्कारात भरलेला होता, तोदेखील लगेच काहीं क्षणात तेथील सर्व मंडळीच्या ध्यानीं आला. थोरल्या राणीच्या अस्थानीं विरोधाला न जुमानता ताराबाईला तेथें धाकट्या राणीच्या भेटीला येऊ द्यावें कीं न द्यावें याचा विचार करण्यात महाराज क्षणभर गढून गेले असतानाच धाकट्या राणीला रक्ताची एक गुळणी आली आणि लगेच सारा कारभार आटोपला. त्या-

बरोबर महाराजानीं 'हाय !' असें म्हणून कपाळावर हात मारून घेऊन धाडकन् जमिनीवर अग टाकलें. इतर सर्व मडळीलाही अत्यत दुःख झालें. पुतळेकडे पाहून धाकट्या राणीने जरी तिरस्कार दर्शविला होता, तरी पुतळेला धाकट्या धनिणीचा शेवट झालेला पाहून इतकी हळहळ वाटली कीं तितकी हळहळ महाराजाखेरीज दुसऱ्या कोणालाही वाटली नसेल.

सकवारबाईनेंही तोंडदेखलें दुःख करून दाखविले खरें. पण तेव्हा कोणीं तिच्या अतःकरणाचा ठाव घेतला असता तर तिला आनद वाटल्याचेंच दिसून आलें असतें आपण विषतीर्थ जें धाकट्या राणीला आणून प्राशन करविलें त्याचाच हा प्रभाव होय असे मनात समजून सकवारबाई तेव्हा त्या कृष्णकृत्यातील आपल्या विश्वासू हस्तकाला—गमाजीला शाबासकी देत होती.

हा हा म्हणता धाकट्या राणीची निधनवार्ता साऱ्या सातारा नगरात पसरली. त्यामुळें सर्व प्रजाजनाना खेद होणे अगदीं स्वाभाविक होतें. परतु ती वार्ता ऐकून सारी जनता दुःखसागरात बुडून गेली, असला काहींच प्रकार झाला नाहीं. राणीच ती, तिच्या निधनाविषयीं शोक प्रदर्शित करणे हें रयतेचे मामुली कामच होते. राजपुरुषाविषयीं मनात आदर असो किंवा नसो, त्याच्या आयुष्यातील शुभप्रसगी आनद मानणे व अशुभ प्रसगीं दुःखी होणे, ह्या सक्तीच्या प्रजाधर्मापासून कोणत्या प्रजाजनाची कधीं मोकळीक झाली आहे! परतु हें लौकिकाचे बधन मानणे न मानणे जर रयतेच्या मर्जीवर अवलबून ठेवले, तर अप्रिय राजपुरुषाच्या सुखदुःखात भागीदार होण्यासाठीं किती रयत अहमहमिकेनें पुढे येतील याची वानवाच आहे. धाकट्या राणीचा स्वभाव निवळला होता खरा, पण तो अगदीं अलीकडे त्यापूर्वी तिची काय किंवा सकवारबाईची काय, भाडखोर कजाग बायका अशीच सर्वत्र कुप्रसिद्धी होती. महाराजावर मात्र रयतेचें मनापासून प्रेम, व त्या भोळ्या साबाला ह्या कैदाशिणी उगाच गाजतात म्हणून त्याच्यावर सर्वांचा राग अलीकडे धाकटी राणी समजसपणें वागू लागली होती हें महाराजाना व सभोवारच्या थोड्या लोकाना माहीत इतराना तें काय माहीत!

तरीपण मनासाठी नाहीं तरी जनासाठीं सारा जनसमाज धाकट्या राणीची निधनवार्ता ऐकून अगदीं शोकाकुल होऊन गेला. धाकट्या राणीची प्रेतयात्रा निघाली तेव्हा अर्धे नगर तरी त्या यात्रेला लोटले असेल. माहुलीच्या पवित्र

क्षेत्रीं संगमतीर्थावर साध्वी विरूबाईला पूर्वी जेथें दहन करण्यात आलें होतें व तिचें स्मारक म्हणून त्या दहनभूमीवर वृंदावन उभारण्यात आलें होतें, त्याच्या शेजारींच धाकटया राणीचा नश्वर देह समत्र अग्निनारायणाला अर्पण करण्यात आला. सकवारबाई व तिचे स्वार्थी पक्षपाती जे होते, त्याना हायसें वाटलें कीं वारवार महाराजाच्या कानाशीं लागून आपल्या एकसूत्री कारस्थानात बिघाड उत्पन्न करणारी पिडा नाहींशी झाली, फार चागलें झालें. पण राजवटीच्या शाश्वत कल्याणाविषयीं ज्याना कळकळ वाटत होती, त्याना दहशत उत्पन्न झाली कीं सकवारबाई वगैरे मडळीच्या देशविघातक उपद्-व्यापाना धाकटया राणीच्या समयसूचकतेमुळें थोडा तरी आळा आजवर पडे, तो आता नाहींसा झाला; आता सकवारबाई निर्भयपणे नवे नवे बखेडे माजवून राजवटीची कशी वाताहात करील याचा कोणाला काहीं भरंवसा वाटेना.

सकवारबाई स्वतः काहीं प्रेतयात्रेबरोबर गेली नव्हती. तिकडे माहुलीला धाकटया राणीच्या प्रेताला मत्राग्नि दिला जात असताना ती बया रगमहालात गमाजीचा त्याने पार पाडलेल्या कामगिरीबद्दल गौरव करण्यात व आपल्या मार्गातील काटा दूर झाला या आनदात दत्तकाचे पुढील बेत रचण्यात गढून गेली होती!

धाकटया राणीचा नश्वर देह अग्निनारायणाला अर्पण केल्यावर प्रेतयात्रेबरोबर आलेली सर्व कारभारी मडळी व इतर सर्व लोक खिन्नावलेल्या अतःकरणानें महाराजामागोमाग माघारे परतले. महाराजानीं त्या दुःखातिरेकाच्या भरांत सर्वसगपरित्याग करून आपल्या आयुष्यातील अखेरचे दिवस वनवासवाडीला वनवासांत काढण्याचें ठरविलें. चिटणीस वगैरे कळकळीच्या कारभारी मडळीनें त्याचें पुष्कळ शातवन करून पाहिलें. पण त्याचा काहींदेखील उपयोग झाला नाहीं. महाराजानीं त्या सर्व मडळीला एकच उत्तर दिलें, "आमच्या ससाराची अखेरची शोभा हरपली. विरूबाई आम्हाला सोडून गेली तेव्हाच आमचें बहुतेक सारें गृहसौख्य विलयाला गेलें. त्यानतर अलीकडे धाकटया राणीच्या सहवासात नुक्ते कोठें सुखानें दिवस जाऊ लागले होते. परतु देवाजीला तेंही बघवलें नाहीं. धाकटी राणी गेली, आतां आमचा ससार आटोपला. राजवाडा आम्हांला आतां

स्मशानवत् भासतो. त्या स्मशानात येऊन वास करण्याचा आग्रह आम्हांला कोणीं करूं नये."

महाराजाची कींव करण्याजोगी गृहस्थिति सर्वांना माहीत होती. म्हणूनच त्याना संसाराविषयीं उत्पन्न झालेला उद्वेग अस्थानीं आहे असें म्हणण्याची कोणाचीही छाती नव्हती. त्यानीतरी सकवारबाईच्या वर्तनाचें समर्थन कोणत्या तोंडानें करावें ! येऊन जाऊन त्या मंडळीला महाराजाची राजधानींत परत जाऊन वास्तव्य करण्याविषयीं विनति करण्याला एकच कारण होतें; राज–वटीचें पुढें कसें होईल हें !

परंतु महाराजानीं आपण होऊनच तो प्रश्न सोडविला. त्यानीं चिटणिसांना आज्ञा केली, " चिटणीस ! नाना कुठें असेल तेथून त्याला तातडीनें बोलावून घ्या. आमचा आता फारा दिवसाचा भरवसा नाहीं, आम्ही आज आहों ते उद्या असूंच असें नाहीं, असें त्याला स्पष्ट खुलाशानें लिहा; व त्याबरोबरच राजवटीची पुढील आबादीआबाद राखण्यासाठीं काय तरतूद करावयाची ती करण्यासाठीं ताबडतोब जेवीत असशील तर आचवण्याला साताऱ्याला ये असें लिहा. नाना आला व हा सारा राजवटीचा पसारा तुम्हा सर्वांच्या साक्षीनें त्याच्या गळ्यात घातला, कीं आम्हाला मरावयाला मोकळीक झाली. "

महाराजानीं वरील उद्गार काढले तेव्हा तेथें चिटणिसाबरोबरच प्रतिनिधि, यमाजी शिवदेव, देवराव मेघःश्याम वगैरे मंडळीही होती. महाराज राज-वटीचा सर्व भार तरुण व कर्तबगार नानासाहेब पेशव्यावर सोंपविण्याला स्वसंतोषाने तयार असलेले पाहून चिटणिसाना जितका आनंद झाला, तितकाच पेशव्याच्या प्रतिस्पर्धी मंडळीला विषाद वाटला. चिटणिसानीं त्याच क्षणीं आपल्या मनानें महाराजाच्या त्या शुभेच्छेचा पाठपुरावा करण्याचा निर्धार केला. तेव्हाच प्रतिनिधि, यमाजी शिवदेव वगैरे प्रतिस्पर्धी मंडळीनें मनात खूणगांठ बांधली कीं खरी आणीबाणीची वेळ हीच आहे.

इकडे महाराजाची अवस्था तर शरपंजरीं पडलेल्या भीष्मासारखी झाली होती. अशा वेळीं करील त्याचा कारभार व मारील त्याची तरवार हें ठरल्या-सारखेंच होतें. म्हणूनच चिटणीस त्या दिवशींच पेशव्याना आणवून राज्य-कारभाराची घडी बसविण्याच्या उद्योगाला लागले, व प्रतिनिधि वगैरे मंडळी-चीं खलबतें पेशव्यांना शह देऊन राज्यकारभार आपल्या हातीं घेण्याचा हा

अखेरचा डाव कसा खेळावा याविषयीं आपसात सुरू झालीं. वास्तविक ते डाव प्रतिडाव खेळण्याचा उपक्रम त्यापूर्वींच सुरू झाला होता. परतु सकवारबाईच्या नेतृत्वाखालीं पेशव्याची राज्यकारभागातून कायमची उचलबागडी करण्याचा त्या विरोधी मडळीचा डाव मधल्या मध्येच यदृच्छेनें कुजून पेशव्यावरच महाराजानीं राजवटीचा कारभार पूर्ववत् सोपविल्यामुळे विरोधकाचीं नाकें परस्पर खाशी कापलीं गेलीं होतीं. त्या विरोधकाचा सर्व भार सकवारबाईवर! धाकटी राणी निजधामाला गेली, आता राज्याला वारस म्हणून दत्तक घ्यावयाचा तो महाराजाना सकवारबाईच्याच तत्रानें घ्यावा लागणार, ती आपल्या मुठीत राहणारा दत्तक मांडीवर घेणार व राज्याची सर्वाधिकारी होणार, मग पेशव्याची तळी उठून आपली पढरी पिकणार, असे मनोरथाचे मनोरे रचणाऱ्या त्या विरोधी लोकाना महाराजाचे स्मशानवैराग्यातील उद्गार कसेसेच वाटावे यात नवल ते काय!

पण ते उद्‌गार परमावधीच्या निराशेने दुबळे बनलेल्या महाराजाचे होते. त्या उद्‌गारासह महाराजाना आपण राणी सकवारबाईच्या नेतृत्वाखालीं अलग एका बाजूला गुडाळून ठेवू अशी त्या सर्वांना दाडगी उमेद होती.

धाकटी राणी कालवश झाली, तिची चिता पेटली व विझलीही. पण महाराजाच्या त्या उद्गाराच्या रूपाने त्या चिताग्नींतील ठिणगी जी तत्कालीन देशकालपरिस्थितीवर पडली, तिचा हा हा म्हणता केवढा मोठा डोम्बाडोम्ब होणार आहे व तो कोणाकोणाला भस्मसात् करून टाकणार आहे, याची तेव्हा कोणालाच कल्पना करता आली नाहीं.

माहुली क्षेत्रीं भाद्रपद शुद्ध ६ च्या दिवशीं रात्रीच्या वेळीं धडधड पेटणारी चिता राणी सगुणाबाईचीच होती, व त्या चितेपाशीं आपल्या दुःखाश्रूचा पाऊस पाडून चितेच्या साक्षीने, तेथेच थोरल्या राणी सकवारबाईची चिता पेटविण्याची घनघोर प्रतिज्ञा करणारी तरुण स्त्री ही पूर्वी सगुणाबाईची अत्यंत आवडती व थोड्या दिवसापूर्वी दैवयोगानें राणी सकवारबाईची दासी बनलेली पुतळाच होय.

आणि तो खलिता? तो कोणीं कोणाला पाठविला होता? तो कशासबधीं होता!

## प्रकरण ५ वें

# प्रतापरावाचा अंतकाल

तो भयंकर गलबला ऐकून पुतळा त्याच क्षणीं घारीच्या भरारीनें तिकडे धावत जाऊं लागली पण एकतर तो शुक्लपक्ष असूनही आकाश काळ्याकुट्ट जलमेघानीं व्यापून गेल्यामुळे चंद्रबिंबाचा व चांदण्याचाही कोठे मागमूस देखील नव्हता, त्या कारणानें पायाखालची वाट प्रकाशाच्या साह्याखेरीज दिसणें शक्य नव्हतें दुसरे, तो श्रावणाचा महिना शेतें व शेतातील रानही कोठें छातीभर तर कोठें डोईभर उगवलेले. अशा रानातून पायाखालची गोवडी वाट नेमकी कशी सापडणार? त्यातूनही नुसती वाट शोधून राजमार्गाला लागावयाचे असते तर पुतळा अडली नसती. ती जी साताऱ्याहून एकटीच काळोख्या अपरात्रीं माहुलीला आली व परतही चालली, ती प्रकाशाच्या अडचणीसाठीं थोडीच खोळंबून बसणार! पण त्याच वेळीं दुसरा एक विचार तिच्या मनात आला, व त्याने तिची गति कुंठित केली.

राजधनींत कारभारी मंडळात व महाराजाच्या अंतःपुरातही कोणाचा पायपोस कोणाच्या पायात नाहीं, इतका राजकारणाचा चुथडा झाल्याचें पुतळेला पूर्णपणे अवगत होते. तशात ती पडली सकवारबाईची दासी व सकवारबाई पडली स्वर्गवासी धाकट्या राणीची वैरीण! आपण धाकट्या राणीच्या चितेचें दर्शन घेण्यासाठी आल्याचें जर सकवारबाईला कळले तर तिच्या क्रोधानलात आपण केव्हाच जळून खाक होऊं, हें स्वप्न पुतळेला पूर्वींच पडलें होतें. तो प्रसंग जरी बिनबोभाट पार पडला, तरी इतक्या अवेळीं ह्या बाजूला आपणाला सकवारबाईच्या कोणा हस्तकानें पाहिलें व जाऊन चुगली केली, तर अशा अपरात्रीं इकडे आपण कशासाठीं आलों असें आपण सांगावें? सकवारबाईच्या हस्तकाचीच गोष्ट कशाला? दुसऱ्या कोणा त्रयस्थ

परिचितानें पाहिलें तरी तोदेखील असा संशय घ्यावयाला चुकणार नाहीं, हें ध्यानीं आणून पुतळा जागच्या जागींच थबकली. शिवाय पुतळा पुढें गेली असती, तरी पुरुषाच्या झगडयात तिचा थोडाच निभाव लागला असता!

तरीही पुतळा डोईभर उंच गवताच्या आडवशाला उभी राहून पायाच्या चवड्याच्या आधारावर मान शक्य तितकी उंचावून ज्या दिशेनें तिला 'मारा! त्या हरामखोराला ठार मारा..' वगैरे उद्गार ऐकू आले होते त्या दिशेच्या अनुरोधानें पाहत कान टवकारून उभी होती. तेथून तिला ओझरतें दृश्य काय दिसायचें तें दिसलें. एक घोडेस्वार पेटती मशाल हातीं घेऊन राजरस्त्यानें आपला घोडा दौडीत राजमार्गाने पुण्याच्या रोखानें चालला होता. तो घोडेस्वार कोण असावा हे जरी तिला ओळखता आलें नाहीं, तरी तो घोडा तिला दिसला, व एका पेटत्या मशालीचा झोतही दिसला, त्यावरून तिनें तसा तर्क केला. आणि त्याच्या मागोमाग थोड्या अंतरावरून आणखी एका पेटत्या मशालीचा झोत दिसून त्या प्रकाशात तीन चार घोडेही ओझरते दिसले. ते घोडेस्वारही ज्याअर्थी त्याच मार्गाने पुण्याच्या अनुरोधानें दौडत दौडत चालले होते व त्याच्यापैकींच कोणा एकाच्या तोंडून 'मारा त्या हरामखोराला...' वगैरे उद्गार निघालेले पुतळेच्या कानीं आले होते, त्याअर्थी तिनें नक्की कयास बांधला की पुढे दौडत जाणारा घोडेस्वार दिसला तो कसला तरी महत्त्वाचा खलिता घेऊन पुण्याच्या बाजूला कुठे तरी चालला असावा, व त्याच्यावर विरुद्ध पक्षाने ते घोडेस्वाररूपी शिकारी कुत्रे सोडले असावे. ज्याअर्थी इतक्या रातोरात पावसाळ्या रात्रीं तो घोडेस्वार तो कोणता तरी खलिता घेऊन घोडदौडीने एकटाच निघाला होता, त्याअर्थी त्याच्यावर त्याच्या धन्यानें अत्यंत महत्त्वाचें व अत्यंत निकडीचें असे काहींतरी काम सोंपविलें असलें पाहिजे हें उघड होते. ते घोडेस्वारही इतक्या निकरानें त्या आसुदावर तुटून पडत होते हें देखील त्या खलित्याच्या आत्यंतिक महत्त्वाचेंच एक ढोबळ प्रत्यंतर होतें.

"मारा—मारा त्या हरामखोराला ठार मारा! आणि त्याच्याजवळचा खलिता हिसकावून घ्या. एवढें काम तुम्हीं केलें तर मी तुम्हाला थोरल्या आईसाहेबांच्याकडून एकेक चांदीचा तोडा तुमच्या पायांत घालीन. अगदीं मागें पुढें पाहूं नका..."

पुतळेनें त्या पुढच्या घोडेस्वारावर तुटून पडणाऱ्या तिघाचौघापैकीं एकाच्या तोंडचे वरचे शद्ब ऐकले व अचब्यानें तोंडात बोटे घालून आपल्या मनाशीं उद्गार काढले, "काय, थोरल्या आईसाहेबाकडून बक्षीस? एकूण त्या कोणा जासुदावर हे मारेकरी त्या अवदसेनेंच घातले आहेत तर? घरात मर्तिक घडलेलें. सवतीची चिता अजून पुरी पेटून विझलीदेखील नाहीं. सारें नगर दुःखातिरेकानें पावसाशीं स्पर्धा करण्याजोगा अश्रूचा पावसाळा डोळ्यावाटे वर्षवीत असताना ह्या बयेला हीं कृष्णकारस्थानें सुचतात तरीं कशीं? धाकट्या राणीसाहेब मरणघडीवर पडल्या होत्या तेव्हाही तेंच, आणि त्याना वारून पुरे तीन प्रहरही लोटले नाहींत तोंच पुन्हा—पाषाणहृदयी खरी ग बाई, पाषाण-हृदयी ही चाडाळीण! देवा तू हिला उरफाटें काळीज दिले आहेस कारे?... पण तो जासूद तरी कोण असेल? आणि—थोरल्या राणीला इतक्या अपरात्रीं असल्या कृष्णकृत्याला प्रवृत्त करणारा इतका महत्त्वाचा तो खलिता..."

पुतळा ते वाक्य आपल्या मनाशीं देखील पुरतें बोलू शकली नाहीं. ती मनाशीं बोलत होती तरी तिचे डोळे समोरच्या भयकर दृश्यावर खिळलेले होते. पावसाळ्या रात्रीं विद्युल्लतेचे चमकणे एकसारखें दृष्टीसमोर चमकून जावे त्याप्रमाणे क्षणोक्षणीं पालटून अधिकाधिक गभीर होणारीं समोरच्या प्रसंगाचीं मूर्त स्थित्यतरें तिच्या तीक्ष्ण दृष्टीसमोर तरळत होतीं.

तो घोडेस्वार जासूद घोडा दौडीत जाता जाता एकदम थबकला.

पुतळेला प्रश्न पडला, तो जासूद का बरे थबकला!

हा हा म्हणता त्या जासुदाच्या हातातील पेटती मशाल गळून पडली. तें पाहून पुतळेचेही पाय गळल्यासारखे झाले. त्या चाडाळांनीं त्या जासुदाचा बळी घेतला काय?

पुतळेची शका खोटी नव्हती. त्या जासुदाच्या पाठलागावर असलेल्या तिघा शत्रूपैकीं एकानें भाला फेंकून त्याचा हात जायबदी केला होता.

पुतळेच्या मनाला तीव्र हळहळ लागून राहिली होती. शरिरानें त्या जागे-पावेतों जाण्याला जरी ती असमर्थ होती, तरी तिचें मन वारीसारखें केव्हाच तेथवर उडून गेले होतें, व तिला स्वतःचें देहभानही उरलें नव्हतें. शेताच्या जवळच्या मेरेंतून एक भला मोठा साप निघून तिच्या दोन पायामधून सळसळत तिच्या डाव्या पायाला घांसून गेला, पण तिला त्याचेंही भान नव्हतें.

तेवढ्यात मेघांचा प्रचड गडगडाट झाला. पुतळा दचकून किंचित् भानावर येऊन वर आकाशाकडे पाहते, तो वीज कडकडली. हा हा म्हणतां पावसाचे टपोरे थेंब गोफणींतून खडे फेंकून मारावे त्याप्रमाणें वर्षू लागले. तशा स्थितींतही पुतळेनें राजमार्गावरील त्या भयकर दृश्याकडे एकवार पाहिलें. तों त्या जासुदाचा पाठलाग करणाऱ्या घोडेस्वाराच्या हातातील मशाली जरा पुढें एकत्र झालेल्या व स्थिरावलेल्या तिला दिसल्या.

पाहता पाहता पाऊस जोरानें वर्षू लागला. त्यामुळें धुरकटलेल्या सभोंवारच्या वातावरणात पुतळेला दूरवर पाहणे अशक्यप्राय झालें. मग पायवाट शोधून दूर जाण्याची गोष्टच कशाला ? ते सर्वजण तिकडे काय बोलत होते अथवा करीत होते याचा तिला काहींच अदाज करता येईना. पण तिच्या मनाला मात्र एकसारखी तीव्र ओढ लागून राहिली होती कीं तिकडे काय अनर्थ झाला असेल व काय नाहीं.

पुतळा काहीं तत्त्वज्ञानी नव्हती कीं विद्वान नव्हती. ती त्या काळाप्रमाणें लिहिण्या वाचण्यालाही शिकलेली नव्हती. फक्त माणुसकी तिच्या अगीं परिपूर्णतेनें वसत होती, ती मनाची कोमल व वृत्तीची प्रेमळ, आणि कनवाळु होती, ती स्वाभिमानी व कर्तव्यदक्ष होती, तिचे आचरण गगाजलाप्रमाणें निर्मल होतें, ती निष्कारण कोणाचा हेवादावा करणारी नव्हती, तात्पर्य माणुसकीला आवश्यक असे सर्वसाधारण गुण काय ते तिच्या ठायीं होते. तिच्या नैसर्गिक स्वभावात वैगुण्य अथवा वैशिष्ट्य असेल तर तें हेंच कीं, तिच्या वृत्तींत सात्विकता जरा कमी होती तिचे चारित्र्य पवित्र खरें, पण ती पवित्रता पौर्णिमेच्या चद्राच्या शीतल चद्रिकेप्रमाणें नसून आकाशात चमकणाऱ्या विद्युल्लतेप्रमाणे अथवा तरवारीच्या धारेप्रमाणें अथवा अग्नीच्या ज्वालेप्रमाणें होती. उपकाराची फेड उपकारानीं करण्यात तिचें औदार्य कोणींही वाढाव्याच्या औदार्याच्या मापाने मोजले असते तरी तें उणें पडलें नसतें. परतु अपकाराची फेड उपकारानी करण्याचें तर राहोच, ती अपकारानींच करावयाची व तीही सव्याज–सरळ व्याजानेंही नव्हे तर चक्रवाढ व्याजानें करावयाची, या वृत्तीची ती होती. तथापि सामान्यतः परोपकारी वृत्तीची ती असल्यामुळें जगात कोणालाही दुःखी पाहून तिला दुःख वाटावें, व कोणाचेंही सुख पाहून सुख व्हावें. रस्त्यानें चालताना पायाखालीं एखादी कीडमुंगी

चिरडली गेली तरी तिचा जीव हळहळावा. आणि आज ती समोर पाहत होती तो तर प्राणसंकटात सापडलेला मनुष्य. तशात तो कोणाचा तरी महत्त्वाचा खलिता घेऊन चालला होता. त्याच्या जिवावर संकट कोसळलेले पाहून पुतळेच्या मनाला असंख्य विंचू डसल्याप्रमाणे वेदना झाल्या तर त्यात नवल तें काय!

तथापि पुतळेच्या मनाची ओढाताण एवढ्यावरच थांबणारी नव्हती; तिच्या अंतःकरणातील संवेदना एवढ्या मर्यादित क्षेत्रात सामावणाऱ्या नव्हत्या. अशा सुखदुःखाच्या संवेदनांचे आडाखे व ठोकताळे तिनें आपल्या आजवरच्या अनुभवानें अंदाजून ठेवले होते. अर्थात् ते सारे तिच्या भावनेचे खेळ होते. असें का होतें व कसें होतें हें तिला मुळींच कळत नव्हतें. तिला एवढेंच कळे कीं आपल्या चित्तवृत्ति आनंदित झाल्या म्हणजे कोणाविषयीं—विशेषतः आपल्या प्रेमातील, परिवारातील अथवा ऋणानुबंधातील माणसा-विषयीं काहीं तरी शुभवार्ता ऐकावयाला मिळणार, तेंच मन एकाएकीं उदासवाणें झालें कीं कसलीतरी अशुभवार्ता कानीं येणार. ह्या वार्ता व घटना नेहमीं निकटवर्ती माणसाविषयींच्याच असल्यानें त्याचा ऐकणाऱ्या अथवा पाहणाऱ्या माणसाच्या जीवितावर अथवा सभोंवारच्या परिस्थिती-वर परिणाम हा व्हावयाचाच.

आजचीच गोष्ट घेतली, तरी कुठचा कोण तो घोडेस्वार जासूद संकटात सापडलेला. पण त्याच्याविषयीं पुतळेच्या मनाला इतकी जबरदस्त हुरहुर लागून राहिली होती कीं, त्यमुळें तिला आपोआप शंका आली, ह्या विचित्र भयानक घटनेचा आपल्या जीविताशीं तर काहीं संबंध नसेल ना! ज्ञाते तिच्या मनातील ह्या संवेदनेला विद्युन्मानसशास्त्राचा खेळ म्हणतील, आणखी-ही काहीं म्हणतील. पण तिला मात्र हें काहींच कळत नव्हतें.

पाऊस तेव्हा अगदीं जोराचा आला, व पुतळा त्या पावसात भिजून अगदीं ओली चिंब झाली. पण जशी वेगानें ती पावसाची सर आली तशी ती गेलीही. त्यामुळें सभोंवारचें धुरकट वातावरणही हा हा म्हणता बरेंचसें निवळलें, व त्या जासुदावर तुटून पडलेले ते यमदूतरूपी घोडेस्वार पूर्ववत् मशालीच्या प्रकाशात घोडे दौडीत माघारे जाताना तिला दिसले. त्यावरून पुतळेनें ओळखलें कीं ते यमदूत आपल्या संकल्पित कृष्णकृत्यात विजयी झाले असावे.

ते लोक अमळ दूर गेलेले दिसतांच पुतळा तशीच शेत तुडवीत, जेथें तो घोडेस्वार जासूद मरून पडला असावा अशी तिची कल्पना, त्या जागेच्या अनुरोधाने धावत जाऊं लागली. जाता जातां एक किरडू तिच्या पायाखालीं तुडवले गेले त्याचीही तिला दाद नव्हती. त्या धावपळींत अस्ताव्यस्त होऊन पावसाने भिजून ओला चिंब झालेल्या तिच्या केशभारातून पावसाच्या पाण्याचे थेंब मधून मधून तिच्या मुखमंडळावर निथळत, ते डाव्या उजव्या मनगटाने निवारता निवारता आपल्या ललाटींचे कुंकू पुसलें गेल्याचेंही भान तिला नव्हतें. अशा स्थितीत पाडस चुकलेल्या हरिणीसारखी ती शेतातील चिखल व काटे तुडवीत धावत चालली असता त्या भयंकर घटनास्थानापासून दहा बारा कदमावर जाऊन पोहोंचली व पुढें मार्ग सापडेना. तेवढ्यात तिला समोरून घोड्याचे खिंकाळणे ऐकू आलें. तेवढाच सुगावा आपणाला लागला या भावनेनें, सुकलेल्या फुलावर चार जलबिंदु पडल्यावर तें ओलसर व्हावे त्याप्रमाणे, पुतळेचे मन क्षणकाल उल्हसित झालें. पण तो उल्हास केवळ क्षणभरच टिकला. तिचीं चार सहा कदमे झपझप पडलीं व पुन्हा घोड्याचे खिंकाळणे तिला ऐकू आलें.

त्याबरोबर पुतळा एकाएकी उभ्या पावलीं थबकली, व आपल्या मनाशीं म्हणाली, "हा आमचा पिंगाणा तर खिंकाळत नाहीं ना?"

लगेच दुसऱ्याच क्षणाला तिला असेंही वाटले कीं पिंगाणा यावेळीं इकडे कसा येणार? पुन्हा वाटले, "कदाचित् असें तर झालें नसेल ना? आपल्या शोधासाठीं आपला पति तर अशा अवेळीं इकडे आला नसेल ना! त्याखेरीज पिंगाणा इकडे कसा येणार?"

पण प्रतापराव जर केवळ आपल्या पत्नीच्या शोधार्थ आला असता, तर राजमार्गाने पुढे कशाला गेला असता! आणि त्याचा पाठलाग त्या कोणा यमदूतानीं कशाला केला असता?—पुतळेला पुन्हा थोड्या वेळापूर्वीं त्या यमदूताच्या तोंडून ऐकावयाला मिळालेल्या हाणामारीच्या व खलित्याविषयींच्या उद्गाराची आठवण झाली, व तिच्या मनावर जणू वज्राघात झाला. घोडा खिंकाळला त्या अनुरोधानें ती वाऱ्याच्या वेगानें पळत गेली. जवळ जाताच तिनें घोड्याला हाक मारली, "पिंगाण्या!"

घोडा पुन्हा खिंकाळला.

# पेशवाईचा मध्यान्ह

तें खिंकाळणें ऐकून तो आपलाच घोडा असावा याविषयीं पुतळेला शंका घेण्याला मुळींच जागा उरली नाहीं. पण ती सशयनिवृत्ति तिला सर्वतोपरी हिंपुटी करण्याला कारण झाली.

पाऊस आता चागलाच ओसरला होता. जवळच जळकटलेल्या काकड्याची मशाल धुमसत होती परतु दुसऱ्या कसल्याही प्रकाशाच्या साह्याखेरीज पुतळेनें तेथे प्राणान्तिक वेदनानीं कण्हत पडलेल्या आर्त जीवाला पाहिलें. पिंगाण्याला तर तिनें अगोदरच ओळखलें होते, तो त्या कोणा आसन्नमरण व्यक्तीवर आपल्या देहाची सावली धरून उभा होता.

पुतळा जवळ जाऊन पोहोचताच घोडा बाजूला सरकला, व त्या आपद्ग्रस्त अभागी जीवाने कण्हत्या क्षीण स्वरांत हाक मारली, "पुतळे!"

पुतळेला तिने पिंगाण्याचें खिंकाळणें ऐकलें तेव्हाच शका आली होती, ती अमगळ शका होती. तो सकटग्रस्त अभागी जीव आपला पति प्रतापराव असेल हीच ती अमगळ शका. आणि असल्या भयाण शका दुःखाने भाजलेल्या जीवाच्या मनात आल्या कीं त्या बहुधा खऱ्या ठरतात हा अनुभव कोणाला नाहीं? तो प्रतापरावच होता.

पुतळा आपल्या कष्टी मनाला धीर देत प्रतारावापाशीं गेली, व त्याचें मस्तक आपल्या माडीवर घेऊन त्याच्या उत्तमागावरून आपला ममतेचा हात फिरवीत म्हणाली, "अरे देवा! आपण इकडे कुठे?"

"अगोदर मला घोटभर पाणी पाज. माझा जीव पाण्यासाठीं अगदीं व्याकुळ झाला आहे." प्रतापराव प्राणान्तिक वेदनामुळें अडखळत उद्गारला.

पाणी! पुतळेला प्रश्न पडला, आता याला पाणी कोठचे पाजावे? कृष्णा तर बरीच दूर राहिली सभोंवार काळोख मी म्हणून मुसमुसत असल्यानें आजूबाजूला तळे विहीर शोधून पाहण्याचीही सोय नाहीं. आणि एखादी विहीर तिथें असती, तरी तिचें पाणी कसें काढणार? जवळ भाडेकुडे काहीं नाहीं. ते पावसाळ्याचे दिवस होते, नुक्ताच पाऊस लागून गेल्यामुळे रस्त्याच्या काठच्या डबक्यात ठिकाठिकाणीं बरेंच पाणी साचलें होतें, सर्व खरे. पण तें पाणी पिण्याला थोडेंच उपयोगी पडते!

अखेर पुतळेला प्रसगावधान सुचले. तिच्या अगावरील लुगडे पावसाच्या सरींत भिजून ओलें चिंब झालें होतें. त्या पदराचा पिळा करून तिनें तें

दोन घोट पाणी प्रतापरावाला पाजलें. त्यामुळें त्याला अंमळ हुषारी आली. तिनें लगेच ती धुमसणारी मशाल हातीं घेऊन तिच्यावर फुकर घालून ती पेटविण्याचा प्रयत्न केला. जवळच तेलाची बुधली साडलेलीही तिला सापडली. पण पावसानें भिजलेला मशालीचा काकडा अशानें थोडाच पेटतो!

"ती मशाल पेटणार नाहीं. तो नाद सोड, आणि माझ्यापाशीं ये. माझ्याच्यानें मोठ्यानें बोलवत नाहीं. अगदीं माझ्याजवळ येऊन बैस. मी आतां जगत तर नाहींच. पण मरणापूर्वी माझ्या जिवापेक्षाही मोलाची एक गोष्ट तुला सांगायची आहे... "

## प्रकरण ६ वें

# स्मशानांतील बैरागी

" आपल्याच्यानें बोलवत नाहीं; आपण फार बोलू नये. " पुतळा प्रतापरावाच्या दडावर व छातीवर झालेल्या जखमा हातानें चाचपून पाहत म्हणाली.

" बोलवत नाहीं, पण बोलल्याखेरीज गत्यतर नाहीं. मी आता जगत नाहीं खास. पण आता मला मरताना दुःखही होत नाहीं. स्वामिकार्यासाठीं मला मरण येत आहे, यात मला दुःख मुळींच वाटत नाहीं. मात्र कोणी जिव्हाळ्याचें–विश्वासाचें माणूस न भेटता मला अशाच स्थितींत मरण आलें असतें, तर मात्र मला मरताना फारच दुःख झालें असते. " प्रतापराव ग्लानि आल्यामुळें थोडा वेळ उसत खाऊन पुन्हा बोलू लागला, " आता मी काय सागतों तें नीट लक्ष्यपूर्वक ऐक. गोविंदबाबा चिटणिसानीं महाराजाचा जरुरीचा खलिता घेऊन मला पुण्याला श्रीमत पेशवे सरकाराकडे पाठविलें होतें. "

" तो खलिता कुठें आहे ? "

" ऐक सागतों. माझ्या शत्रूनीं–महाराजाच्या, पेशवे सरकारांच्या व साऱ्या राजवटीच्या शत्रूनीं आताच माझ्यावर असा भयकर हल्ला करून मला मृत्यूच्या जबड्यात लोटून दिलें, व तो खलिता लाबविला. तो आता काहीं केल्या हातीं लागणें शक्य नाहीं. "

" हा कोणा चाडाळानीं आपणावर हल्ला केला ? "

" तो नीच चाडाळ राक्षस गमाजी, त्याचा तो उरफाट्या काळजाचा हस्तक तुळाजी, आणखी त्याचे दुसरे दोघे साथीदार चाफाजी व नारोजी अशा चौघानीं माझ्यावर हल्ला केला. गमाजी हा त्या टोळीचा म्होरक्या होता. त्याच्याच सागण्यावरून चाफाजी व नारोजी यानीं मला अडवून धरलें व

तुळाजीनें माझ्यावर भाला फेंकून मारला. मग चौघानीं मिळून माझ्या मर्मस्थानीं घाव घालून मला घायाळ केलें. ईश्वर त्याना त्याच्या पापाचीं कडू फळें भोगायला लावील. आता तू एवढेच कर; चिटणिसाना ताबडतोब ही खबर कळव. म्हणजे ते पुढची काय तजवीज करायची ती करतील. आणि हें पाहा, थोरल्या राणीला या प्रकाराचा मागमूसही कळू देऊ नको. कारण थोरली राणी झाली तरी पेशवे सरकाराना पाण्यात पाहणारीच आहे, व ती पतप्रतिनिधि, यमाजीबाबा मुतालिक वगैरे हस्तकाना हाताशीं धरून राजवटीचें राजकारण बिघडविण्याच्या खटपटींत आहे. पानगावीं सध्या अज्ञातवासात राहत असलेल्या राजाराममहाराजाचा नायनाट करण्यासाठीं तिनें थोड्याच दिवसापूर्वी कसें भयकर कृष्णकारस्थान रचिलें होते ते तुला माहीत आहेच. तू तिची दासी आहेस म्हणून तुला सागतो, सावधपणाने वाग. ”

“ मी सावधपणानें वागेन, आणि आपणावर चिटणिसानीं विश्वासानें जी कामगिरी संपविली, ती या कानाची त्या कानाला न कळत पुरी पाडीन. त्याविषयीं आपण मुळींच काळजी करू नका. पण आता आपले रक्षण. ”

पुतळेला दुःखाचा एवढा जोराचा उमाळा आला कीं त्याच्या प्रवाहात तिच्या तोंडीं बोलावयाचें अर्धवट राहिलेलें वाक्य कोठल्या कोठें विरून गेले. वर आकाश आणि खालीं जमीन, यापेक्षा तिला तिथे दुसऱ्या कोणाचाही आधार नव्हता. पतीला तशा दारुण स्थितींत घटकाभर डोके टेकण्यासाठीं घेऊन जावें तर तशी निवाऱ्याची एखादी जागाही तिला कोठे सापडेना. तरीही पुतळा मोठी धीरवीर गभीर वृत्तीची तरुणी होती. काळासमोर आपण होऊन मान वाकविण्याइतका लवचिकपणा तिच्या ठायीं नव्हता, काळाला लाथ मारून पुढें जाण्याची व सकटाला न जुमानता कार्य करण्याची दुर्दम ईर्षा तिच्या ठायीं होती. तिने विचार केला कीं आपण आपल्या आसन्नमरण पतीला पिंगाण्याच्या पाठीवर घालून माहुलीला न्यावें, व तेथें एखाद्या ओळखीच्या घरीं त्याला ठेवून त्याच्या शुश्रूषेची काहींतरी तजवीज करावी. माहुलीला तिच्या ओळखीचीं चार पाच घरें होतीं. तसे पाहू गेल्या तिला पिंगाण्याच्या पाठीवर आपल्या पतीला घालून साताऱ्याला नेणेंही अशक्य नव्हते. पिंगाण्यासारखा जिवाला जीव देणारा सोबती बरोबर असल्यावर व साताऱ्याचा मार्गही माहुलीला जाण्याच्या मार्गापेक्षा जास्त सुलभ असल्यावर

दान तीन मैलांचें अंतर तोडण्याची एवढी कसली मानब्बरी ! तथापि शत्रु-पक्षाच्या भयामुळें तिला त्यावेळीं साताऱ्यात जाणे इष्ट वाटलें नाही. न जाणो ! कोणींतरी पहावयाचे आणि आगींतून उठून फुफाट्यात तशी गत व्हावयाची !

अखेर पुतळेनें प्रतापरावाला घेऊन माहुलीला जावयाचे ठरविलें. तेव्हां तो निराशापूर्वक क्षीण असें विकट हास्य करून म्हणाला, "वेडे, आता कसला सातारा आणि कसली माहुली ? मी आता अवघा घटका अर्ध्या घटकेचा सोबती आहें. बाकी, तू म्हणालीस तेही एका अर्थी खरेंच आहे. मला आता माहुलीचाच मार्ग आक्रमण करावयाचा आहे. ह्या काळोखात तुला माझ्या जखमा दिसत नाहींत पण ही–ही छातीवरची जखम थेट माझ्या काळजाला जाऊन भिडलेली आहे तू आता एवढे कर, माझी आशा सोड व तुला सांगितली ती कामगिरी करण्यासाठीं अगोदर नीघ पाहू ! आणखी एक गोष्ट–पण नको." असे म्हणून प्रतापराव मध्येच थबकला.

"असे काय ते ? सांगावे काय ते"

"गमाजी माझ्या मारेकऱ्याच्या टोळीचा म्होरक्या—"

"त्या चांडाळावर पुरेपूर सूड घेण्याचें सामर्थ्य परमेश्वर मला देवो !"

"ऐक ! तो तर चांडाळ आहेच पण त्यानें प्रत्यक्ष माझ्यावर वार केला नाहीं, वार केला तुळाजीने तोही केवळ धन्याच्या आज्ञाधारकपणासाठीं केला नाहीं, तर त्या दुष्ट कृत्याच्या मुळाशीं त्याचा एक अत्यंत नीच हेतु होता. तो त्याने मी जखमी होऊन खालीं पडल्यावर उघड उघड निर्लज्जपणे बोलून-ही दाखविला आहे. वास्तविक तुझ्यापाशी मीं त्याचा उच्चार करावयाचा नव्हे. पण देवानें आपणाला पुत्र दिलेला नाहीं कीं जो आमच्यावर अन्याय कर-णारावर सूड घेईल. पुत्राच्या अभावीं व माझ्या अभावीं ती जबाबदारी तुझ्यावर पडलेली आहे. तुझ्याविषयींच्या अभिलाषबुद्धीने त्या नीचानें माझी हत्या केली आहे ."

"मी आपणाला पूर्वीपासून सांगत होत्यें की हा तुमचा जिवलग मित्र नसून जीव घेणारा–अंधारात विश्वासघाताने आपल्या डोक्यात धोंडा घाल-ण्यासाठीं टपून बसलेला आपला शत्रु आह. पण आपणाला माझें सांगणें खरें वाटले नाहीं, व आपण त्याला साव ठरवून मलाच चोर ठरविलें. तें त्याचें खरें स्वरूप आज आपल्या प्रत्ययाला आलें ना ?"

पुतळेच्या ह्या साकेतिक उद्गारामागें प्रचड वास्तवार्थ साठलेला होता. पुतळा ही रूपानें सुदर व चलाख, आणि धीट वृत्तीची, व मूळपासूनच त्या जोडप्याचें आजवर बहुतेक सारें आयुष्य विरहदुःखात होरपळून निघालेलें. तशात प्रतापरावाचा स्वभाव अमळ सशयी, त्यामुळें पुतळेच्या पातिव्रत्याबद्दल त्याला वारवार शका याव्या, व त्या शकाचे निरसन करून दिलजमाई करता करता पुतळेला नेहमीं ब्रह्माण्ड आठवावे. सशयी, हलक्या कानाचा व दुबळ्या मनाचा नवरा व त्याची सुदर तरुण स्त्री असा एखाद्याचा विषम संसार दिसताच व्रणविदारणात निपुण असलेले दुष्ट समाजकटकरूपी डोमकावळे त्याच्या सभोंवार घिरट्या घालावयाचेच. तुळाजी हा अशाचपैकीं एक डोमकावळा होता. अगदीं अलीकडे त्याची व प्रतापरावाची जिवश्च कण्ठश्च मैत्री जुळली होती. पुतळेने त्या मैत्रीचा अर्थ ओळखून याच्या मनात पाप आहे, याच्यापासून चार पावलें दूर राहणे इष्ट, असे वेळींच प्रतापरावाला बजावलेंही होतें, पण प्रतापरावानें तेव्हा तुळाजीचा कैवार घेऊन पुतळेची निर्भर्त्सना करण्याला कमी केले नव्हते तुळाजीनें त्या सधीचा फायदा घेऊन प्रतापरावाच्या कानात विष ओतलें होतें कीं, "प्रतापराव! तू मला माझ्या धाकट्या भावासारखा, व पुतळा मला माझ्या पाठच्या बहिणीसारखी. तिची वृत्ति माझ्या ठायीं चळू लागली व मीं तिची त्याबद्दल खाशी कानउघाडणी केली, म्हणून ती डिंवचलेल्या नागिणीसारखी माझ्यावर उलटली आहे तुझ्या माझ्या मैत्रींत बिघाड आणून तिला आपल्या दुर्वासनाच्या पापावर पाघरूण घालावयाचें आहे."

भोळ्या वृत्तीच्या प्रतापरावाच्या मनावर तुळाजीच्या मानभावी भाषणाचा व्हावयाचा तोच परिणाम झाला, व तो पुतळेला घरातून एकदम घालवून देण्याला तयार झाला. तेव्हा पुन्हा पुतळेच्या वतीनें प्रतापरावाची समजूत घालून त्याचें शातवन करावयाला तुळाजीच पुढे! त्या प्रसगाला अनुसरून पुतळेनें पूर्वोक्त उद्गार काढले होते. अगदीं अलीकडे म्हणजे सुमारें महिन्यापूर्वीं तुळाजीचे खरें हिडीस स्वरूप, त्याने पुतळेशीं एकदा अतिप्रसग करण्याचा योग जुळवून आणला होता तेव्हा, प्रतापरावाला कळून आलें होतें, व तेव्हापासून त्या दोघात हाडवैर उत्पन्न झालें होते. तेव्हापासून तुळाजी प्रतापरावाच्या घरीं येईनासा—त्याच्याशीं बोलेनासाही झाला होता, व एका ना एका

दिवशीं पुतळेचें अपहरण करण्याच्या गोष्टी उघड उघड बोलूं लागला होता. गमाजीनेंही कांहीं दिवसांपूर्वीं पुतळेला वश करण्याचा प्रयत्न करून त्यात आपली सोळा आणे फजिती करून घेतल्यामुळे तो पुतळेला पाण्यात पाहत होताच. त्याला जेव्हा तुळाजीचा हेतु कर्णोपकर्णीं कळून आला, तेव्हा त्यानें तुळाजीला त्या पापकर्मापासून परावृत्त करण्याचें सोडून उलट त्याला तें पापकर्म करण्याला प्रोत्साहन दिलें होतें. म्हणूनच आज तुळाजी उघड उघड बेडरपणानें प्रतापरावाच्या प्राणावर घाला घालू शकला व त्याच्या पश्चात् पुतळेचें हरण करण्याच्या गोष्टी चार मंडळींसमक्ष त्याच्या तोंडावर उघड उघड बोलू शकला.

पुतळेला राहवेना, म्हणून तसे उद्गार तिनें प्रतापरावापाशीं काढले. प्रतापरावालाही ते पटले, व त्यानें इतके दिवस तिच्या वर्तनाविषयीं वृथा संशय घेतल्याबद्दल मनःपूर्वक तिची क्षमा मागितली. पुतळेनें तुळाजीवर सूड घ्यावा, या त्याच्या अखेरच्या इच्छेला पुतळेनें आपल्या दुःखाश्रूंचें अर्घ्य सोडून तसें वचन दिलें.

प्रतापराव जरी आपल्या आयुष्याचे क्षण मोजीत होता, इहलोकची सर्व प्रकारची आशा जरी त्यानें सोडली होती, तरी आपण पुतळेच्या बाबतींत आजवर भयंकर अनर्थ पक्षपात केला आहे, ह्या जाणिवेचा विसर त्याला पडला नव्हता, व त्या अन्यायाचें अंशतः तरी परिमार्जन व्हावें असें त्याला वाटत होतें. पश्चात्तापाचा अग्नि आता त्याच्या आयुष्याच्या अखेरच्या क्षणाला जरी त्याच्या अंतःकरणात प्रज्ज्वलित झाला, तरी त्याने तेथील सारे संदेह पार भस्मसात् करून सोडले, आणि त्यामुळे पुतळेविषयीं कृतज्ञतेचे उद्गार ओघासरसे त्याच्या मुखावाटे निघाले, "लाडके ! तू पतिव्रता आहेस, पुण्य-पतिव्रतांच्या मालिकेंत अग्रपूजेचा मान तुला आहे. पतीच्या प्रेताबरोबर सती जाणाऱ्या पतिव्रतांपेक्षा तुझें पातिव्रत्य श्रेष्ठ आहे. लौकिक पतिव्रता सती जातात म्हणजे पतीच्या देहाबरोबर स्वतःचा देह जाळून घेतात. पण तू त्या पतिव्रतांहूनही श्रेष्ठ असल्यानें पतिकार्य सफल करण्यासाठीं देहानें सजीव राहिली आहेस. स्वतः सती जाऊन जिवंत राहण्याचा हा खडतर योग सामान्य पतिव्रतांच्या आटोक्याबाहेरचा आहे. सतीच्या वाणातील हें महावाण आहे. अशा परमपतिव्रतेचा पति शोभण्याजोगे कोणतेंच कृत्य आजवर ह्या अभागी

प्रतापरावाच्या हातून झालें नाहीं, याबद्दल मला क्षमा कर!" तो क्षीणता फार वाढल्यामुळें एकदम जरा थाबून पुन्हा उद्गारला, "झाले. माझ्या आयुष्याची अखेरची घटका भरली. या जन्मीं जरी मी तुझा ससार तुझ्या थोर योग्यतेप्रमाणें सुखाचा करू शकलो नाहीं, तरी पुढील जन्मीं.. राम!.. "

प्रतापरावाने पुतळेच्या माडीवर अखेरचा राम म्हटला. पुतळेच्या हृदयाच्या प्रतिनिधींच्या वज्राघाताने ठिकऱ्या ठिकऱ्या उडाल्या. आपण मोठा गळा काढून रडून आक्रोश करून आपला दुःखभार अशतः तरी हलका करावा असें तिला वाटलें. पण तो शोक आपल्या पुढील कर्तव्याला विघातक होईल या जाणिवेनें ती सुमारें पाव घटका तेथल्या तेथे मनातल्या मनांत रडली कढली, व अखेर जगाच्या रहाटीला तोड देण्याचे ठरवून उठून उभी राहिली.

ओक्साबोक्शी रडण्याचे पुतळा टाळू शकली. पण आता समोर गतप्राण होऊन पडलेल्या पतीच्या शवाला मूठमाती तर दिली पाहिजे? कीं तें तसेंच कोल्ह्याकुत्र्याना फाडून खावयाला मिळावे म्हणून रस्त्यावर टाकून जावयाचें! प्रथम तिच्या मनात आले कीं घोड्याच्या पाठीवर तें प्रेत घालून माहुलीला स्मशानात न्यावें, आणि धाकट्या राणीची चिता अद्यापि पेटत असेल त्या चिताग्नीला तें अर्पण करावे. त्या विचारासरशी तिनें आपल्या विश्वासू घोड्याला हाकही मारली, "पिंगाण्या!"

मालकिणीची हाक ऐकताच ते इमानी जनावर जवळ जाऊन उभे राहिलें. त्याच्या पाठीवर पुतळा पतीचे प्रेत बाधणार, तोंच तिच्या मनात सदेह आला, धाकट्या राणीसाहेबाच्या चितेत हे प्रेत फेकल्यानें राणीसाहेबाच्या चितेचा अपमान केल्यासारखे होणार तसे करू नये असें तिच्या मनानें घेतलें. बरें, पतीच्या प्रेताची स्वतत्र चिता रचावी, तर लाकडापासून तयारी—ती कशी करावयाची? ते सारें करून सवरून पुन्हा पुतळेला पुढील कार्यसिद्धीसाठीं नामानिराळें राहाणें प्राप्त होते. तें सारे कसे साधणार?

परतु मनुष्याच्या काहीं काहीं भावनात असा जिव्हाळा असतो कीं त्या जिव्हाळ्याला स्पर्श होताच मनुष्याचे पूर्वींचे सारे सारासार विचार लयाला जातात, व अविचाराच्या वारूवर स्वार होऊन ती भावना ताडवनृत्य करूं

लागते. अशा वेळीं मग त्या मनुष्याला परिणामाची लवमात्र क्षिति नसते. पतीच्या शवाचा अंत्यविधि ही भावना पुतळेच्या मनात अशीच प्रभावी ठरली. जलडोहात उडी घेऊन आत्महत्या करावयाला निर्धाराने निघालेला जीव आपणाला त्या निर्धारापासून परावृत्त होण्याचा मोह पडू नये म्हणून स्वतःच्या गळ्यात अवजड धोंड बाधून घेण्याला उद्युक्त व्हावा त्याप्रमाणें पुतळेनें परिणामाचा यत्किंचितही विचार करावयाचा नाहीं असा मनाचा निर्धार करून एकदम पतीचे शव घोड्याच्या पाठीवर बाधले, व स्वतः तें प्रेत नीट साभाळून ती घोड्यावर बसली जरा इषारा मिळताच पिंगाणा वायुवेगाने शेतवाडी तुडवीत माहुलीच्या मार्गे दौडत निघाला.

सुमारें पाव घटकेनें पुतळा स्मशानात जाऊन पोहोचली. सुदैवाने धाकट्या राणीच्या पेटत्या चितेशेजारीं लाकडाचा भला मोठा ढीग पडलेला तिला दिसला. प्रथम ती चितेचे दर्शन घेऊन गेली त्यावेळी तीं लाकडे तेथें नव्हतीं, तीं आताच कोठून आलीं याचें तिला आश्चर्य वाटले. पण ती त्याविषयींही फारसा विचार न करता आपल्या हातानें पेटत्या चितेजवळच एक चिता रचू लागली. तसेंच तेथला रखवालदार दुरून पाठीवर नागी टाकून तुरुतुरू धावणाऱ्या विंचवासारखा पुतळेच्या अंगावर धावून आला व तिची चर्या न्याहाळून पाहात तावातावानें म्हणाला, “ कोण पुतळे ? ”

जेथें माहुलीला कृष्णाकिनाऱ्यावर स्मशान होतें व आजही आहे, तेथेंच अमळ वरच्या बाजूला जवळच एक लहानशी झोपडी नवीनच उभारली होती, व त्या झोपडींत एक तरुण, तरतरीत नाकाडोळ्याचा पण शरिराची योग्य खाण्यापिण्याच्या अभावीं आबाळ झाल्यामुळे कृश झालेला असला तरी मजबूत हाडाचा बैरागी राहत असे. तो नेहमीं त्या झोपडींत पडलेला असे. सकाळीं उठून कृष्णेचें स्नान करावयाचे, देवदर्शन घ्यावयाचें, व गांवातून कोरान्न मागून आणून निर्वाह करावयाचा, असा त्या बैराग्याचा क्रम असे. तो कोणाच्याही वाटेला जात नसे, व लोकही त्याच्या तुसड्या स्वभावामुळें त्याची फारशी पर्वा करीत नसे तो कधीं दिवसादेखील झोंप घेई, तर कधीं अपरात्रीं एकटाच उठून स्मशानात भटक्या मारू लागे, कधीं एखादी चिता स्मशानात पेटत असली तर तिच्या शेजारीं हात शेकीत बसे. तो स्मशानवासही आपण विनाश्रम उपभोगावयाचा नाहीं म्हणून कीं काय, तो

बैरागी कोणाची पेटती चिता पर्जन्यानें विझूं लागली अथवा कोल्हे कुत्रे एखाद्या अर्धवट जळलेल्या चितेतून प्रेत ओढून काढूं लागले, तर त्याना हाकलून चिता पुन्हा नीट व्यवस्थित पेटती करी. तो बैरागी आज पुतळा स्मशानात जाऊन पोहोंचली तेव्हा आपल्या झोंपडीच्या फाटकाबाहेर एकटाच बसला होता. कांहीं वेळापूर्वी पुतळा धाकट्या राणीच्या चितेचें दर्शन घेऊन गेली तेव्हाही तो बैरागी तेथेंच बसलेला होता. त्यापूर्वी थोडा वेळ पावसाची बुरबुर येऊन त्यामुळें धाकट्या राणीची चिता समोंवार भिजून विझूं लागली, तेव्हा चितेवर देखरेख करण्यासाठीं मुद्दाम राजवाड्यातून नेमला गेलेला रखवालदार जवळच्या देवालयात झोपीं गेला असल्याने त्याला पाऊस पडत असल्याचीही दाद नव्हती. त्यावेळीं त्या तरुण बैराग्याने पुढें येऊन त्या चितेंत नवीं कोरडीं लाकडे घालून ती पुन्हा नीट चेतविली होती.

असो. आपणाला कोणी हाक मारली म्हणून पुतळा डोळे उघडून पाहते तों तो महाराजाचा हुजऱ्या माणकोजी घाटगा! पुतळेनें माणकोजीला ओळखलें. पण ती त्याच्याशीं कांहीं बोलली नाहीं. तेवढ्या अवधींत तो बैरागी माणकोजीचा शब्द ऐकून झोपडीच्या फाटकासमोरच बसल्या जागीं उठून उभा राहिला व पुतळा आणि माणकोजी याच्याकडे तीक्ष्ण दृष्टीनें पाहूं लागला.

" इतक्या अपरात्रीं कुणाचा खून करून मुडदा जाळायला आणला आहेस?" माणकोजीने पुतळेला दरडावून विचारलें.

तो तरुण बैरागी एक पाऊल पुढें आला

पुतळेला तो प्रकार सहन झाला नाहीं. पण ती आपला राग शक्य तितका आवरून धरीत म्हणाली, " कुणाचा का असेना? तुला हें मुडदेफरासाचें काम कोणीं सागितलें आहे?"

" जास्तशी बोलतेस ! थोरल्या राणीसाहेबाच्या चितेसाठीं मीं हीं लांकडें आताच इथें आणून ठेवलीं होतीं. तीं तू का घेतलींस?"

तो सवाद ऐकून तो तरुण बैरागी हळुहळू पुढें येऊ लागला.

पुतळेचा सताप वाढत चालला. ती त्राग्याच्या भाषेंत म्हणाली, "मुडदा जाळायला आणलेलीं लाकडें मुडदा जाळायला घेतलीं. तुझ्यामाझ्यासारख्या जिवत माणसांना जाळायला त्यांचा थोडाच उपयोग करावयाचा आहे!"

संतापानें संताप वाढतच गेला, ठिणगीचा वणवा भडकू लागला. माणकोजीनें पूर्वीपेक्षाही कठोर अधिकारवाणीनें दरडावून दातओठ खात मुठी आवळीत पुतळेच्या अगदीं जवळ जाऊन विचारलें, "मला तू जाळणार? मला—ह्या माणकोजीला जाळणार तू? इतकी माजलीस काय? थांब. मी आता ही गोष्ट थोरल्या आईसाहेबांना आणि महाराजाना कळवतों. राणीसाहेबांच्या चितेंतली आग आणि लाकडे घेतेस?"

पुतळेनें पाहिलें कीं हें प्रकरण काही आता थोडक्यात मिटत नाहीं, तें चिघळत जाणार. माणकोजी जाऊन चहाडी करणार, मग नव्या प्रेताचा तपास होणार, थोरल्या राणीला खबर मिळणार, इतकी आग ज्या जळत्या कोलितामुळें भडकणार, तें कोलीत प्रथमच विझवून टाकलेले बरें."

जितक्या वेगानें पुतळेच्या मनात तो विचार आला, तितक्या वेगाने तो ती अमलातही आणणार होती. तिने आपल्या निरींत नेहमींच स्वसंरक्षणासाठीं लपवून ठेवीत असलेला जंबिया एकदम डोळ्याचें पातें लवते न लवतें इतक्या अवधीत सर्रकन् बाहेर काढून माणकोजीच्या छातीवर रोंखला. माणकोजीचाही संताप अनावर झाला. आता पुतळा त्याच्या छातींत वार करणार, तोंच त्यानें आपल्या डाव्या हाताने तिचा उजवा हात धरला, व इतक्या जोरानें पिरगळला कीं, तिच्या हातातील खंजीर गळून खालीं पडला, व तिला त्या वेदना सहन न होऊन तिने जोरानें किंचाळी फोडली.

त्या किंचाळीसरशी धाकट्या राणीच्या चितेशेजारीं बसलेली दुःखी राई धावत पुढें आली व तिने माणकोजीच्या पायाला कडकडून चावा घेतला. पण त्याच्या सुदैवाने तो चावा त्याच्या पोटरीला जाऊन न भिडता त्याची सुरवार मात्र फाटली. माणकोजीने प्रसंगावधान राखून राईच्या पोटावर अशी जोराची लाथ हाणली कीं ती बिचारी कळवळत केंकटत रेतींत गडबडली. लगेच पुतळेच्या हातातील खंजीर जवळच पडला होता तो शिताफीने उचलून घेऊन पुतळेला मारावयाला धावला. तोंच इतका वेळ दुरून तो प्रकार लक्ष्यपूर्वक पहाणाऱ्या बैराग्यानें एकदम त्याच्यावर झडप घातली, व त्याच्या हातातील सुरा हिसकावून घेऊन तो आवेशानें त्याच्याच छातींत खुपसून म्हटलें, "नामर्द! षंढ! एका अनाथ स्त्रीवर हात टाकायला लाज नाहीं वाटत? तिच्या दुःखावर अशा डागण्या देतोस काय? भोग आपल्या पापाचें फळ!"

माणकोजी मरून खालीं पडला पुतळा तो अकल्पित प्रकार पाहून घाबरून उठून जरा दूर उभी राहिली.

"बाई! तू भिऊ नकोस. ह्या प्रेताला अग्नि देण्याचें काम मी करतो. तूं त्याची काहीं काळजी करू नकोस" असें म्हणून त्या तरुण बैराग्यानें प्रतापरावाच्या प्रेताची चिता आपल्या हातानीं रचिली, व तिला अग्नि दिला. पुतळा जवळच उभी राहून ते सर्व पाहत रडत होती.

चिता पेटती झाल्यावर त्या तरुण बैराग्याने पुतळेला विचारले, "बाई! तूं जर तुझ्यावरील सकटाची मला ओळख देऊ शकत असशील व तुला काहीं साह्य पाहिजे असेल, तर तुला मी माझी पाठची बहीण मानून शक्य तें साह्य तुला करीन."

पुतळेच्या मनात त्या बैराग्याविषयीं विश्वास व आदर उत्पन्न झाला होता. तिनें त्याला पाठचा भाऊ मानून आपणावर ओढवलेल्या पतिनिधनाचा वृत्तान्त त्याला रडत कढत निवेदन केला

बैराग्यानें पुतळेची शोककथा शातपणे जरी ऐकून घेतली, तरी त्याचें अंतःकरण शोक, दुःख व त्वेष यानीं आतल्या आंत अगदीं पिळवटून निघत होतें. त्याने समदुःखी वृत्तीने एक दीर्घ उसासा सोडून पुतळेला म्हटलें, "बाई! जगाची रहाटी ध्यानीं घेऊन तू हें खडतर दुःख सहन केलें पाहिजेस. हें तुला मीं सागावयाला पाहिजे असे नाहीं. ज्यानीं तुझा असा सत्यनाश केला, त्याचा असाच सत्यनाश झाल्याचें तू लौकरच पाहशील. आता तू साताऱ्यापर्यंत एकटी जाऊ शकशील का? कीं मी तुझ्या सोबतीला येऊ?"

पुतळा कशी झाली तरी स्त्री! तशा प्रसगींही आपणाला एका तरुण बैराग्याबरोबर जाताना कोणीं पाहिलें तर काय म्हणेल, या भयानें तिनें बैराग्याची सोबत साभार नाकारली, व ती पतीच्या चितेचें अखेरचें दर्शन घेऊन तशीच पिंगाण्यावर स्वार होऊन साताऱ्याच्या मार्गाकडे वळली.

"उद्या चिता विझली कीं तुझ्या पतीच्या अस्थि व राख मी माझ्या हातानीं कृष्णेत टाकीन. त्याची काळजी तू करू नकोस." असें पुतळेला आश्वासन देऊन तो तरुण बैरागीही तेथून दूर निघून गेला. जातांना त्यानें विव्हळत रेतींत पडलेल्या राईला उचलून आपल्याबरोबर घेतलें. पण पुतळा तेव्हां घोड्यावर पाठमोरी असल्यानें तिनें तें पाहिलें नसावें.

## प्रकरण ७ वें

# खुनाबद्दल बक्षीस !

उद्यानात सुगधी फुलाचा ताटवा फुललेला दिसला कीं पाहणाराचें मन मोहित होऊन जातें, त्या सुगधानें घ्राणेंद्रिय तृप्त होऊन धन्य धन्य वाटतें. कस्तूरीच्या परिमळाची आवड कोणाला नाहीं व महति कोणाला वाटत नाहीं ? पण जगाची रीतच अशी आहे की सुगधी पुष्पवेलीच्या बुध्याशीं किती सजीव–निर्जीव वस्तूना कुजून बळी द्यावे लागले असतील हें कोणी विचारात घेत नाहीं. ज्या कस्तूरीची एवढी महति, ती कस्तूरी सपादन करण्यासाठीं पारध्याच्या फासाना किती कस्तूरीमृगानी आपल्या प्राणाची आहुती दिली असेल, ही जाणीवही कोणाला नसते.

प्रतापराव व पुतळा याचीही अशीच अवस्था होती. या रात्रीं–धाकट्या राणीची चिता पेटती झाली, प्रतापरावानें स्वामिकार्यासाठीं आपला बळी दिला, आणि पुतळेवर वैधव्याची आकाशची कुऱ्हाड कोसळून पडली असताही ती तीं सर्व दुःखे धैर्यानें सहन करून आपल्या पतीचा अखेरचा महत्त्वाचा सदेश ध्यानीं वागवून चिटणिसाना त्या अनर्थाची खबर द्यावयाला निघाली, ज्या रात्रीं आपल्या प्रिय पतीच्या निधनामुळे शाहूमहाराजाना जगण्यापेक्षा मरण बरे वाटून ते राजधानींत न जाता मागच्याप्रमाणें वनवासवाडीलाच जन्माचे वनवासी होऊन राहिले, त्या रात्रौ राणी सकवारबाई रगमहालातील देवघरात बसून देव नवसाला पावला म्हणून त्याचीं स्तुतिस्तोत्रें गात बसली होती. तिच्या समजुतीनें धाकटी राणी मृत्युवश झाली, आपण आपल्या हस्तकाकरवीं तिला विषप्रयोग करविला तो बेमालूम यशस्वी झाला, ही सारी देवाचीच कृपा होती; व ती देवकृपा तिला इतक्यात ओसरावयाला नको होती. त्या कृपेची परिपक्व फलश्रुति अजून तिच्या पदरीं पडावयाची होती.

विषवृक्षाचें रोप लावलें, त्यानें मूळ धरलें व त्याच्या पालवीला टवटवी आली, एथवरची मजल काय ती सकवारबाईनें त्या क्षणापावेतो गाठली होती. त्या रोपट्याचा वृक्ष व्हावयाचा होता, तो फुलाफळाच्या बाजाला यावयाचा होता, त्याच्या फायद्यातून सकवारबाईला पेशवे वगैरे प्रतिस्पर्ध्यांचे कारस्थानाच्या कुऱ्हाडीनें पाय तोडण्यासाठीं कुऱ्हाडीला दांडे मिळवावयाचे होते, असे जे जें कांहीं व्हावयाचें ते सर्व पुढेच होते! मात्र आपण लावला आहे हा अमृताचा वृक्ष नसून विषवृक्ष आहे, व याची फळें आपण अमृतफळे म्हणून सेवन केल्यावर त्या विषानेंच आपला समूळ नाश व्हावयाचा आहे, याची सकवारबाईला तेव्हा कल्पनाही नव्हती!

परंतु दुःखाप्रमाणेच आनंदाचाही अतिरेक झाला, कीं माणसाच्या चित्तवृत्ति अत्यंत उत्तेजित होतातच, व झोपेचा नाश होतो तसेच सकवारबाईचें झाले. सवतीच्या निधनामुळें तिला अखंड मराठी साम्राज्याची कर्ती स्वामिनी होण्याचा—त्या महत्पदापावेतो चालून जाण्याचा मार्ग मोकळा झाला खरा; पण पुढचा प्रवास? त्या प्रवासाची रूपरेखा ती आपल्या कल्पनाचक्षूनीं आखू लागली, तेव्हा पावलोपावलीं अडचणी डोकावू लागल्या पहिली अडचण पेशवे व त्याचे सहाय्यक चिटणीस वगैरे आपल्या विरोधकांची! हे विरोधक आपल्या मार्गातील कांटे होत असें सकवारबाईलाही वाटणारच. हे कांटे मार्गातून कसे दूर करावयाचे? बाकी, शाहू महाराजाच्या पश्चात् गादीचा वारस कोणी व्हावे हें ठरल्यासारखेंच होते. तो वारस अज्ञातवासात पानगावीं वास्तव्य करीत होता. परंतु सकवारबाई व तिचे हस्तक ही मंडळी आपल्या मनात मांडे मांडे चुरीत होती कीं राजपुत्र ठार झाला, आपण कारस्थान करून त्याला ठार मारला!

असे महत्त्वाचे विचार मनात घोळत असतानाच मोठ्या रात्रीं सकवारबाईचा अमळ डोळा लागला. पण झोपेंतही तिला तींच स्वप्नें पडत होतीं. ती मध्यरात्र उलटून गेल्यावर एकाएकीं दचकून जागी झाली व बाहेर येऊन घाबऱ्याघुबऱ्या दासीला हाक मारू लागली, "जिजा! जिजा!"

जिजा नम्रतापूर्वक समोर येऊन उभी राहिली.

"महाराज आले का?"

"नाहीं आईसाहेब!"

"तू आतां असें कर. देवडीवर चौकीदार असेल, त्याला बोलावून आण पाहू !"

"आज्ञा बाईसाहेब!" असें म्हणून जिजा बाहेर जाते, तोंच महालाच्या दुसऱ्या दरवाजातच तिला चौकीदार भेटला.

"थोरल्या आईसाहेब जाग्या आहेत का?" चौकीदारानें विचारलें.

"हो! जाग्या आहेत. त्यांनीं तुलाच बोलवायला मला सांगितलें होतें" असें म्हणून जिजा माघारी गेली, ती सकवारबाईची आज्ञा घेऊन पुन्हा बाहेर आली व चौकीदार आत गेला तो मुजरा करून उभा राहिला. तो कांहींतरी बोलणार, तोंच सकवारबाई त्याला म्हणाली, "चौकीदार! एक काम आहे. जगजीवनराव प्रतिनिधि अथवा यमाजी शिवदेव यांपैकीं कुणाला तरी ताबडतोब बोलावून आण हें पाहा, यमाजी आले तरी काम भागल. ते नच भेटले तर मग प्रतिनिधींना बोलावून आण"

"आज्ञा आईसाहेब! पण बाहेर गमाजीराव आपली भेट घेण्यासाठीं आले आहेत"

"त्याना आत पाठवून दे" सकवारबाई किंचित् नाखुषीने म्हणाली.

चौकीदार निघून गेला. लगेच गमाजी व तुळाजी हे दोघे येऊन सकवार-बाईसमोर उभे राहिले. सकवारबाईला एकंदरीत गमाजीने तशा अवेळीं येणे आवडलें नाहीं. तशात तो तुळाजीसारख्या कवडी किंमतीच्या माणसाला बरोबर घेऊन आला, हें तर मुळींच आवडले नाहीं. "गमाजी, तू अशा भलत्याच वेळीं इकडे कोणीकडे?" सकवारबाईनें मनातून चरफडत पण बाह्यात्कारी चेहऱ्यावर उसना हसरेपणा आणून विचारलें.

"सांगतों. सर्व कांहीं सांगतों. पण आईसाहेब, प्रथम आपण एका गोष्टीचा बदोबस्त केला पाहिजे." गमाजी जणू काय आपण आईसाहेबांच्या बरोबरीचे आहों अशा ऐटीनें म्हणाला.

"काय झालें? कसला बदोबस्त केला पाहिजे मीं?" सकवारबाईनें बुच-कळ्यात पडल्यासारखा प्रश्न केला.

"आम्ही कोणत्याही प्रसगीं आपल्या जिवाला जीव देणारीं माणसें अस ताना यःकश्चित चौकीदारानें आम्हाला आपणाकडे येण्याला प्रतिबंध करावा याचा अर्थ काय? तो चौकीदार मला कोण समजतो?"

मनात राणी तेव्हा उलट असें म्हणत होती कीं चौकीदारानें अशा अवेळीं असल्या लुग्यासुग्या माणसाना आत सोडावे तरी का? राजवाडा म्हणजे धर्मशाळा आहे की काय? पण गमाजीच्या तोंडावर त्याची समजूत करण्यासाठीं तिला अगदी आपल्या मनाविरुद्ध बोलावें लागलें. ती म्हणाली, " ठीक आहे. मी त्याचा बदोबस्त करीन "

गमाजी राणीच्या तेवढ्या सहानुभूतीच्या शद्वानीं फारच शेफारून गेला व म्हणाला, " आपणावर आमची भक्ति! आपणासाठीं आम्हीं ही राजकारणाची सुळावरची पोळी काढताना जिवाचे इतके आटापेट करतों पण असल्या हलकट नोकराशीं प्रसग पडला की नाक मुठीत घेऊन वर्तावें लागतें."

सकवारबाई पिडाटाळीच्या वृत्तीनें म्हणाली, "मी त्याचा बदोबस्त करीन म्हटलें ना? मी ते सारे करीन."

" नुसत्या तेवढ्यावर भागावयाचे नाहीं आपले मनोदय सिद्धीला जाईतों मला दिवसा–रात्री–मध्यरात्री, पहाटे, आपण झोपी गेलेल्या अथवा आघोळ करीत असतानाही आपली भेट कोणाला न विचारता घेता आली पाहिजे. त्यासाठीं आपण आपली स्वाक्षरीची मुद्रिका अगोदर माझ्या स्वाधीन करा." गमाजी म्हणाला.

सकवारबाईने स्वतःच्या इच्छेविरुद्ध मुकाट्यानें आपल्या बोटातील मुद्रिका काढून गमाजीच्या स्वाधीन केली ती आपल्या बोटात घालता घालताना त्याने एकवार मोठया दिमाखाने तुळाजीकडे पाहिल नतर तो सकवारबाईकडे वळून म्हणाला, " धाकट्या राणीचा काटा अगदीं आपल्या इच्छेप्रमाणे बेमालूम निघाला ना? "

सकवारबाईने यावर काहीं उत्तर न देतां चमत्कारिकपणे नजर फिरवून तुळाजीकडे व तसेच गमाजीकडे पाहिलें.

गमाजी त्या नजरभरारीचा आशय ओळखून म्हणाला, " हा तुळाजी माझा उजवा हात–अगदीं माझा पेशवा आहे म्हणाना! याच्याच साह्यानें मला तें कारस्थान तडीला नेता आलें, व आज मी आपणाकडे याला घेऊन आलों आहें तो याची आजच्या रात्रींतील याहूनही थोर बहादुरी सागण्यासाठीं. "

" मग साग ना लौकर काय तें! " सकवारबाई चेहरा जरा टवटवीत व हंसरा करून तुळाजीकडे किंचित् आपुलकीचा एक नेत्रकटाक्ष फेंकून म्हणाली.

# पेशवाईचा मध्यान्ह

" आपणासाठीं एक भली मोठी शिकार साधण्याच्या कामीं याचें आज मला कल्पनातीत साह्य झालें आहे."

" काय झालें? काय झालें? नीट स्पष्ट साग तर खरें?" सकवारबाई वाढत्या उत्सुकतेनें म्हणाली.

" धाकट्या राणीसाहेबाच्या निधनामुळें महाराजाना स्मशानवैराग्य प्राप्त झालें आहे, आपणाला माहीत आहे ना?"

" महाराजाना स्मशानवैराग्य प्राप्त होत नाहीं केव्हां? अंबिकाबाई वारली तेव्हा तसेंच, विरूबाईला वारली तेव्हांही तेंच आणि आताही तेंच. राण्याची गोष्टच सोड. लक्ष्मी आणि सखू त्या दोन विजवट्या रिद्धिसिद्धि आहेत ना? त्याच्या लेंकावळ्यापैकीं एखाद्याला राज्य द्यायची दुर्बुद्धि महाराजाना सुचणें-ही अशक्य नाहीं. मग नाटकशाळा राणी व्हायची आणि पट्टराणी तिच्या हुकमतींत वागायची. वास्तविक यापूर्वींच महाराजानीं माझ्या मांडीवर दत्तक द्यायचा आणि राज्याचा सर्व भार माझ्यावर सोंपवून तिकडे खुशाल माहुली-ला जाऊन हरि हरि म्हणत बसायचें..."

" तसेंच व्हावें अशी ईश्वराची इच्छा दिसते आहे. नाहींपेक्षा महाराजानीं पेशव्याच्या हातीं राज्याचीं सर्व सूत्रे सोंपवून हरि हरि म्हणत बसण्यासाठीं पेशव्याना तातडीने आज रातोरात चिटणिसामार्फत खलिता रवाना केल्याची वार्ता वेळींच ह्या गमाजीला मिळाली नसती."

"काय, महाराज पेशव्याच्या हातीं राजवटीचा सर्व कारभार सोंपविणार?"

" हें पहा!" गमाजीनें आपल्या अगरख्याच्या खिशातून एक उघडा लखोटा काढून सकवारबाईसमोर ठेवून म्हटलें, "हातच्या काकणाला आरसा कशाला?"

" काय आहे वाचा पाहूं!" सकवारबाई उद्गारली. पण तिची चर्या तेव्हा जर कोणी मुद्राशास्त्रज्ञानें न्याहाळून पाहिली असती, तर अखिल हिंदवी साम्राज्याच्या उलाढालींचे व हालचालींचे नकाशे त्याला तेव्हा तिच्या टीचभर चर्येवर उमटलेले दिसले असते.

गमाजीनें खलिता वाचून दाखविला. तो खुद्द चिटणिसानीं नानासाहेब पेशव्याना लिहिलेला होता. "धाकट्या राणीसाहेबाच्या निधनापासून महाराज अत्यंत उदास व सर्वसंगपरित्यागी बनले आहेत. राजवटीच्या उलाढालींचा

त्यांना अगदीं वीट आला आहे. राजवटीचा सर्व कारभार तुमच्या सुपूर्द करून आपण आपलें शेष आयुष्य हरिनामस्मरणांत घालवावयाचें असा महाराजांचा निर्धार आहे. धाकट्या राणीसाहेबांच्या अवसानकालीं त्यांच्या साक्षीनें त्यांच्या मृत्युशय्येपाशीं महाराजांचा मानस तुम्हाला ज्ञात झालाच आहे; व धाकट्या राणीसाहेबांनींही अखेरचा उपदेश तुम्हाला केला त्याचा आशय तोच होय. यास्तव तुम्हीं ताबडतोब तिकडील हातचीं सर्व कामें अर्धीमुर्धीं असतील तशीं टाकून मारुतवेगानें इकडे यावें व राजवटीची धुरा उचलावी, अशी महाराजांची आज्ञा आहे थोरल्या महालाचीही व्यवस्था आपल्या डोळ्यादेखत नीट लागावी व कोणास च लत्या गडगज व वर्धिष्णु राजवटींत आगलावेपणानें बखेडे करण्यास अवसर मिळू नये, यास्तव ती सारी व्यवस्थाही महाराजांना आपल्या डोळ्यादेखत तुमच्या संमतीनें बांधून टाकावयाची आहे. यास्तव विलंब न करणें. विलंब केल्यास स्वामिचरणीं अविश्वास व स्वामींची आज्ञा उल्लंघन केल्याचें पाप लागून पस्तावा करण्याची पाळी येईल." असा त्या खलित्याचा सारांश होता.

"असें!" सकवारबाई आपल्या दातांनीं ओंठ किंचित् चावून मनांत म्हणाली, "एकूण महाराजदेखील माझ्या ठायीं इतका अविश्वास बाळगितात काय? ठीक आहे."

"असलीं प्रचंड भुयारें आपल्या पायाखालीं खोदलीं जात आहेत!" गमाजी गंभीर वृत्तीनें म्हणाला

"तीं भुयारें खोदणारेच त्यांत गाडले जातील. पण तुला ही खलित्याची खबर कशी मिळाली?"

"अशीं कांहींतरी कारस्थानें खाशा मंडळींत शिजत आहेत हें मला अंदाजानें माहीत असल्यानें थोड्या दिवसांपूर्वींपासून मीं ह्या माझ्या तुळाजी हुजऱ्याला चिटणिसाच्या पदरीं तबेल्यावर कामाला ठेवून दिला आहे. मुद्दाम याला मीं आटपाडीहून इकडे आणविला. एक महिना झाला. पूर्वीं हा चिटणिसाकडे नोकरीला होताच. पण मध्यंतरीं एका नाजुक भानगडीमुळें महिनाभर रुसून आटपाडीला जाऊन बसला होता."

"ती कोणची भानगड?"

"ती आईसाहेबांनीं ऐकण्याजोगी नाहीं." तुळाजी ओशाळून म्हणाला.

" पण ऐकूंदे तर खरी ! " राणी पुन्हा आग्रहपूर्वक म्हणाली.

" काहीं आषुक माषुकाची भानगड आहे " गमाजी हसन उत्तरला.

" ऐकूंदे काय ती ! " राणी पुन्हा म्हणाली.

' आपली ती पुतळा दासी आहे ना, तिच्यावर ह्या उमद्या गड्याचें प्रेम बसलें आहे. ती याला पाहिजे आहे. पण प्रतापराव तिचा नवरा, त्याला याचा संशय आला, व हे जिवलग दोस्त एकमेकांचे साता जन्मांचे हाडवैरी बनले. अशी ती भानगड आहे. त्यातलें सांगायचें तात्पर्य इतकेंच कीं, तुळाजीनें चिटणीस धाकट्या राणीचें सरण पेटवून माघारे आले तेव्हा कारभाऱ्याच्या या सर्व बाटाघाटी ऐकल्या, व तडकतोब येऊन मला खबर दिली. मीं असें पाहिलें कीं, आपल्या राजकारणाची घडी बसते न बसते तों ती विस्कटण्यासाठीं पेशव्यानीं इकडे यावेंच कशाला ? या सद्बुद्धीनें प्रेरित होऊन तो खलिता वेळींच पेशव्याच्या हातीं लागू द्यावयाचा नाहीं असें मीं योजिलें. माझ्या सांगण्याप्रमाणें तुळाजीने चिटणिसाच्या पुढील हालचालींवर नजर ठेवली. चिटणिसानीं प्रतापरावाच्या हातीं तो खलिता पेशव्याकडे रातोरात रवाना केल्याचें कळताच मी व तुळाजी आणखी दोघे मदतनीस घेऊन घोड्यावर स्वार होऊन प्रतापरावाचा पाठलाग करीत निघालों...."

" प्रतापराव ? पुतळेचा नवरा प्रतापराव ? "

" होय. "

" अरे गुलामा ! " राणी स्वतःशीं ' ठीक आहे, पाहून घेईन ' अशा आशयाने मान तुकावून म्हणाली, " बरें पुढे काय झालें ? "

" पुढें काय होणार ? प्रतापराव सुध्या बुद्धीनें थोडाच आम्हाला दाद देणार होता ! आम्हीं त्याला माहुलीपाशीं गाठून ठार केला व त्याच्या जवळचा हा खलिता हिसकावून घेतला. "

" फार छान कामगिरी केलीस. "

" पण आईसाहेब ! प्रतापराव आपल्या आवडत्या दासीचा दादला. त्याचा खून माझ्या हातून झाला, याबद्दल मला अभय पाहिजे. " तुळाजी दोन्ही हात जोडून विनम्र भावाने म्हणाला.

" तुला अभय आहे. इतकेंच काय पण ज्या पुतळेच्या लोभापायीं तूं हें साहस केलेंस, ती पुतळाही लौकरच मी तुला बक्षीस देणार आहें. पण

त्यापूर्वी तुला एक कामगिरी मी सांगणार आहे. तूं जरी चिटणिसांचा नोकर असलास तरी—"

राणीच्या तोंडचें वाक्य पुरें होण्यापूर्वीच गमाजी मध्येंच म्हणाला, "नाहीं आईसाहेब! तो माझा नोकर आहे, तो माझा गुप्त हेर मीं चिटणिसावर सोडला आहे. त्याच्या इमानदारीविषयीं आपणाला जरादेखील शंका नको."

"मग ठीक आहे. तें हेरगिरीचें काम तू अगदीं कसोशीने करावें, व चिटणिसाच्या घरात जीं काय बारीकसारीकदेखील कारस्थानें चालतील तीं मला कळवावीं. तुला माझी केव्हाही भेट घेता येईल अशी व्यवस्था मी देवडीवर करून ठेवत्ये आणि आज ही अमोल कामगिरी तू केलीस, याबद्दल तुला हें घे बक्षीस." असे म्हणून राणीनें आपल्या हातातील सोन्याचा तोडा काढून तुळाजीला दिला.

तुळाजीनें अत्यंत कृतज्ञताबुद्धीने त्या देणगीचा स्वीकार करून राणीला लवून त्रिवार मुजरा केला.

"पण या गोष्टींची कुठेंही वाच्यता करायची नाहीं, अशी माझ्या पायाना हात लावून शपथ घे." राणी लगेच म्हणाली. आपल्या पापकर्माचें तिला मनातून भय वाटले असावें. पापाला वाचा केव्हा कशी फुटेल याचा काय भरवसा!

तुळाजीबरोबरच गमाजीही राणीला पुन्हा उदयीक भेटण्याचें कबूल करून निरोप घेऊन बाहेर निघून गेला ते दोघे बाहेर जातात न जातात तोंच जगजीवनराव प्रतिनिधि व यमाजी शिवदेव आल्याची वर्दी हुजऱ्यानें येऊन दिली.

राणीनें आज्ञा केली, "त्याना आत पाठवून दे."

## प्रकरण ८ वें

# प्रतापरावाचें पिशाच्च

दररोज मोठ्या पहाटे प्रहरीं घोड्यावरून फेरफटका करावयाला जावयाचें हा चिटणिसाचा रोजचा परिपाठ होता. शिवाय या चातुर्मासात तर रोज फिरावयाला जाताना कोटेश्वराचें दर्शन घ्यावयाचें असाही नेमधर्म त्यानीं आरंभिला होता त्या नियमानुसार आजही चिटणीस घोड्यावरून कोटेश्वराच्या दर्शनाला गेले. ते कोटेश्वराचें दर्शन घेऊन गुरुमुखी प्रदक्षिणा घालीत उजव्या बाजूच्या गायमुखापाशीं जातात तोंच देवालयाच्या आवारातील विहिरीच्या मागाहून त्याना कोणीतरी बोललेलें ऐकू आलें, " आपल्या विश्वासू प्रतापरावाचा पुण्याच्या वाटेवर खून झाला आहे, व पेशव्याना आपण दिलेला खालिता शत्रूच्या हातीं पडला आहे. सावध असा. "

चिटणीस एकदम चमकून विहिरीच्या बाजूला पाहतात तों कोणी माणूस दिसेना. त्यानीं चकित होऊन विचारलें, " कोण म्हणतो मीं पेशव्याना खालिता पाठविला आणि तो नेणाऱ्या प्रतापरावाचा खून झाला असें ? "

त्याना उत्तर मिळालें, " मी प्रतापरावाचे पिशाच्च म्हणतों. "

" कोण तो पुढें ये आणि बोल. " चिटणीस मनातून किंचित् घाबरून पण बाहेरून धिटाई दाखवून म्हणाले.

" वेळ आली म्हणजे पुढें येईन. पण आपण माझ्या शद्बाविषयीं विश्वास बाळगा. "

" पण तू प्रतापरावाचें पिशाच्च कशावरून? " चिटणिसानीं प्रश्न केला.

त्याना उत्तर मिळालें, " प्रतापराव कधीं खोटें बोलत नसे, व त्याचें पिशाच्चही कधीं खोटें बोलणार नाहीं. माझ्या शद्बावर आपण विश्वासठेवा. याचा आपणाला आणखी पडताळा पाहिजे असेल तर माहुलीला धाकट्या

आईसाहेबांच्या चितेशेजारीं प्रतापरावाची चिता पेटतांना आपणाला दिसून येईल. याहून आणखी पडताळा पाहिजे असेल तर त्या चितेजारीं महाराजांच्या माणकोजी हुजऱ्याचा मुड्दा पडलेलाही आपणाला दिसून येईल."

चिटणीस दरडावणीच्या स्वरात पुन्हा म्हणाले, "अगोदर तू कोण तो बऱ्या बोलानें पुढे ये, नाहींपेक्षा प्राणाला मुकशील."

त्याना उत्तर मिळालें, "असल्या अविचारापासून कांहींच फायदा होणार नाहीं, पश्चात्ताप मात्र पदरीं पडेल"

पुन्हा चिटणीस दरडावणीची भाषा सोडून नरमाईच्या भाषेत म्हणाले, "तू पिशाच्च नाहींस हें निश्चित तू आमचा कोणी हितकर्ता आहेस असेंच मीं मानतों. तू जर आपली ओळख मला देशील, तर तू सांगितलेली बातमी खरी असल्यास—"

"ती खरी आहे, ती त्रिवार खरी आहे"

"तर मग त्या अपराध्याचा शोध लावून त्याचें शासन करण्याच्या कामीं तुझा आम्हाला चांगलाच उपयोग होईल."

"माझ्या अपराध्याचें शासन करण्याला मी समर्थ आहे"

"तुझें मी जन्माचें कोटकल्याण करीन."

"माझें सारें कल्याण मी देवाच्या चरणीं वाहिले आहे. आता आपणाला अपराध्याचा तपास लावावयाचाच असेल तर सांगतों, अपराधी माणूस हा आपल्या अस्तनींतील निखारा आहे आपण आपल्या अस्तन्या नीट शोधून पाहा. आता माझी वेळ भरली, मी जातों." असे म्हणून तें पिशाच्च विहिरीच्या मागील बाजूनें पळत निघून गेलें. झाडाच्या सावलींत काळोखात ती कोणींतरी पिशाच्चरूपी छाया पळत गेली एवढेंच चिटणिसाना दिसलें. तेव्हा ते आपल्या मनात इतके गोंधळून गेले होते कीं, पुढें त्या पिशाच्चाचें काय झालें, तें कोठे गेलें हें पहाण्याइतकेंही भान त्याना उरलें नव्हतें.

अमळशानें ते भानावर येऊन पहातात तो तें पिशाच्चही कोठें दिसेना! तेव्हा मात्र पुन्हा त्याना वाटले कीं ही खरोखरच पिशाच्चलीला तर नसेल!

इतकें झाले तरी त्याना प्रतापरावाच्या खुनाची वार्ता खरी वाटेना. पण माणकोजीच्या खुनाचा व दुसऱ्या चितेची वगैरे निर्वाळा पिशाच्चानें दिला होता, त्याचा पडताळा पाहावयाचें ठरवून ते पुढें फिरावयाला न जाता तसेच

माघारे आपल्या वाड्यांत गेले, व तुळाजीला हाक मारून त्यांनीं त्या एकंदर गोष्टीचा तपास करण्याची आज्ञा केली.

तुळाजीलाही अचंबा वाटला कीं आपण इतक्या गुप्त रीतीनें केलेल्या खुनाला इतक्या लौकर सूर्योदयापूर्वीच वाचा कशी फुटली? पण तो आश्चर्य-सागर मनातल्या मनात पिऊन त्याला तपास लावण्याऱ्या निमित्ताने माहुली-पावेतों जाणें भागच होतें. प्रतापरावाच्या खुनाची एक बाब सोडली, तरी माणकोजीचा खून आणि प्रतापरावाची चिता हा काय प्रकार आहे, याचा तपास करण्यात त्याला फार कुतूहल वाटत होतें. आणि त्या सर्व कुतूहलाच्या जोडीला भयही वाटत होते कीं आपलें कृष्णकर्म उजेडात येतें कीं काय? खाई त्याला खवखवे या न्यायानें त्यानें निष्कारण विश्वासघातानें प्रताप रावाच्या पत्नीवर पापी दृष्टि ठेवून त्याचा खून केला असल्यानें चिटणिसांनीं प्रतापरावाच्या भुताची हकिकत सांगितली ती त्याला खरीच वाटत होती. इतकेंच काय पण प्रतापराव जर भूत झाला असेल तर तो आपल्या मान-गुटीला बसून आपणाला छळील कीं काय, ह्या भीतीनेंही त्याची अगदीं पांचावर धारण बसली होती तो रातोरात घोड्यावर स्वार होऊन माहुलीकडे निघाला, तेव्हा रस्त्यात कोठें वृक्षाची सावली दिसली कीं त्याला वाटावें, हें प्रतापरावाचें भूत तर आपला पाठलाग करीत नाहीं ना? पहाटेची वेळ असल्यानें वृक्षाच्या फांदीवर पाखरें फडफडलीं तरी त्याला वाटावें, आपणावर सूड घेण्यासाठीं—आपली मानगूट पकडण्यासाठीं प्रतापरावाचे भूत ह्या झाडा-वर बसलेलं नाहीं ना? अशी त्याच्या मनाची धागधूग तो माहुलीच्या अर्ध्या वाटेवर पोहोंचून पायाखालीं चांगलें दिसू लागेतों एकसारखी चालली होती. जाताना त्यानें प्रथम प्रतापरावाचा जियें खून पाडला होता तिथें जाऊन पाहिले. तों तेथें त्याचें प्रेत नाहीं! कोल्ह्या कुत्र्यांनीं तें प्रेत फाडून खाल्लें म्हणावें तर त्याचा अवशेषही तेथे नाहीं! तेथून तो माहुलीच्या स्मशानात गेला. तों तेथें त्याला धकस्या राणीच्या शेजारीं एक चिता पटताना दिसली, व जवळच माणकोजीचा मुडदाही दिसला.

ही विचित्र घटना काय असावी याचा तेथे तपास करूनही काहीं शोध लागत नाहीं असें पाहून तुळाजी माघारा निघाला तो प्रथम थेट रंगमहाला-कडे गेला. तेथे पुतळेला भेटून आपल्या पापाला वाचा फुटत आहे की

काय याची चौकशी करण्याचा बेत त्यानें केला. त्या रात्रींच पाहिजे तेव्हां राजवाड्यात थोरल्या राणीच्या महालांत प्रवेश करण्याची मोकळीक मिळाली असल्यानें आत जाऊन पुतळेची भेट घेण्याला त्याला यातायात पडली नाहीं.

"आज सारी रात्र इथेंच वस्तीला होतीस वाटतें!" तुळाजीनें पुतळेच्या पांढऱ्या फटफटीत कपाळाकडे पाहून मनातल्या मनात चूर होऊन कांहींतरी प्रश्न विचारावयाचा म्हणून विचारला. त्याला शंका आली, प्रतापरावाच्या निधनाची वार्ता कानीं आल्यामुळें तर हिनें कुंकु पुसलें नाहीं ना? पण लगेच त्यानें आपल्या मनींच्या दुसऱ्या तर्कानें पहिला तर्क खोडून टाकला, "छे! हिला ती वार्ता खास कळली नसेल. ती कळली असती तर ती एव्हा पुढें कशाला आली असती?"

पुतळा उत्तरली, "होय आज इथेंच होत्यें धाकट्या राणीसाहेबांची तशी दशा झाल्यावर आम्हाला कुठचें घर आणि कुठचे काय? थोरल्या आईसाहेबाचाही रात्रभर डोळ्याला डोळा कसा तो लागला नाहीं."

तुळाजीनें त्यावरून तर्क केला, पुतळा रात्रभर घरीं गेलीच नाहीं, तिला कांहीं तो प्रकार माहीत नाहीं. तो आपलेपणाच्या भाषेंत म्हणाला, "अग, पण तुझ्या कपाळाला कुकुं नाहीं!"

"कुकू कपाळाला नाहीं? लावून येत्यें." पुतळा आत जाता जाता म्हणाली, "बाकी कुकू असले काय आणि नसलें काय, सारखेंच."

आता पुतळेनें पुन्हा कुकू लावून यावयाचें, व मागाहून तिला आपण विधवा झाल्याचें कळावयाचे, असा विस्मयजनक योगायोग जुळून येणें तुळाजीला इष्ट वाटले नाहीं. त्यानें पाहिले, प्रतापरावाच्या मृत्यूची बातमी पुतळेला अजून कळली नसली तरी ती केव्हातरी कळणारच मग आपणच तिच्यात जरूर तेवढी मखलाशी करून का न सागा? काहीं झालें तरी एका म्यानात काहीं दोन सुऱ्या राहू शकत नाहींत, प्रतापराव हयात असेतों– पुतळेची तशी समजूत असेतों–ती मनलज्जेनें नाहीं तरी जनलज्जेनें तरी आपणाला वश होऊ शकणार नाहीं तिच्या आताच्या उद्गारावरून त्याला नवा धीर येऊ लागला होता कीं त्या नवराबायकोचें अलीकडे काहींतरी कारणावरून बिनसलें असावे. कोठें व्रण दिसला कीं कावळ्याला ती पर्वणीच! आतां पुतळेला वश करण्यासाठीं दरम्यान् जो कालावधि लोटावयाचा, तो

शक्य तों वांचविण्याच्या इराद्यानें त्यानें पुतळेला हांक मारली, "पुतळे! अगोदर इकडे ये."

"काय?" पुतळेनें जवळ येऊन विचारलें.

"आता तू काय म्हणालीस?"

"माझें कर्म म्हणाल्यें. त्याच्याशीं इतराना करायचें आहे? माझ्या कर्माशीं कर्म घासून तुलाही माझ्याप्रमाणेंच दुःखी व्हायचें आहे का?"

"होय; व्हायचें आहे. तुझ्यासारख्या लाखातल्या तरुणीसाठीं दुःखी होण्यातही सुखच आहे असें मी मानतो" तुळाजी उत्तरला.

"सोडून द्या त्या गोष्टी. अशक्य जें आहे, त्याच्या शक्यतेविषयीं मनाला फोल आशेच्या काटेरी कुपणावरून फरफटत ओढण्यात अर्थ काय?

तुळाजीला जास्त खात्रीलायक वाटलें कीं पुतळा आपणावर अनुरक्त आहे खास! तो मनात हर्षून म्हणाला, "पुतळे! तुझ्या आताच्या उद्गारानीं माझ्या अंतःकरणात भलतीच कालवाकालव उत्पन्न केली आहे."

"ती कालवाकालव आजची का आहे? ती नेहमींचीच आहे. पण पुढें काय?"

"इतके दिवस तुझ्या अंतःकरणाचे दालन माझ्यासाठीं खुले नव्हतें."

"माझे अंतःकरण म्हणजे कांहीं सताड उघड्या दरवाजाची धर्मशाळा नाहीं. चौदा रत्नें जशीं समुद्राच्या उदरीं साठविलेलीं होतीं व तीं काढण्यासाठीं देवदानवाना कष्टाने समुद्रमथन करावे लागले, तशीच गोष्ट सभ्य व अब्रूदार स्त्रीच्या प्रेमाची आहे."

"हें मला इतके दिवस माहीत नव्हतें."

"मग आजच बरें माहीत झालें?"

"आज एका विचित्र योगायोगानें माहीत झाले."

"कसला विचित्र योगायोग तो सांग तर खरा!" सापाला पकडून पोतडींत घालण्यासाठीं व त्याचे मग दात पाडून त्याला स्वतःच्या इच्छामात्रें-करून दारोदार नाचविण्याकरिता गुलाम करण्यासाठीं गारोडी सापाच्या वारुळापाशीं जाऊन नागसूर वाजवितो, तसा हा प्रकार पुतळेनें आपण होऊन चालविला होता.

आता आपण अगदीं निर्भयपणें बोलावयाचेंच, पुतळेचें मन काबीज करण्याची हीच वेळ आहे, असें समजून तुळजी म्हणाला. "होय. अशीच

एक वार्ता आणली आहे मी. पण ती शुभवार्ता आहे असें म्हणण्याला मात्र माझें मन धजत नाहीं."

"खऱ्या अतरींच्या जिव्हाळ्याखेरीज इतका निर्भयपणा माणसाच्या अगीं उत्पन्न होणारच नाहीं" पुतळा आपल्या स्त्रीस्वभावाला शोभेसें किंचित् हसल्यासारखें करून मानेला नाजुकसा हिसडा देऊन म्हणाली.

तुळाजीनें मनात निर्धारपूर्वक म्हटले, बोलावेंच आता. पण कसें बोलावें आणि काय बोलावें ? प्रतापरावाच्या खुनाची वार्ता तर पुतळेला सांगायचीच; पण ती सांगतानाही तिच्या मनात आपणाविषयी परमादर उत्पन्न झाला पाहिजे. प्रतापरावाचा खून करून आपण पुतळच्या प्रेमाची बाजारपेठ काबीज करण्याचा जो घाट घातला, तो औदार्याच्या नटव्या देखाव्यानें विशेष सुलभतेनें पार पाडता येईल मेलेल्या म्हशीचे पाच शेर नव्हे पचवीस शेर दूध सांगायला काय हरकत ? प्रतापरावाच्या व आपल्या मैत्रीची मायावी थोरवी आता वर्णन केल्यानें आपलें काय बिघडणार आहे ? आपलें संभाषण कोणी चोरून ऐकत उभीं नाहींत ना हें न्याहाळून, व कोणी ऐकत नाहीं, आपणाला बोलावयाला पूर्ण एकान्ताची वेळ सापडली आहे, अशी पूर्ण शहानिशा करून घेऊन तुळाजी पुतळेला म्हणाला, "पुतळे! ही तू मला सुतकात साखर खाऊ घालते आहेस. मी सध्या सुतकात आहें."

"कोणाच्या ?"

"माझ्या जिवलग मित्राच्या. प्रतापरावाची काय हालहवाल आहे तुला माहीत आहे का ?"

"नाहीं. त्याची हालहवाल आताशा मला कळतच नाहीं."

"म्हणजे ?"

"आम्ही आताशा नवराबायको नुसतीं नांवापुरतीं आहों. त्याचें मन माझ्या ठायीं नाहीं, व माझें मन त्याच्या ठायीं नाहीं."

"तुझें मन कुठें आहे तर मग ?"

"जाग्या माणसाला मी जागें कसें करूं बरें ?"

"समजलें !" तुळाजीच्या अतःकरणात गुदगुल्या होऊं लागल्या. तो हर्षभरित चित्तानें म्हणाला, "आणि त्याचें मन ?"

"सांगूं का ? तुला वाईट नाहीं ना वाटणार ?"

"साग, नाहीं वाईट वाटणार."

"माझ्या गळ्याची शपथ?" पुतळेनें लडिवाळपणाने आपल्या गळ्याकडे हात नेऊन विचारलें.

"तुझ्या गळ्याची शपथ!" तुळाजीनें तिच्या गळ्याला हात लावून सांगितलें. आपण पुतळेच्या गळ्यातला ताईत आहो याविषयीं आता त्याला सशय घेण्याला जागाच कुठें राहिली?

"त्याचे मन होते तुझ्या बायकोवर." पुतळा बळेच तुळाजीला डिवचण्यासाठीं खोटेच म्हणाली

तुळाजीच्या मस्तकावर जणू वीज कोसळली. तो काहीं काळ दोन्ही हातानीं आपलें मस्तक घट्ट धरून जागच्याजागीं खुटासारखा उभा राहिला व लगेच म्हणाला, "तर मग परमेश्वरानें तुझ्या नवऱ्याला देहान्तशासन दिलें तें यथायोग्य केले." तुळाजी भुवया चढवून त्रासून म्हणाला.

"म्हणजे!" पुतळेने अपरिचिताप्रमाणें अगावर शहारे आणून विचारलें.

"म्हणजे काय? तुला मीं आताच सांगितलें ना, कीं मी माझ्या मित्राच्या सुतकात आहे म्हणून?"

"कोणत्या अपघातात ते वारले? कीं त्याना कुणीं ठार मारलें?"

"त्याला ठार मारले गेले. गेल्या रात्रीची गोष्ट. मी आमच्या धन्याकडून काहीं निकडीच्या कामासाठी पुण्याला चाललों होतों. तों वाटेत माहुलीपाशी हा भयकर प्रकार पाहिला. मी तेव्हा एकटा असल्यानें मला त्याचा बचाव करता आला नाहीं. पण ते लोक मी दुरून ओळखले. ते माझ्या सासुरवाडीचे शेजारी होते ते हें भयकर कृत्य करून निघून गेल्यावर मीं जवळ गेलों. प्रतापराव आता जरी माझा वैरी असला, तरी तो माझा एका काळचा मित्रच मित्राच्या जिवावर बेतल्यावर वैर आठवून त्याच्या दुःखावर डागण्या देण्याइतका उरफाट्या काळजाचा नीच माणूस मी नाहीं. मी जवळ जाऊन विचारपूस करता त्यानें आपणाला कोणीं मारलें, का मारलें वगैरे कांहींच सांगितलें नाहीं. तो एवढेच म्हणाला, माझ्या कर्मानें मी मरतों आहें. मात्र तेव्हा त्यानें तुझा उल्लेख केला, तू जरी म्हणालीस कीं तो तुझ्याशीं नीट वागत नव्हता, तरी त्या अखेरच्या क्षणाला त्याला तुझी आठवण झाली व दया आली. किंवा ती त्याला अतकाळीं उपरति झाली

असेल, नाहीं कोणीं म्हणावें ! त्यानें तुझ्या प्रतिपाळाची सारी जबाबदारी मजवर सोंपविली आहे. तो मला आणखी असेंही मोघम बोलला कीं, "तुळाजी, तुझ्या सुखात विष मीं कालविले आहे. आणि एका परीनें पुतळेलाही मीं दुःखी केले आहे. तिचें तुझ्यावर व तुझे तिच्यावर मनापासून प्रेम आहे हें मी पूर्वीच ओळखून चुकलों होतों. तो प्रकार मला फार तापदायक झाला हें जरी खरे, तरी पण आयुष्याच्या ह्या अखेरच्या क्षणाला त्या सर्व पाप-तापाचा आपोआपच शेवट होत आहे. आता तू पुतळेच्या इच्छेप्रमाणें तिला संसारात आधार देऊन सुखी करावें व स्वतः सुखी व्हावें !" अशी इच्छा प्रतापरावाने मरत्या घडीला दर्शविली, व मींही त्याला तसें वचन दिले आहे. "

इतक्यात दुसऱ्या एका कुळंबिणीने येऊन राणी पुतळेचा शोध करीत असल्याचें सांगितले

" आल्ये मी " पुतळा म्हणाली.

कुळंबीण निघून गेली.

" बरें, पुढे काय झाले ? " पुतळेन विचारलें.

" पुढें काय ? मीं प्रतापरावाला त्याच्या अखेरच्या इच्छेप्रमाणें वागण्याचें वचन दिलें व त्याने माझ्या मांडीवर डोके टेकून प्राण सोडला. माहुलीला जाऊन रातोरात त्याच्या प्रेताच्या दहनाची व्यवस्था मींच केली ! "

तोंच पूर्वीचीच कुळंबीण येऊन पुन्हा हाका मारू लागली.

" आल्यें, आल्यें. " पुतळा घाईघाईने आत जाता जाता म्हणाली, " आपण भेटू पुन्हा केव्हातरी हे वातावरण अमळ निवळल्यावर. "

प्रकरण ९ वें

# रंगमहालांतील खलबत

" दोघेही एकदम आला ? " राणीनें प्रतिनिधि व मुतालिक या दोघानाही एकदम आलेले पाहून विचारले.

" पुढील परिस्थितीचा विचार करीत आम्ही आमच्या वाड्यात बसलों होतो. प्रथम हुजऱ्या मुतालिकाकडे गेला, व ते तेथे नाहींत असें कळल्यावर आमच्याकडे आला निरोप ऐकला तेव्हा म्हटले, ज्याअर्थी इतक्या रात्रीं आपले बोलावणे आले आहे, त्याअर्थी दोघानींही जाणें चागले. " प्रतिनिधि म्हणाले

" दोघेही आला तेही एका अर्थी चागलेच झालें. पुढच्या परिस्थितीचा विचार तुमच्या डोक्यात घोळतच आहे म्हणता, मग सागा, काय विचार ठरला ? "

" आमचा विचार हाच ठरला की देवालयात देवी आहे, त्या देवीनें जसा कौल द्यावा, तसे आम्हीं वर्तावे. " प्रतिनिधि म्हणाले.

यमाजी शिवदेव मध्येच म्हणाला, " एकदरींत परिस्थिति अशी दिवसें-दिवस घोटाळ्याची निर्माण होत आहे कीं, आपण तापल्या तव्यावर पोळी भाजून घेतली तरच गत्यतर. नाहींपेक्षा आपला एकही मनोरथ सिद्धीला जावयाचा नाहीं. मघाच मला कळलें कीं श्रीमत पेशवे आम्हा कोणाला न कळत धाकट्या आईसाहेबाच्या अवसानापूर्वी थोडा वेळ त्याची व महाराजाची भेट घेऊन गेले, व तेव्हा त्या तिघाच्या एकमेकाशीं काहीं आणाशपथा झाल्या असेंही ऐकतों. "

" मींही तें आताच ऐकलें. " राणी म्हणाली.

" मलादेखील ते पूर्वीं माहीत नव्हतें चार सहा महिन्यांपूर्वी ज्या पेशव्याना महाराजानीं पेशवाईपदावरून काढून टाकलें होतें, त्याच पेशव्याशीं

आज महाराज आम्हां इतर कारभाऱ्याच्या अपरोक्ष हितगुजें करू शकतात, यावरून पेशवे आणि त्याचा कैवारी पक्ष यानीं राजवटींत आपल्या मनाप्रमाणें आपला तळिराम गार करण्यासाठीं किती खोल कारस्थान रचिलें असावें याची साधारण कल्पना करता येते. " प्रतिनिधि म्हणाले.

" मी असें ऐकत्ये कीं राजवटीच्या भावी व्यवस्थेविषयींचा खल त्या बैठकींत धाकटी राणी आणि महाराज यानीं पेशव्याशीं केला. " राणी म्हणाली.

" एकूण आपल्या कानींदेखील ही वार्ता आली तर?" प्रतिनिधि म्हणाले.

" तर! आणि चिटणीसदेखील या बाबतींत पेशव्याना सामील आहेत म्हणे! " राणी म्हणाली.

यमाजी म्हणाला, " चिटणीस हे एक बिन् बुडाचें भाडें आहे. गंगा गये गगादास व जमना गये जमनादास म्हणतात, तशी त्याची अवस्था आहे. त्याना स्वतःचें असें मन व दूरदृष्टि मुळींच नाहीं. चिटणीस छत्रपतींच्या गादीचे पिढीजाद एकनिष्ठ सेवक खरे. पण महाराजाचा खडया कुत्रा काय कमी एकनिष्ठ सेवक होता? चिटणिशी कसब खर्डेघाशींत पाहून घ्यावें. शख कितीही योग्यतेचा झाला तरी देवाच्या देव्हाऱ्यात देवाच्या पायदळीं बसण्याचीच त्याची योग्यता. त्याना देवाच्या पचायतनात जागा मिळाली कीं राजवटींत जिकडे तिकडे शखध्वनीच व्हावयाचा. पिढीजाद खर्डेघाशीमुळे चिटणिसाना मोत्याच्या दाण्याप्रमाणें सुदर अक्षर काढता येईल. पण राजकारणातील बुद्धिबळाचे डाव खर्डेघाशीच्या कसबावर खेळता येत नसतात. "

" ते सर्व खरे." प्रतिनिधि पोक्तपणे म्हणाले, " पण तो शख आज देवाच्या पचायतनात जाऊन बसला आहे ना? आणि त्यामुळें तुमच्याआमच्यासारख्या इतर देवाना निर्माल्यात कुजत पडण्याची पाळी आली आहे. ही मात्र पेशव्याची शहामत खरी."

"यात शहामत कसली? कवडीमोलाच्या मालाला मोहोरेचें मोल देणें हें काहीं औदार्य नव्हे, हा गाजरपारखीपणा आहे..."

यमाजी मध्येच म्हणाला, "नाहीं आईसाहेब, हा गाजरपारखीपणा नसून हा इरसाल धूर्तपणा आहे. प्रतिस्पर्ध्यावर कधीं प्रेम करू नये, त्याची मानमान्यता वाढेल अशी कोणती गोष्टही जाहीरपणें करू नये. पण सर्रास उपेक्षा

ह्या प्रतिस्पर्ध्याला नामोहरम करण्याचा मार्ग खास नव्हे. पेशवे जर गाजर-पारखी असते, तर आपण सर्वजण त्याना पेशवाईपदावरून उठवून लावण्याचा इतका आटोकाट प्रयत्न करीत असता त्याचा टिकाव मुळींच लागला नसता इतक्या लहान वयात इतकीं सारीं अनुसधाने राखून यशस्वितेनें राजकारणाचे बुद्धिबळाचे डाव खेळत राहणें हें कोणा साध्यासुध्या गाजर-पारख्याला तर शक्य नाहीच, पण किंचित् कच्च्या दिलाचा मुत्सद्दीही अशा आणीबाणीच्या वेळीं पुरा पडणार नाहीं."

"हें पेशव्याविषयींचें नवेंच भय तुम्ही माझ्या मनात उत्पन्न करीत आहा. त्याच्या मानभावी पराक्रमाने तुमचेदेखील डोळे दिपून गेले असे मीं समजावे काय?" राणीने गभीर वृत्तीने विचारले. यमाजीच्या आताच्या उद्गारावरून तिच्या मनोमय वातावरणात निराशेचे कोरडे मेघ दाटू लागले.

"असे नाहीं. माझ्याविषयीं काय अथवा राणीविषयीं काय, अशी शका देखील आपल्या मनांत यावयाला नको. पण आपणाला सूचना देणे अवश्य वाटले म्हणून दिली."

"पेशवा हा नाग आहे, व तो भोळ्या शकराने आपल्या कठीं धारण केला आहे. त्याला मारताना शकराच्या मानेला धक्का लागणार नाहीं इतकी खबरदारी बाळगणें हेंच महाकर्म कठीण आहे." प्रतिनिधि म्हणाले.

"पण नागच तो, केव्हातरी आपल्या जातीवर जायचाच! तो केव्हातरी शकराच्या मानेला डसायचाच. मी काय म्हणत्ये त्याचा तुम्हा दोघाना नीट उमज पडला का?"

"उमज पडला. पण—" एवढें बोलून प्रतिनिधि अडखळले.

असे अडखळला का? तो नाग आज शकराचा कठ सोडून दूरच्या रानीं चरायला गेला आहे, त्याला तिकडच्या तिकडे ठेंचण्याची काहींतरी युक्ति शोधून काढा. तो पुन्हा माघारा येऊन शकराच्या गळ्याला विळखा घालून बसला कीं आज नखानीं होणारें काम पुढें कुऱ्हाडी लावूनही व्हायचे नाहीं."

राणीचे उद्गार ऐकून प्रतिनिधि व यमाजी काही न बोलता एकमेकाच्या तोंडाकडे टकमक पाहू लागले.

"इतका विचार कसला करता? पुरुषासारखे पुरुष होऊन इतका विचार-इतकी चिंता?" राणीने प्रश्न केला.

"विचार आणखी कसला नाहीं, पण आईसाहेब, असली अवघड योजना ठरविणे जितके सोपे आहे, तितकें ती अमलात आणणे सोपे नाही. इथे प्रसंग विरेळ्याशी नसून जातिवंत नागाशी आहे."

यमाजीने आपल्या धन्याचा पाठपुरावा केला, "आणि तोही एकवार डिवचून जखमी केलेल्या नागाशी आहे. पेशव्याना पेशवाईपदावरून ढळविण्याचें कारस्थान आपण केले होते, त्याचा पेशव्याना खास विसर पडला नसेल आपण त्याच्या पाडावाचे बेत जसे करीत असतो, तसेच तेही आपल्या पाडावाचे बेत खास करीत असले पाहिजेत पूर्वीइतके ते बेसावध कधींच नसतील, आपणाविषयी त्यानीं पक्का डाव मनात धरला असेल. अशा स्थितीत त्याच्याशीं पुन्हा दावेदारी मांडावयाची–त्याना दुखवावयाचे तर त्याचा अगोदरच चांगला विचार करावयाला हवा. नाहीपेक्षा हातून सुटलेला तीर सावजाला लागणारही नाहीं आणि माघारा घेता येणारही नाहीं."

"बरें, ते आपण मागाहून पाहू. तूर्त आपले बेत सिद्धीला जाण्यासाठीं पेशव्याना पायबंद लावणें अवश्य आहे हे तरी खरें ना?" राणीने किंचित् नमतें घेऊन विचारलें.

"हो! पायबंद तर लागलेच पाहिजेत. हें आपण यापूर्वींही अनेक वेळा बोलून मुक्रर केले आहे" प्रतिनिधि उद्गारले.

"यापूर्वींची वेळ निराळी होती, व आताची निराळी आहे. पेशव्याच्या पूर्वपुण्याईने त्याना सध्या राजकारणात हरएक बाबतींत यश येत आहे. निजामसारख्या प्रबळ शत्रूलाही ते खडे चारू शकले."

"त्यात काय एवढे मोठेसे?" प्रतिनिधीना पेशव्याची कोणीही प्रशंसा केलेली सहन होत नसे. तसा मुद्दा कोठेही उपस्थित झाला कीं तो जागच्या जागीं खोडून काढण्यात ते कमालीची तत्परता दाखवीत. ते म्हणाले, "मी जर पेशवा असतो, त्याच्याइतकी सत्ता जर माझ्या हातीं असती, साधनाची अनुकूलता असती व महाराजाची त्याच्यावर आहे इतकी कृपा माझ्यावर असती, तर मीं असा दहा निजामाना एकट्यानें लोळविलें असतें. पण महाराजानीं आमची अवस्था पेशव्याच्या नादानं पंख तोडलेल्या गरुडासारखी करून ठेवली आहे आई जेवू घालीना आणि बाप भिकेला धाडीना त्यातली आमची दशा आहे."

## पेशवाईचा मध्यान्ह

सकवारबाई प्रतिनिधींचा वकूब पुरा ओळखून होती. पण खरें बोलल्यानें स्वारी बिघडावयाची, या भीतीनें तिनें मोठ्या चतुराईनें तो मुद्दा गाळून म्हटले, "महाराज पेशव्याचे पूर्वजन्मींचे देणेकरी आहेत. "

"हें मात्र अगदीं सोळा आणे बोलला कसायाला गाय धारजिणी म्हणतात त्यातला हा सारा मामला आहे" प्रतिनिधि प्रसन्न चित्ताने म्हणाले.

"आणि जसजसे पेशवे विजयी होत आहेत तसतसे त्याचें सामर्थ्य व त्याची लोकप्रियता वाढत असून ते महाराजाच्या विश्वासाला व प्रीतीला अधिकाधिक प्राप्त होत आहेत. म्हणजे पर्यायाने आपली बाजू दिवसेदिवस दुबळी होत चालली आहे. जनतेचा ज्याच्यावर विश्वास तोच अखेर साधणार हें तर खरें ना?" राणीने विचारले.

"खरें. पण आपल्याहीमागें जनता नाहीं असें नाहीं." यमाजी म्हणाला.

"राजवटीचे कर्ते कारभारी हे जततेचे खरे डोळे व पचप्राणही होत"

"ते पचप्राण बहुधा आपल्याच मुठींत आहेत. फत्तेसिंगबाबा घ्या, रघूजी बाबा भोसले घ्या, पेशव्याचे आप्त बाबूजी नाईक घ्या, दाभाडे घ्या, गायकवाड घ्या, सुमत घ्या, हे आज महाराजाच्या भयानें पेशव्याशीं किंचित् नमत्या नूराने वागत असले तरी त्याचा खरा ओढा आपणाकडेच आहे." प्रतिनिधि म्हणाले.

"पण तो ओढाही महाराजाच्या विचित्र वर्तनामुळे दिवसेदिवस कमी होण्याचा संभव आहे. तुमची एक गोष्ट निराळी, तुम्ही पिढ्यान्‌पिढ्या पेशव्याना विरोध करणारापैकीं आहा. पण सारेच कारभारी कुठे तुमच्यासारखे पेशव्याविरुद्ध वीरकंकण हाती बाधून सामन्याला उभे आहेत? 'रामाय स्वस्ति, रावणाय स्वस्ति' असें म्हणून कार्यभागावर नजर ठेवून वागणारेच फार!"

"आईसाहेब म्हणतात तें अक्षरशः खरें आहे आता यातून मार्ग कसा काढावयाचा हीच काय ती अडचण आहे." यमाजी म्हणाला.

"ती अडचण तुम्हाला मोठी वाटते तितकी मला वाटत नाहीं. असे पाहा, वणवा झाला तरी ठिणगीचाच पेटतो. ती ठिणगीच मुळात सावधान चित्तानें विझवून टाकल्यावर वणवा भडकेल कशाला व तो विझवण्याचे संकट पडेल कशाला?

"आपण चतुर, राजकार्यधुरधर, आपल्या पाठीला डोळे आहेत. आपणच काय तें सागा. आम्ही आपल्या आज्ञेप्रमाणे वर्तावयाला तयार आहों." प्रतिनिधि हात जोडून उद्गारले. पण मनातून त्यांनींही परस्पर सन्याशाच्या हातून विंचू मारण्याची युक्ति लढविली होती. पेशव्याना नामोहरम करण्याच्या कामीं यश मिळालें तर ते त्याचे, व अपयश मिळालें तर त्याला थोरल्या आईसाहेब धनी ! "

चिटणिसानीं पेशव्याना पाठवू केलेल्या खलित्याचा वृत्तात याना सागावा कीं न सागावा याचा राणी इतका वेळ आपल्या मनाशीं विचार करीत होती. अखेर तिने तें रहस्य प्रतिनिधि व यमाजी यांना उलगडून दाखविण्याचे ठरवून म्हटले, " आता आपल्याला पहिली उपाययोजना ही केली पाहिजे कीं महाराज वनवासवाडीतून राजवाड्यात माझ्या देखरेखीखालीं येऊन राहिले पाहिजेत. "

" मला वाटते, आपलीं कारस्थाने यथास्थित पार पाडण्यासाठीं महाराज थोडे दूर असलेलेच बरे. " प्रतिनिधि म्हणाले

" नाहीं महाराज राजवाड्यात माझ्या देखरेखीखालींच असले पाहिजेत म्हणजे आमच्या प्रतिपक्षाचे पाय लगडे पडतील त्याना उठल्या बसल्या महाराजाच्या कानाशीं लागून खलबते करता येणार नाहींत आपले कालच चुकलें. महाराजाना आपण वनवासवाडीला राहावयाला मोकळीक द्यायला नको होती अवघी एका रात्रीची फुरसत मिळाली, पण तेवढ्यात चिटणिसांनीं महाराजाचे कान फुकून साऱ्या मराठी साम्राज्याचे उदक पेशव्याच्या हातावर सोडण्याचा केवढा मोठा घाट घातला ! त्याचें हें पहा प्रत्यतर ! " असें म्हणून राणीनें आपल्या जवळचा खलिता प्रतिनिधींच्या हातीं दिला.

प्रतिनिधि व यमाजी ह्या दोघानीं तो खलिता वाचून तोडात बोटें घातलीं.

" मी इतका वेळ काय बोलल्यें तें तुम्हाला आता तरी पटलें ना ? " राणीनें विचारलें

" पटलें. निर्विवाद पटलें " प्रतिनिधि व यमाजी एकदम उत्तरले.

" यावर एकच तोडगा—मीं सागितला तो. यापुढे आपला दत्तकाचा बेत सिद्धीला जाईतों महाराज आणि ही मडळी याना एकत्र विचार करण्याची सधीच देता कामा नये. मग पेशवे नव्हे त्याचा परमेश्वर आला तरीदेखील

मी त्यांना महाराजांशीं गुप्त खलबतें करण्याची संधी देणार नाहीं. हें घरचें राजकारण मी सांभाळत्यें, आणि दत्तकाचे बाहेरचें राजकारण तुम्ही सांभाळा."

"तें काम आम्ही करतों. मात्र आमच्या जोडीला आपलाही आग्रह महाराजांना पाहिजे. दत्तकाचा प्रश्नही आपण समाधानकारक सोडवू शकूं. पण त्या बाबतींत महाराजाचें मानस काय आहे?" प्रतिनिधींनीं विचारलें

"तूर्त महाराजांना स्वतंत्र मानस असे कोणत्याच बाबतींत कांहींच उरलेले नाहीं. ती एक नुसती दुधारी तरवार आहे असें समजा. ज्याच्या हातीं ती सांपडेल व ज्याला ती चालविता येईल, त्याची फत्ते. त्याच्या मनाचा अंत जरी लागत नाहीं, तरी मीं एखादी योजना सुचविली तर ती धुडकावून लावण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं नाहीं हें खास."

"मग आपला दत्तकाच्या बाबतींतील नक्की विचारही एकदा सांगून ठेवा. म्हणजे त्या अनुरोधानें उद्योग करण्याला बरें पडेल. नागपूरकर रघूजीबाबाचा मुलगा तर आपणाला नापसंत आहे."

"तो नापसंत होता. पण आतां तो तितकासा नापसंत नाहीं. कारण धाकटी राणी गेल्यामुळें राजघराण्यातील फूट आपोआपच मिटली. आतां मुधोजी भोंसल्याला दत्तक घेतल्यावर तो कसा झाला तरी आमच्याच तंत्रानें वागणार. महाराजाचा प्रश्नच सोडून द्या. पेशवे व रघूजीबाबा यांचे विशेष सूत नसल्यानें ते व नवा छत्रपति पेशव्याच्या तंत्रानें वागतील हें शक्यच नाहीं. उलट या निमित्तानें रघूजीबाबाशीं आमचे दृढतर संबंध आल्यानें हाड्या-वर्णाला गजकर्ण या न्यायानें परस्पर पेशव्यावर घालायला त्याचा चांगलाच उपयोग होईल, व परस्पर कांट्यानें कांटा निघेल"

"ठीक आहे तर. मुधोजीबाबा वांई प्रांतीं आहेत, त्याच्याशीं संधान सुरू करतों."

"त्याला महाराजांनीं भेटीला बोलावलें आहे असें सांगून इकडेच बोला-वून घ्या ना! मग मी त्याची नीट समजूत काढत्ये. पण त्यापूर्वीं महाराज मात्र राजवाड्यात येऊन माझ्या स्वाधीन झालेच पाहिजेत. गडावर थोरल्या सासूबाईसाहेबांचा बंदोबस्त मी करत्यें."

"त्याची काळजी नको. दोन दिवसात राजवाड्यात महाराज आलेच असें समजा. पायांपाशीं धरणेंच धरून बसल्यावर थोडेच लाथाडतात!"

याप्रमाणें विचारविनिमय ठरून प्रतिनिधि व यमाजी राजवाड्याबाहेर पडले. ते आपल्या गोटात जाऊन पोहोंचतात तों पहाट झाली होती. रात्र भर सृष्टीवर धुडगूस घालणारीं वनचरेंही दिवाभीतप्रमाणें उगवत्या अरुणा-पासून तोंड लपविण्यासाठीं स्वस्थानीं चाललीं होतीं. प्रतिनिधि व यमाजी हे दोघेदेखील तसेच तोंड लपवीत माघारे चालले होते. त्याचें मन त्याना खात होतें, आपणाला कोणी पाहील काय? आपण अपरात्रीं थोरल्या राणीला भेटावयाला गेलों होतों असा सशय कोणाला येईल काय? महाराजाच्या कानीं ही वार्ता जाईल काय? महाराज जाब विचारतील काय? नष्टकर्म्या पातकी माणसाकडून त्याच्या स्वतःसाठीं त्याच्या मनोमय रौरव नर्क परमेश्वर निर्माण करतो, व रौरवात त्याना वास करावयाला लावतो स्वतः माणसानें स्वतःचे अन्याय ओळखून त्याच्या आठवणीनें लाजणे, तोंड लपवणे, हा रौरवच नव्हे तर काय!

उजाडतें न उजाडते एवढ्या बेताला प्रतिनिधि आपल्या गोटात जाऊन पोहोंचले. लगेच त्यानीं प्रातर्विधि आटोपून स्नानसध्या केली, त्या दिवशीं देवपूजाही मुद्दाम स्वतःच केली एखादी महत्त्वाची गोष्ट करावयाची झाली कीं त्या दिवशीं स्वतः शुचिर्भूतपणे व श्रद्धापूर्वक कळकळीनें षोडशो–पचारी देवपूजा करावयाची, हा त्याचा नेहमींचाच परिपाठ होता. त्या-प्रमाणें त्या दिवशीं त्यानीं केलें. अनिष्ट ग्रहनिवारणार्थ ब्राह्मणाला बोलावून दानही केलें. यमाजीचीही स्नानसध्या त्या दिवशीं धन्याकडेच आटोपली. सध्या आटोपल्यावर त्या मालक–नोकराचा देवघरातून रात्रीं राजवाड्यात ठरलेल्या गोष्टींविषयींच काथ्याकूट चालला होता. यमाजी सूचक प्रश्न विचा-रीत होता व प्रतिनिधि त्या प्रश्नाना उत्तरें देत होते. मधून मधून त्यानीं एखादी पृच्छा करावी व यमाजीने तिचें उत्तर द्यावें. इतकी लक्ष्यपूर्वक सकल्पित कृष्णकारस्थानची उभारणी चालली असतानाही मुखाने मात्र सध्या–पूजा-मंत्रादि हरिनामाचा अखड गजर चालला होता! इतकेच काय पण राणी ही बायकोमाणूस असल्यानें ती राजवटीची सर्वाधिकारी झाल्यावरही राज-कारणात फारसें लक्ष घालू शकणार नाही हें गृहित धरून आपण मग राणीच्या नावावर राजकारणात धूडगूस कसा घालावयाचा, याची रूपरेखाही देवघरा तच पूजापचारतीच्या वेळीं आखली जात होती!

# पेशवाईचा मध्यान्ह

पूजाअर्चा वगैरे आटोपल्यावर प्रतिनिधींनीं उपाध्यायाला बोलावून आणून त्या दिवशीं कार्य करण्याला शुभमुहूर्त कोणता तो विचारून घेतला. उपाध्यायानें अपरान्हकाळीं शुभमुहूर्त आहे असे सांगितल्यावरून दुपारचे जेवण आटोपून दोन्ही स्वाऱ्या महाराजावर मोहिनीमंत्र घालण्यासाठीं वनवासवाडीकडे निघाल्या.

प्रकरण १० वे

# दुष्टाव्याची कमाल

धाकट्या राणीच्या निधनाला बरेच दिवस लोटल्यावर एके दिवशीं सायंकाळीं चार घटका दिवसाच्या सुमाराला राणी सकवारबाई एकटीच रंगमहालाच्या मागील गच्चीत सचिंतपणें विचार करीत बसली असताना एका हुजऱ्यानें येऊन वर्दी दिली, "आईसाहेब! महाराजाची स्वारी वनवासवाडीहून वाड्यात यावयाला निघाली आहे."

हुजऱ्याची अपेक्षा होती की इतकी शुभवार्ता आपण आईसाहेबाच्या कानांवर घातली, ती आईसाहेब सोन्याचे कान करून ऐकतील व आपणाला चागलें बक्षीस देतील पण बक्षीस तर बाजूलाच राहिले. राणीनें समाधानाचा फुकाचा शब्ददेखील उच्चारला नाही उलट रागीट मुद्रा करून ती तोंड फिरवून बसली.

हुजऱ्या हिरमुसल्या वृत्तीने निघून गेला, व पुतळा पुढें येऊन म्हणाली, "आईसाहेब! चार भिंतींच्या बगल्यात आपणाला महाराजाची स्वारी पाह्यला जायचे का? तयारी करू का?"

"काय पाह्यला जायचे त्यात? कीं महाराजाची स्वारी आजवर कधीं पाहिली नाहींस, कीं महाराज मारे दिल्लीच्या बादशहाचे तख्त जिंकून त्यावर स्वतःला भारतसम्राट या नावाने राज्याभिषेक करून घेऊन माघारे राजधानींत येत आहेत, कीं काय म्हणून जाऊन पाह्यचें?" राणीनें मागे वळून पुतळेकडे पाहत चिडखोर वृत्तीने विचारले

"तसें नव्हे आईसाहेब! पण महाराज आज फार दिवसांनीं माघारे राजधानींत येत आहेत त्याची प्रकृतीही आताशा चार दिवस अमळ बरी आहे असें ऐकतो आता महाराजाचे पाय रगमहालाला लागतात कीं नाहीं नकळे असें आपणच परवा तीनतीनदा म्हणाला होता. तें आपलें भाग्य

ोर, आपली पूर्वपुण्यायी थोर, म्हणून हा सोन्याचा दिवस आम्हां सर्वांना देसतो आहे. तेव्हां म्हटलें–"

पुतळेचे पुरतेपणीं ऐकून न घेतां मध्येंच राणी पूर्ववत् चिडखोरपणानें हणाली, "हा सोन्याचा दिवस नाहीं, हा लोखडाचा–शेणामेणाचा दिवस भाहे हा! महाराजांच्या राजवटींत पेशव्याचा कोंबडा आरवल्याखेरीज सूर्य उगवत नाहीं, हे हडसून खडसून सागणारा हा दिवस आहे. पेशव्याच्या त्तेचा मराठशाहीच्या गळ्याला लागलेला फास मराठशाहीच्या अतापावेतों ुटणें शक्य नाहीं, असलें अमगळ भविष्य हा दिवस बोलून दाखवीत आहे. शवे आम्हा सर्वांच्या मुळावर जन्मलेले असून ते आमची आमच्या दौलती-ह समूळ वाताहात करणार, याची साक्ष हा दिवस देत आहे. पण पेशव्याना हणावें, काहीं हरकत नाहीं. ही सकवार तुमच्यासह तुमच्या कोंबडयाला मीनदोस्त करून त्या मालमसाल्यातून स्वतःच्या एकतत्री राजवटीची टोले-ंग हवेली हा हा म्हणता उठवील, तरच नावाची सकवार शिर्क्यांची लेंक भाहे ही, भोंसले छत्रपति अगदीं लगतचे सोयरे असतानाही स्वतःच्या पाठच्या हिणीच्या कपाळाचें कुकु पुसूनदेखील स्वतःच्या अपमानाची भरपाई करण्या-ाठीं छत्रपती सभाजीमहाराजासारख्या कर्दनकाळ छत्रपतींशीं जिद्दीने हाडवैर खणाऱ्या पीळदार शिर्क्यांची ही लेंक आहे. शिर्क्यांनीं छत्रपतीना त्राहि-गवान करून सोडले, तिथे त्या शिर्क्यांची लेक मी छत्रपतींच्या मुखडया-भोंवार लाळघोटेपणाने घोगावणाऱ्या पेशव्यासारख्या घुगुरट्याचा थोडाच ेभाव लागू देईन!"

"आईसाहेबाचे मन आज फारच अस्वस्थ झालेलें दिसतें!" पुतळा वेस्मयपूर्वक तोंडात बोटें घालून म्हणाली, "माझ्या हातून तर काहीं कसुर डली नाहीं ना?"

"अग! जीव अस्वस्थ झाला नाहीं, जळतो आहे. आतल्या आत ळतो आहे माझा जीव, माझ्या सर्वांगाची होळी पेटली आहे. आज तीन हिने मीं, प्रतिनिधि, मुतालिक वगैरे मडळीनें महाराजापाशीं त्यानीं रग–हालात राह्यला यावें म्हणून कशा अष्टौप्रहर दाताच्या कण्या केल्या. पण ाना त्यानीं पायातल्या पायपोसाइतकीही किंमत दिली नाहीं. इतराचे राहो रतें, पण मी तर पट्टराणी ना? डोळ्यादेखत एकीमागून एक इतक्या राण्या

उलथल्या आणि देवानें मला एकटीलाच मागे शिल्लक ठेवलें. त्या माझ्या विनवणीची ही किंमत काय ?"

धाकट्या राणीच्या निधनाला उणे पुरे तीन महिने लोटले होते राणी सकवारबाईने त्याच दिवशीं रात्रीच्या वेळी प्रतिनिधि यमाजी याना हाताशीं घेऊन महाराजाना वनवासवाडीहून माघार रंगमहालात आणण्याचें ठरविले होते. त्याप्रमाणें प्रतिनिधींनीं प्रयत्न केला, खुद्द राणीनेही आपल्या प्रयत्नाची शिकस्त केली, पण महाराजानीं कोणालाच जुमानले नाहीं. फार काय, त्यातल्या त्यात पेशव्याच्या खालोखाल चिटणीस महाराजाच्या मर्जीतले, त्याना राणीने मुद्दाम बोलावून घेऊन महाराजाचें मन वळविण्याला सांगितलें. पण त्याचीही तिथे काहीं डाळ शिजली नाहीं. आणि तेच महाराज आज पेशवे सातान्यात येताच त्यांच्या विनतीला मान देऊन राजवाड्यात माघारे यावयाला राजी झाले ! एवढ्यातल्या एवढ्यात राणीचा हा दुसरा डाव हुकला तिचा इरादा पेशवे व महाराज यांची यापुढें यावज्जीव भेटही होऊ नये असा होता. पण पेशवे आले, भेट झाली, व महाराजानी पेशव्याशीं एकान्तात राजकारणा-विषयीं खलबतेंही केली. ह्या भेटीचे वर्तमान त्याच दिवशीं सकाळीं राणीच्या कानीं आले असल्यानें आपल्या दुधाच्या हंड्यात हा मिठाचा खडा पडला असे समजून ती हिंपुटी झाली होती. तेव्हापासून पेशव्याना पायबंद लाव-ण्याचे–आपल्या मार्गांतून पेशव्याचा काटा अजिबात दूर करण्याचे अनेक आसुरी इलाज राणीच्या मस्तकात थैमान घालीत होते. ह्या पेशव्याना खाऊ कीं गिळू असें तिला होऊन गेले होतें तोच पेशव्याच्या सांगण्यावरून महाराज राजवाड्यात येणार, हा पेशव्यानीं महाराजावर–नव्हे, आपणावर अभूतपूर्व विजय मिळविलेला पाहून तिच्यासारख्या मानी स्त्रीच्या सर्वांगाला आग कशी लागणार नाहीं !

परंतु पुतळेचा खरा स्वभाव राणीला काय माहीत ! दंश करण्यासाठीं दबा धरून बसलेली नागीण अवेळीं आपली ओळख थोडीच देईल ! पुतळे-नें मूळपासून–ह्या राणीने धाकट्या राणीच्या पदरून तिला बळजबरीनें आपल्या पायापाशीं ओढून आणलें तेव्हापासून चिडून राणीच्या पूर्णनाशाचा पणच केला होता. पुढेही योगायोगानुसार अशा भयंकर गोष्टी राणीच्या हातून सतत घडत राहिल्या कीं ज्यामुळें अलम् मराठी दुनियेत तिचे बदनाम झालें

व पुतळेलाही बिथरावयाला नवीं नवीं कारणे मिळालीं. त्या प्रत्येक प्रसगीं पुतळेच्या मनाला राणीच्या द्वेषाचा पीळ अधिकाधिक पडत गेला, व आता तर पुतळा केवळ राणीचें वाटोळे करण्यासाठीच जिवत राहिली होती. सर्व स्वाची होळी करून त्याची राख कपाळाला फासून एकट्या राणीचा सर्वनाश करण्यासाठीं टपून बसलेली ज्वलज्जहाल तक्षकीण ती! तिला घेतल्या सोंगाची बतावणी करण्याला मुळीच अवघड गेले नाही तिने राणीच्या नोंडावर स्वर्गवासी धाकट्या राणीची वेळीं अवेळी निंदा करावी, पेशव्याना शिव्या द्याव्या, प्रतिनिधि वगैरे मडळीचीं स्तुतिस्तोत्रे गावी, इतकेच काय पण राणीच्या इच्छेखातर तिनें प्रतापरावाचे वर्षश्राद्ध झाल्यावर तुळाजीशीं पाट लावण्याचें ही कबूल केलें होतें ह्या सर्व कारवाईमुळें पुतळा आता राणीच्या सभोवार अगदीं गुलदस्तातल्या उलाढाली करणाऱ्या चारदोन दासदासीत प्रमुख गणली जाऊ लागली होती

पुतळेच्या स्वभावातील एक विशेष हा की ती एखाद्याचा दावा धरून सूड घेण्यात जरी नागिणीपेक्षा नागीण होती, तरी आपल्या वैऱ्याला अस्वलाप्रमाणे गुदगुल्या कर करून हसवून हसवून ऐनवेळीं चावा घेऊन ठार मारण्याची तिला भारी हौस! तुळाजीवर तिने फेकलेले मोहिनीअस्त्र अशाच मासल्याचे होते तिने त्या पहिल्या दिवशीं बोलता बोलता गगाविषयी—तुळाजीच्या बायकोविषयी तुळाजीच्या मनात भलताच भयकर विकल्प भरवून दिला, यात तिचा हेतु पहिल्या सपाट्याला तुळाजीचे गृहसौख्य नष्ट करून त्याला राखेत बसविण्याचा होता तिला माहीत होते कीं ज्याअर्थी आपला पति मृत्युमुखी पडला आहे, त्याअर्थी गगाच्या बाबतींत स्वतःवरील आरोपाची नाशाबिती करण्याला तो काहीं पुढे येत नाहीं आणि जोंवर तो सशय दूर झाला नाहीं, तोंवर गगाने आपण निर्दोषी असल्याचे कितीही घसा फोडून सागितले तरी ते तुळाजीला खरं कसे वाटणार? तरी बरं कीं गंगा तेव्हां नुक्तीच माहेरी गेली होती ती जर का साताऱ्यात असती, तर तिची तेव्हाच शभर वर्षे भरलीं असती. त्यानतर तुळाजीने तिला माहेरीं आणावयाची, पण बोलून चालून त्याच्या दृष्टीने ती बाटलेली स्त्री! तशात स्वरूपसुदर पुतळा वर्षाच्या आत त्याला लाभणारच होती त्याच्या मते ती त्याला लाभलेलीच होती, व तिने जरी लौकिकासाठीं मयत पतीच्या वर्षश्राद्धाची अट घातली

होती, तरी त्यापूर्वींच आपण तिला आपल्या प्रेमपाशात जखडून टाकून ससार थाटून सुखी होऊ अशी उमेद त्याला वाटत होती.

दरम्यान् प्रतापरावाच्या भुताने मात्र बराच धुमाकूळ माजविला होता. त्यानें पहिल्या प्रथम चिटणिसाना पेशव्याकडे पाठविण्यात आलेल्या खलित्याच्या बाबतींत सावध केले, दोनतीन वेळा तुळाजीला एकट्याला एकातात गाठून त्याचाही जीव घेण्याची धमकी दिली, असे त्याचे खेळ मधून मधून एकसारखे चाललेच होते पण त्याचा तपास मात्र कोणालाच लागेना. तुळाजीनें पुतळेला तो प्रकार वेळोवेळीं कळविलाही होता. त्या प्रत्येक वेळीं आपणाला यातली काहींच खबर नसल्याबद्दल पुतळेने सागावें. नाहीं म्हणायला एकदा तुळाजीनें जेव्हा दीड महिन्यापूर्वी पुतळेला आपणाशीं लौकर पाट लावण्याविषयीं आग्रह चालविला, तेव्हा एके रात्रीं त्या पिशाच्चाने पुतळेला एकटीला गाठून 'माझे वर्षश्राद्ध होईतो जर पाट लावशील तर तुला आणि तुझ्या दादल्यालाही खाऊन टाकीन' असे भय घातलें होतें. ते पुतळेच्या तोंडून ऐकल्यापासूनच तुळाजीने एक वर्षपावेतो पाटाचा बेत लाबणीवर टाकला होता.

ह्या साऱ्या सावळ्यागोंधळात तोंडपुजेपणात निष्णात व प्रसगीं कोणतेंही कृष्णकृत्य करण्याला उरफाट्या काळजाने सिद्ध अशा लोकाची मारे चगळ चालली होती. सातारची गादी बुडाली किंवा तरली, राज्याचा वारस मुधोजी भोसला झाला कीं राजाराम गुराखी झाला, कीं महाराजाच्या येसाजी—कुसाजी या लेकावळ्यापैकीं कोणी झाला, तरी त्याची त्या स्वार्थसाधु व कोत्या बुद्धीच्या लोकाना कसली पर्वा !

पुतळा राणीची ही त्रेधा पाहून मनातून फार हर्षभरित झाली होती. कारण, महाराज इतके दिवस राजवाड्यात येऊन राणीच्या बदिवासात पडले नाहींत, पेशव्याना चिटणिसाचा सर्व वृत्तान्ताचा दुसरा खलिता रवाना होऊन ते आले, वगैरे घटनाना पुतळा—नाहींतरी तिच्या नवऱ्याचें पिशाच्च कारण होतें, व त्या पिशाच्चाला पुतळा पूर्णपणें ओळखीत होती. चिटणिसानीं तरी प्रथम त्या पिशाच्यावर अश्रद्धा दाखविली, पण त्याने सागितलेले सारे ठोकताळे त्याना पटताच त्याचा त्याच्यावर विश्वास बसला, व तें पिशाच्च वारवार भेटून हितोपदेश देऊ लागलेलें पाहून चिटणिसांना त्या

अनाहूत पिशाच्चसिद्धीविषयीं मोठा धीर व अभिमानही वाटू लागला होता. त्या पिशाच्चाविषयीं थोडक्यात सागावयाचें म्हणजे ती एक जबरदस्त दुर्दमनीय गुप्त दिव्यशक्तीच सातान्यात निर्माण झाली होती. तुळाजीनें त्या पिशाच्चाला गाडण्यासाठीं कैक कोयाडी केलीं, कैक मांत्रिकाचे पाय धरून त्यांनीं सागितले ते उपाय करून पाहिले, पण व्यर्थ! मांत्रिकानीं त्या पिशाच्चाला कैकदा गाडून बाटलीत कोंडले, लिंबात कोंडून नदींत सोडले, नारळात त्याला पकडून तो नारळ नरसोबाच्या वाडीला कृष्णेंत नेऊन सोडविला, तरी त्याच्या लीला काही केल्या थांबेनात. आपल्या पतीचा जिवतपणीं फारसा प्रभाव पडला नाहीं तरी मरणोत्तर तरी त्याचे सर्वत्र एवढें प्रस्थ माजलेले पाहून कोणत्या स्त्रीला धन्यता वाटणार नाहीं?

पण ती सारी धन्यता मनातली मनात गुडाळून ठेवून पुतळा राणीच्या दुःखात भागीदारीण होऊन म्हणाली, "इतके मनाला लावून कशाला घ्यावें आईसाहेब? देवाच्या दयेने सर्व काही आपल्या मनाजोगें होईल."

"पुढें माझ्या मनाजोगे होईल तेव्हा होईल. पण आज तर प्रत्येक गोष्ट माझ्या मनाविरुद्ध होते आहे ना?" राणी उदासवाण्या नजरेनें पुतळेकडे पाहत उद्गारली.

"म्हणून काय झाले? सदासर्वकाळ वारा एकाच दिशेनें वाहतो असें थोडेंच आहे?" पुतळा उद्गारली

राणी पुतळेच्या त्या उद्गाराकडे दुर्लक्ष करून म्हणाली, "तुला एक कामगिरी मीं सांगितली तर तू ती पार पाडशील का?"

"माझ्यावस्तु झाली तर मी पार पाडीन आईसाहब!"

"तू जर ती कामगिरी फत्ते केलीस, तर मी तुला माझ्या राजवटींत एका महालाची मामलेदारीण बनवून सोडीन. माझे राज्य झाल्यावर मी सर्व पुरुषाचीं नाकें कापण्यासाठीं मुद्दाम तुला एवढ्या मोठ्या अधिकाराच्या जागीं नेमणार आहे."

"पण कोणती कामगिरी ती मला कळूदे तर खरी!"

"तू सुदर आहेस, तरुण आहेस, चतुरही आहेस. तू पेशव्याना आपल्या प्रेमपाशांत गुरफटून घ्यावेस, आणि त्याना दग्यानें ठार मारावेंस. एवढे काम तूं केलें पाहिजेस."

पुतळेला नाहींही म्हणवेना व होयही म्हणवेना. होय म्हणणे तर तिला शक्यच नव्हतें. परपुरुषाने पापी दृष्टीने आपणाकडे नुसतें पाहिले तर त्याचे डोळे फोडणारी कैदाशीण ती! ती असल्या पापाचरणाला कशी राजी होणार? खुद्द राणीने तिची थोडया दिवसापूर्वी अवहेलना व अमर्यादा केल्यामुळें तिनें आपल्या अधिकारात तिला देहान्त प्रायश्चित्त अगोदरच फर्माविले होते. त्यापेक्षा कठोर प्रायश्चित्तच राणीच्या आताच्या वाचाळतेबद्दल देण्याला तिच्यापाशीं शिल्लक नव्हते. अर्थात् ह्या पेचातून स्वसंरक्षण कसें करावें एवढा एकच विचार तूर्तच्या क्षणी तिच्यासमोर होता. तिच्या मनात तेव्हा पुष्कळ आले कीं शीलाची विटंबना करण्याला सुचविणाऱ्या राणीची कठोर शद्बानीं खाशी कानउघाडणी करावी. पण स्वतःच्या संकल्पित कार्याचा घात मात्र त्यामुळें होईल हें तिला वेळींच सुचले व तो विचार तिने आवरता घेतला

सुदैवानें तिला तेव्हा प्रसंगोचित युक्तिवाद आठवला. तुळाजीशीं पाट लावण्याबद्दल राणीनेच तिला यापूर्वी दोन वेळा सुचविलें होते, व तिने त्याला मोघम मान्यताही दिली होती त्याला अनुलक्षून ती म्हणाली, "आईसाहेब! आपणाला सुखी करण्यासाठा मीं हेंच काय, आणखीही आपण सांगाल तें केलें असतें. पण आपण जाणताच कीं मी आता तुळाजीची अंकित आहे. त्याला जर हा प्रकार कळला, तर तो मला बाधक होऊन आपणालाही बाधक होईल म्हणून म्हटलें,--"

मात्रा बरोबर लागू पडली. तुळाजीही हे साहस करू शकेल अशी राणीची खात्री होतीच. ती म्हणाली, "बरें-बरें. मी तुझ्या संसारसुखात विष कालवूं इच्छित नाहीं तू असे कर, अशीच्या अशी जाऊन तुळाजीला मी रातोरात भेटायला सांगितलें आहे असे सांग. आणि हे पाहा, त्याला कुठें भेटायला सांगशील?"

"कुठें भेटायला सांगू?"

पुन्हा राणीला वाटले, असल्या गोष्टी षट्कर्णी होणे इष्ट नाहीं. न जाणो, डाव सिद्धीला जाण्यापूर्वीच पुतळा कुठें बोलली तर! तिच्या तोंडाला पानें पुसण्यासाठीं ती म्हणाली, "नकोच पण तो विचार बरा नव्हे. तुळाजीला भेटायला सांग. पण चार दिवसानीं केव्हातरी भेट म्हणावें. त्याला मी दुसरें काम सांगणार आहें."

" जशी आज्ञा आईसाहेब ! "

" आणि अग ए, इकडे पाहा, आतां मी तुझ्यापाशीं बोलल्यें तें कुणापाशींदेखील बोलायचें नाहीं बरें का ? तुळाजीपाशीं देखील बोलायचें नाहीं. "

" नाहीं आईसाहेब ! मी कशी बोलेन ? " असें म्हणून पुतळा बाहेर निघून गेली.

इकडे राणीच्या अंतरंगांत कसल्या विचारांचा कोलाहल माजला आहे हें राजवाड्यांतील इतर दासदासींना काय माहीत ! महाराज अशा एखाद्या महत्त्वाच्या प्रसगीं राजवाड्यांत प्रवेश करू लागले कीं राजस्त्रियांनीं त्याना पंचारत्या घेऊन सामोरें जावयाचें, या नेहमींच्या परिपाठाप्रमाणें पंचारतीची सारी तयारी दासींनीं केली. हें सर्व होईतों सूर्य अस्ताला गेला. राणीनें सहज गच्चीच्या टोकाला जाऊन तेथून खालीं पसरलेल्या नगराकडे पाहिलें तों साऱ्या नगरभर उत्साहाचा महासागर दुथडी भरून उचंबळतांना तिला दिसला. सकाळपावेतों स्मशानवत् उदास दिसणारी राजधानी इतक्यांत एकाएकीं नंदनवनसारखी कशी बहरली ? धाकट्या राणीचें सुतक वास्तविक तेराव्या दिवशीं सर्व सपलें. पण महाराज राजधानींत नसल्यानें राजधानी आज उणेपुरे तीन महिने सुतकी दिसत होती. कोठें आनंद नाहीं कीं उत्साह नाहीं. त्याच राजधानीचें स्वरूप निमिषार्धात इतकें पालटून कोणीं टाकलें ? राणी आपल्या मनाशीं तोच तोच प्रश्न पुन्हा पुन्हा विचारी.

महाराजांनीं ? छे ! शरिरानें, मनानें व परिस्थितीनेंही दुबळे बनलेल्या महाराजाना हें कसें साधणार ?

राणी सकवारबाईनें ?—त्याचें नकारार्थी उत्तर राणी केव्हांच आपल्या मनाशीं देऊन चुकली होती.

ही राजवटीच्या कारभाऱ्यांची पुण्यायी फळाला आली काय ? मग ती इतके दिवस आळींतल्या आंब्यांसारखी कां कुजत पडली होती ?

मग कोणाची ही करामत ? कोणाची ही कारवाई ? कोणाची ही बहादुरी ? कोणाची ही पुण्यायी ? पेशव्यांची काय ?

" थूः ! आग लागो त्या राजधानीला, राजवटीला आणि पेशव्यांच्या थोरवीला ! " सभींवारच्या उत्साहाला पेशवे कारण होत हें ओळखून राणीनें

तिरस्कारानें थुकून पाय आपटून तिकडे पाठ फिरविली, व तशीच ती पाय आपटीत आपल्या महालात आली.

तोंच जिजा सौभाग्यालकारांनीं भरलेलें तबक हातीं घेऊन राणीपाशीं आली व नम्र पण आनदी वृत्तीनें म्हणाली, " आईसाहेब ! महाराजांची स्वारी अगदीं जवळ आली. आपण त्याना सामोरे जाण्याची लौकर तयारी करायला हवी.

आधींच राणीच्या क्रोधाची आग भडकली होती, तिच्यांत हा तेलाचा शिडकाव झाला. तिनें त्या सौभाग्यालकारावर लाथ मारून जिजाची निर्भर्त्सना केली, " चल इथून काळें करून चालती हो."

आपला अपमान झाला म्हणून नव्हे, तर राणीने सौभाग्यशृगार लाथाडून राजलक्ष्मीची अवहेलना केली, हा अपशकून जिजाचे काळीज कापीत गेला.

## प्रकरण ११ वें

# पुनरागमन

महाराजांची स्वारी रंगमहालांत येऊन पोहोचली, तेव्हां दिवे लागले होते. राणीसाहेबांचें मन अप्रसन्न असताही दासदासी–जनानीं महाराजाच्या शुभागमनाप्रीत्यर्थ राजवाडा चागलाच शृंगारला होता, व राजस्त्रिया आणि दासी यानीं सामोरें जाऊन महाराजाना ओंवाळणीही केली. ताराबाई आईसाहेब सहसा कधीं गडावरील आपल्या राजवाड्यातून बाहेर पडावयाच्या नाहींत. कारण एक तर त्या नजरकैदी, व दुसरें, केव्हा कोण कसा अपमान करील याचा काय भरवसा? पण आज महाराज आपला वैताग सोडून पुन्हा राजवाड्यात आलेले ऐकून त्यादेखील मुद्दाम भुयाराच्या मार्गानें महाराजाचा समाचार घेण्यासाठीं राजवाड्यात आल्या.

ताराबाई आईसाहेब भेटीला आल्या तेव्हां महाराज देवघरात जाऊन देवाचें दर्शन घेत होते. राण्यांची व इतर खाशा स्त्रियांची राजवाड्यात बसण्याची जी जागा, त्या दालनात ताराबाई थाबली होती, व तीही दासींनीं सन्मानपूर्वक तेथें नेऊन बसविलें म्हणून. नाहींपेक्षा राजवाड्यांतील देवघर कुठें, महाराजाचा रंगमहाल कुठें व राण्यांचे महाल कुठें, हें तिला मुळींच माहीत नव्हतें. माहीत कसें असणार? शाहूमहाराज दिल्लीच्या बादशहाच्या कैदेंतून मुक्त झाल्या दिवसापासून तिनें त्याच्याशीं भाऊबदकी माजविली होती. नंतर महाराजानीं तिचा पाडाव केला, तिला साताऱ्यांत गडावर कैदेंत ठेवलें, आणि मग स्वतःला ऐषआरामात राहण्यासाठीं हा प्रशस्त रंगमहाल राजवाडा बांधला. ज्या राजधानींत ताराबाईनें राजाराममहाराजांच्या पश्चात् आपल्या वेडया पुत्राला नामधारी छत्रपति बनवून कैक वर्षें राज्य केलें, जिच्या हुकमतीचा तेव्हा मराठशाहींतील सर्व सरदार दरकदारांना विलक्षण दरारा वाटत होता, जिनें शाहूमहाराजांशींही निधड्या छातीनें टक्कर देण्याला कमी

केले नाहीं, इतकेंच काय पण महाराज छत्रपति झाले व आपल्या हातांतील अमोघ राजसत्ता गेली म्हणून तिनें मुळुमुळु रडत अथवा बोटे मोडीत न बसता स्वतःच्या हिमतीवर कोल्हापूरला नवे राज्य स्थापन करून त्या राजकारणरूपी शस्त्राच्या एका घावासरशीं मराठशाहीचीं दोन शकले केलीं, त्या मानी स्त्रीला अखेर साताऱ्याप्रमाणेच कोल्हापूरच्याही राज्याला मुकून आता आपलें राहिलेलें आयुष्य महाराजाच्या–पुतण्याच्या नजरकैदेंत कठावे लागत होतें! तिच्या साऱ्या आशा व महत्त्वाकाक्षा सभोवार मरून पडून सारा देश हें त्याचें स्मशान बनले होतें, व महाराजानीं रगमहाल बाधला हें तिच्या मतें तिच्या त्या मृत आशा–आकाक्षाचे थडगे होतें. त्या थडग्यात तिने आजवर कधींच पाऊल ठेवलें नव्हते. इतकी तिला शाहूमहाराजाची सख्त नजरकैद होती असें नव्हे. उलट महाराजानीं अनेक महत्त्वाच्या प्रसगीं तिला गौरवपूर्वक रंगमहालात बोलावलें होतें. परतु तिनें त्या प्रत्येक वेळीं आपण होऊन नकार दिला होता तरीही महाराज तें काहींही मनावर न घेता वारवार तिच्या भेटीला गडावर जात, व त्यानीं गडावर तिची व्यवस्थाही राणीपदाला शोभेशी करून दिली होती. त्यानीं पहिले काहीं दिवस, ती आपल्या स्वभावानुरूप राजकारणात भलतीच ढवळाढवळ करील या भयाने तिच्यावर अमळ कडीं नजर ठेवली होती हें खरें, पण पुढे पुढें तो कडेपणाही कमी कमी होऊन अलीकडे तर महाराज राजकारणाच्या हरएक महत्त्वाच्या बाबतींत तिची सल्ला घ्यावयाला चुकत नसत. इतका महाराजानीं आपला पीळ सोडला, पण ताराबाईनें सोडला नव्हता. इतका पीळदार ताराबाईचा स्वभाव. पण तीही तो पीळ आपण होऊन सोडून आज महाराजाच्या समाचारासाठीं रगमहालांत आली होती.

ताराबाई आल्याची वर्दी महाराजाबरोबरच्या कारभारी मडळीपैकीं पेशव्यांना प्रथम मिळाली, व लगेच त्यानीं महाराजाच्या कानात सागितलें, "ताराबाई आईसाहेब आल्या आहेत."

महाराज देवघरातून हातात नारळ घेऊन तसेच उठले, व ताराबाई बसली होती त्या महालात गेले. तेथे जातांच त्यानीं नारळ ताराबाईच्या हातीं देऊन तिच्या पायावर मस्तक ठेवलें. तेव्हां तपानुतपें ताटातूट झालेल्या मायलेकराची भेट झाल्यावर त्यांना जसें आनदाचें भरतें येतें, तसें त्या दोघानाही आनदाचें भरतें आलें. महाराजाच्या नेत्रांतून घळघळ वाहणाऱ्या

आनंदाश्रूंनीं ताराबाईचीं म्हातारीं पावलें भिजून निघालीं, व त्याच्या मस्तकावर ताराबाईच्या नेत्रातून वाहणाऱ्या आनदाश्रूच्या गगायमुनाचा अभिषेक झाला.

महाराजही म्हातारे, व ताराबाई तर सत्तरी उलटून जराजर्जर झालेली. पण तिनें महाराजाना लेंकरू समजून आपल्या हृदयाशीं घट्ट धरिले व महाराजानींही लेंकराप्रमाणें तिच्या वक्षस्थलावर मस्तक टेंकून विश्राति घेण्यात धन्यता मानली.

तो अभूतपूर्व देखावा पाहून पेशवे, सुमत, चिटणीस वगैरे सर्वांनाच पराकाष्टेचा सतोष वाटला. कोल्हापूर दरबारचा वकील खासेराव महाराजाच्या उदासीन वृत्तीचा फायदा घेऊन साताऱ्याची गादी कोल्हापूरच्या गादींत सामील करून घेण्यासाठीं म्हणून अलीकडे कैक दिवस साताऱ्यात येऊन तळ देऊन बसला होता. तो तो देखावा पाहून आपल्या कारभाऱ्याच्या कानात हळूच म्हणाला, "गगामाताजी जरी कैलासात उगम पावली, तरी तिनें समृद्ध केलें मात्र हिमालयाच्या पायथ्याखालच्या भूप्रदेशाला."

पेशव्याचे कान सर्पासारखे तिखट व लक्ष चौरस. त्यानीं ते खासेरावाचे उद्गार ओझरते ऐकले मात्र, व लगेच त्याच्या कानाशीं लागून हळूच म्हटलें, "कारण भोळ्या शकराने तिच्या प्रचड वेगवान् प्रवाहाचा आघात आपल्या मस्तकावर सहन केला, म्हणून गगामाताजी इथें स्थिरावली."

पेशव्याच्या ह्या वक्रोक्तीनें खासेरावाचें तोंड बद केलें. ते पुढे कांहीं बोलले नाहींत, व म्हणून पेशवेही गप्प राहिले. 'चोराचीं पावलें चोरानें ओळखलीं' असे खासेराव आपल्या मनात मात्र म्हणाला असेल. त्याच्या म्हणण्याचा आशय असा कीं ताराबाईनें महाराजाशीं स्पर्धा करता करता त्याचीं बोटे त्याच्या डोळ्यात घालण्यासाठीं कोल्हापूरचा सवता सुभा स्थापन केला, आणि आता पाहावे तों ती पुन्हा प्रसन्न सातारकर महाराजानाच! त्याला वरवरच्या देखाव्यावरून जें अनुमान करता आलें तें त्यानें केले. त्याला शाहूमहाराजाच्या अतःकरणाची काय ओळख! आणि ताराबाईच्या अतःकरणाची तरी काय ओळख! त्याला शरदृतूत कोकिळेचें गायन ऐकावयाला हवें होतें, जास्वदीच्या झाडाला गुलाबाचीं फुलें फुलविण्याची अपेक्षा तो करीत होता! साताऱ्यात आल्यापासून त्याने ताराबाईशीं अनुसधान बाधण्याचे कांहीं

थोडे थोडके प्रयत्न केले नव्हते. पण त्या प्रयत्नाना पाठबळ तर ताराबाईनें दिलें नाहींच; परतु नुसती खासेरावाची भेट घेण्याचेंही कोणत्या ना कोणत्या सबबीवर आजवर ती एकसारखे टाळीत आली होती.

काहीं वेळ ती मायेचीं मायलेकरें तशींच एकमेकाच्या हृदयाशीं हृदय भिडवून आईनें लेकराला घट्ट पोटाशीं धरले होते, व महाराज त्या मानलेल्या आईच्या वक्षस्थलावर मस्तक टेकून घळघळा आसवें ढाळीत होते. ताराबाईलाही मनातून वाटत होते कीं आपण ह्या उदारात्म्याशीं इतके दिवस वृथा दावेदारी केली, व भलत्या अहमहमिकेला बळी पडून राजवटीचे ओरबाडे काढले, ते सारे अन्याय आज ह्या महात्म्याच्या भेटींत परिमार्जित होत आहेत, तें सारें पाप आज धुवून निघत आहे.

तो गंभीर देखावा पाहून तेथल्या सर्व मडळींत सर्वांत जास्त जर कोणाला आनद झाला असेल तर तो नानासाहिब पेशव्याना. त्यानीं त्या आनदाच्या भरात ताराबाई व महाराज ह्या दोघानाही सर्वांसमक्ष साष्टाग नमस्कार घालून उद्गार काढले, " मासाहेब ! महाराज ! पुडलिकाच्या भेटीला परब्रह्म आल्याचे दाखले आजवर साधुसताच्या रसाळ चरित्रात मी ऐकत आलों. पण त्या परब्रह्माचा खरा दर्शनलाभ असा मला आज झाला. पुडलिकासारखा पुण्यात्मा मी नसताना—मी एक सामान्य व्यवहारी पुरुष असून स्वतः पत्करलेल्या राजससाराची यथाशक्ति सागता करण्यासाठीं ह्या परब्रह्माशीं अनेक वेळां लौकिक दृष्ट्या माझी विपरीत वागणूक घडलेली असतानाही मला आज ह्या परब्रह्माचें दर्शन होत आहे. माझ्या थोर पूर्वजाची पुण्याई त्याच्या हयातींत जी फळाला आली नाहीं, ती आज माझ्या फळाला आली ! मी आज धन्य झालों."

ताराबाईनें स्मितवदनर्वक पेशव्याच्या मस्तकावर आपला वरदहस्त ठेवून त्याना आशिर्वाद दिला, "नाना ! त्या झाल्या गेल्या सर्व गोष्टी तू विसरून जा आणि मीही विसरून जात्यें. इतके दिवस तुझ्या अतःकरणाची ओळख मला पटली नव्हती; तुझ्या पूर्वजाविषयींही माझ्या मनात असाच जबरदस्त विकल्प होता. पण इतक्या वर्षांच्या अनुभवानें तो दूर झाला आहे. माझ्या म्हातारपणातील ह्या पाढऱ्या केसानीं मला आजवरच्या सर्व राजकीय घडामोडींचें खरें अतरग नीट पटवून दिले आहे. तूं जी हिंदुपदपादशाहीच्या

मजबूत उभारणीची परमश्रेष्ठ महत्त्वाकांक्षा आपल्या अंतःकरणांत धरली आहेस, ती माझ्या म्हातारीच्या आशीर्वादानें यथास्थित पूर्ण होईल; व बाळ! तूं त्रिभुवनविजयी जगज्जेता होशील."

ताराबाईच्या मुखावाटे ती शुभवाणि निघालेली ऐकून तेथील अनेकांच्या मनावर अनेक परींचा परिणाम झाला. पेशवे, महाराज, चिटणीस, अमात्य वगैरेंना ती शुभवाणीशी वाटली, तर प्रतिनिधि, यमाजी, खासेराव याना शापवाणीशी भासली. सूर्योदय झाला तरी पृथ्वीच्या एका गोलार्धावर प्रकाश व दुसऱ्या गोलार्धावर काळोख असतोच. तशी काळोखी प्रतिनिधि वगैरे मंडळीच्या तोंडाला फासली गेलेली पेशव्याना तेव्हा स्पष्टपणें दिसून आली. रुक्मिणीस्वयंवरात श्रीकृष्णाला रुक्मिणीनें माळ घालताच इतर राजामहाराजात ज्याप्रमाणे 'हा कृष्ण—हा गवळ्याचा पोर भीमकाच्या राजकन्येचें पाणिग्रहण करणारा कोण?' असा कोलाहल माजला होता, तसा कोलाहल त्या प्रसंगीं पेशव्याच्या प्रतिस्पर्ध्यांच्या मनात त्या क्षणीं माजून राहिला. ताराबाई बोलली, ती सभोंवारच्या मंडळीचें अंतरंग न ओळखता बोलली, हें ध्यानीं आणून—विशेषतः ती खासेरावाला ओळखीत नसावी हें ओळखून त्यानीं त्या अप्रिय विषयाला तेथेंच खंड पाडण्याच्या हेतूनें कलाटणी दिली. ते सहज पण एकाएकीं ताराबाईला म्हणाले, "कोल्हापूरकराचे वकील खासेराव इथें हजर आहेत, त्याच्याकडे मासाहेबानीं भुलीमुळें कृपादृष्टि वळविली नसावी."

ताराबाईच्या एथवरच्या उद्गारामुळें खासेरावाच्या चर्येवर नानापरींच्या शंकाकुशंकाचीं जळमटें दाटलीं होतीं, तीं एका मुद्राभिनयासरशीं दूर करून व चर्येवर लटक्या आनंदाची रंगसफेती चढवून तो पुढें झाला, व त्यानें ताराबाईला अभिवादन केलें.

खासेराव हा अगदीं तरुण नाहीं तरी प्रौढ वयाचा, ताराबाईच्या पुढच्या पिढींतील मराठा शिपायी गडी होता. त्यानें ताराबाईची राजवट पाहिली नसल्यानें त्याची ताराबाईला ओळख असणें शक्यच नव्हतें. बरें, तो कोल्हापूरकराचा वकील म्हणून साताऱ्यात आल्यावर त्यानें ताराबाईची भेट घेण्याची शिकस्त केली, तरीही ताराबाईनें त्याची भेट घेतली नव्हती. त्यामुळेंच ती त्याला ओळखू शकली नाहीं. मात्र ती त्याला प्रत्यक्ष ओळखीत नसली तरी फार वर्षांपूर्वी, खासेराव बिनमिशीचा तरणा बांड असताना त्याला कोल्हापूर-

ऱ्या संभाजीराजांची राणी जिजाबाई हिनें राजपुत्र राजाराम याचा वध करण्याऱ्या कामगिरीवर दुसऱ्या अनेक मारेकऱ्याबरोबर त्याचीही योजना केली असल्याचें ताराबाईनें ऐकलें होतें. तेव्हापासून आजवरच्या सत्तावीस वर्षांत राजपुत्राला ठार मारण्यासाठीं झालेल्या सर्व घडामोडी ताराबाईला एकदम आठवल्या, व तिनें कांहींशा चमत्कारिक तीक्ष्ण दृष्टीनें एकच नेत्रकटाक्ष खासेरावाकडे फेंकला. परतु बाण कोठून सुटला हें त्या बाणाला बळी पडणाऱ्या जीवाला तो बाण मर्मस्थानीं घुसेपावेतों व कधीं कधीं घुसल्यानतरही कळत नाहीं, त्याप्रमाणें खासेरावाला त्या नेत्रकटाक्षाचा अर्थ कळला नाहीं.

"तुम्हीच खासेराव काय?" ताराबाईनें प्रश्न केला.

"होय मासाहेब!" खासेराव दोन्ही हात जोडून नम्रपणें उत्तरला, "मासाहेबांची एकदां भेट व्हावी अशी फार इच्छा होती पण ती आजवर सफल झाली नाहीं. ती भेट आज झाली, मी धन्य झालों. मासाहेबांची आमच्या सरकारावरही कृपादृष्टि असावी."

पण ताराबाईनें खासेरावाच्या डावपेंची भाषेचा मारा हंसत हंसत परतविला! ती म्हणाली, "संभाजी काय आणि शाहू काय, दोघेंही माझींच लेंकरें. डोळे दोन असले तरी ते एकाच माणसाचे. मी कोल्हापूर आणि सातारा ह्या दोन डोळ्यानीं आजच्या मराठी अंमलाकडे पाहत असत्यें, आणि तिचें अभिष्ट चिंतीत असत्यें. साताऱ्याची गादी मूळची माझ्या सासरच्या पूर्वजांची म्हणून मला जितकी वंदनीय आहे, तितकीच कोल्हापूरची नवी राजवट मीं जन्माला घातलेली म्हणून मला आवडती आहे. ह्या दोन डोळ्यां-पैकीं कोणत्याही डोळ्यानें मीं समाधानाची गोष्ट पाहिली तरी मला समाधान होतें, व कोणत्याही डोळ्यात कुसळ गेलें कीं मला वेदना होतात. माणसाला देवानें दोन हात दिले आहेत ते पराक्रम करण्यासाठीं. ते दिसायला अलग अलगसे दिसले तरी त्यांची हालचाल करणारें शरीर–मन–आत्मा एकच होय. सभाजीला तुम्ही माझा आशीर्वाद सांगा."

एवढें ताराबाई बोलली; पण ती न बोलण्यापूर्वी सारे लोक जितके बुच-कळ्यात पडले नव्हते, तितके तें बोलणें ऐकून पडले. मासाहेबाचा ओढा सातारकराकडे आहे कीं कोल्हापूरकराकडे आहे, याचा त्या बोलण्यावरून कोणाला अंदाज तर कांहीं करता आला नाहींच; पण ह्या भाकरीला तोंड

कुठें आहे हें मात्र कोणालाच कळेना. जो तो आपापल्या जागीं गोंधळून स्तब्ध उभा राहिला.

" मी इथें असल्या मुदतींत मासाहेबाचें पुण्यदर्शन मला वारवार घडावें अशी मासाहेबाच्या चरणीं ह्या दासाची प्रार्थना आहे. " खासेरावानें जोड-ल्या हातानीं प्रार्थना केली.

" अवश्य. मला कधीं कधीं भेटत जा. म्हणजे तिकडच्या सर्वांचा कुशल समाचार मला कळेल तरी. " ताराबाई म्हणाली.

महाराज वृत्तीचे जितके उदार तितकेच भोळे. त्यानीं पाहिलें, आपला अंतकाल समीप आला. मरताना भाऊबदकीचें जोखड मानेवर घेऊन पर-लोकीं कशाला जावें? त्यापेक्षा कोल्हापूरकराचे वकील इथे आहेत, मासाहेबही तीन तपानंतर सर्वांशीं वडीलपणाच्या प्रेमळ नात्यानें वागू लागल्या आहेत. त्यांच्या साक्षीनें आपली आणि कोल्हापूरकराची दिलजमाई करून टाकावी. ते म्हणाले, " मासाहेब ! तुम्हीच सातारा आणि कोल्हापूर यामधील आज-वरची तेढ आपल्या उपदेशाच्या शद्वानीं मिटवून टाका, म्हणजे माझ्या हयातींत आमच्यात उत्पन्न झालेल्या भाऊबदकीचा गोड शेवट माझ्या हयातींतच झालेला पाहून मला सुखानें डोळे मिटता येतील. "

"याचा अर्थ काय?" ताराबाई किंचित् खिन्न होऊन म्हणाली, "मुलाचें मरण पाहूला मी चाडाळीण जिवंत राहू काय? ईश्वरानें तुला उदड आयुष्य द्यावें, आणि तुझ्या हातानें मला मूठमाती मिळावी." असें म्हणून तारा-बाईनें महाराजाच्या मस्तकावर पुन्हा वरदहस्त ठेवला व आशीर्वाद दिला.

पेशव्यानीं ताराबाईच्या उद्गारातील आशय आणखी विशद केला, "महा-राजाना आधींच आराम वाटत नाहीं, त्यात आणखी प्रवासाची दगदग झालेली. राजकारणाच्या वाटाघाटी याच वेळीं केल्यानें शिणवटा जास्त वाढावयाचा. त्यासाठीं महाराजानीं रात्रभर शातपणें विश्राति घ्यावी हें चागलें. "

प्रतिनिधि व यमाजी यानी पेशव्याकडे रोंखून पाहिले. त्याना वाटलें, आपणापासून राजकारणाच्या वाटाघाटी गुप्त राखण्यासाठीं पेशव्यानीं मुद्दाम ही शक्कल लढविली असावी. खासेरावानेंही पेशव्याकडे रोंखून पाहिलें. त्याला वाटलें, पेशव्यानीं पेशवाईचीं वस्त्रें शाहूमहाराजाकडून मिळण्याच्या सुमाराला

छत्रपति संभाजी महाराजांशीं मित्रत्वाचा गुप्त तह केला आहे, व शाहू-महाराजाच्या जीविताचा आता फारसा भरवसा नसल्यानें त्या गुप्त तहाला मूर्त स्वरूप येण्याची वेळ हीच आहे. त्या बाबतींत पेशव्याना आपल्या मार्फत संभाजीमहाराजांशीं कांहीं महत्त्वाच्या गुप्त वाटाघाटी करावयाच्या असाव्या.

राजवाड्याबाहेर व राजवाड्याच्या आवारात महाराजाच्या दर्शनासाठीं सामान्य नागरिकाची व शेटसावकार वगैरे बुद्रुक लोकाची मारे गर्दी उसळली होती. त्या सर्वांना एकवार महालाच्या गच्चींतून दर्शन देण्यासाठीं महाराज गच्चीकडे गेले. पेशवे वगैरे सर्व कारभारी मडळी महाराजाचा निरोप घेऊन स्वस्थानीं गमन करती झाली. इतक्या वेळात राणीसाठीं कोणालाही फारसें चुकल्यासारखे वाटले नाहीं, तिची आठवणही कोणीं केली नाहीं.

पण ताराबाईने गडावर जाते वेळीं राणीची आठवण केली. ती जवळच्या दासीला म्हणाली, "काय ग! थोरली सूनबाई आली नाहीं ती? ती इथेंच आहे ना? कीं माहेरीं बिहेरीं गेली आहे?"

दासी जवळच जिजा उभी होती तिच्या तोंडाकडे पाहूं लागली. जिजानें खालीं मान घातली.

"का? काय झालें?" ताराबाईनें पुन्हा प्रश्न केला.

"थोरल्या आईसाहेब आज थोड्या आजारी आहेत." जिजा उत्तरली.

"आजारी आहे? तेव्हाच. नाहींतर ती माझ्या समाचारला यायला चुकावयाची नाहीं. चल पाहू तिच्या महालाकडे मला घेऊन!" ताराबाई म्हणाली.

जिजा मुकाट्यानें ताराबाईला घेऊन राणीच्या महालाकडे गेली. महालापाशीं जाताच ती ताराबाईला म्हणाली, "मासाहेबानीं जरा इथें थांबावें. मी आत जाऊन थोरल्या आईसाहेब जाग्या आहेतशा पाहून येत्यें."

"जागी नसली तर तिला जागी कर. म्हणावें मी आल्यें आहें." ताराबाई म्हणाली.

जिजा पुढें निघून गेली. तिच्यापुढें प्रतिनिधि महालाकडेच चाललेले ताराबाईलाही ओझरते दिसले. जिजानें तर त्याना स्पष्टच पाहिलें. तरीही ती महालापावेतो गेली. पुतळा तेव्हा महालाच्या दरवाजावर उभी होती. प्रतिनिधि तिला न विचारतांच आंत गेले. थोड्या वेळापूर्वी तिनेंच जातांना

भेटून जाण्याविषयींचा राणीचा तोंतडीचा निरोप त्यांना येऊन सांगितला होता. मग प्रतिनिधि महालात जाण्यासाठीं पुन्हा परवानगी कशाला विचारतील !

तरीही जिजानें पुतळेपाशीं जाऊन हळूच तिच्या कानाशीं लागून सांगितलें, "मासाहेब थोरल्या आईसाहेबांच्या भेटीला आल्या आहेत"

पुतळा आत गेली, व लगेच बाहेर येऊन म्हणाली, "त्याचे डोकें आज फारच दुखत असल्यानें त्या झोंपीं गेल्या आहेत. कोणीही आलें—महाराज आले तरीही उठवू नकोस असें त्यांनीं मला सांगून ठेवले आहे.

पुतळा जें काय बोलली तें एवढेंच ! मनातले उरले सुरले भाव तिनें आपल्या मुद्रेनें जिजाला सांगितले.

जिजानें बाहेर जाऊन ताराबाईला पुतळेनें पढविलेली पोपटपची पाठ म्हणून दाखविली.

ताराबाईनें 'बरें आहे' एवढें म्हणून मुकाट्यानें आपल्या महालाचा रस्ता सुधारला. तिच्या 'बरें आहे' या उद्गाराचे काटे जिजाच्याही अंतःकरणाला बोंचले. पण करते काय?

## प्रकरण १२ वें

# तुळाजीला भुतानें घेरलें

" पुतळे! जरा माझ्या बिऱ्हाडीं येतेस का? "

" कशाला? "

" कांहीं तुझ्यापाशीं बोलायचें आहे. "

" मग इथेंच बोल ना? "

" ती अशी चवाठ्यावर बोलण्याजोगी गोष्ट नाहीं. मघाशीं तूं मला विचारीत होतीस ना, तें तुला सांगायचें आहे. "

" तू चल पुढें, मी येत्यें मागाहून. "

महाराज रंगमहालांत राहावयाला वनवासवाडींतून माघारे आल्यापासून चौथ्या दिवशींच्या पहाटेची गोष्ट. तुळाजी राणीला भेटून राजवाड्याबाहेर पडला तो प्रथम पुतळेचा शोध करीत तिच्या मागोमाग गेला. पुतळा झरी-जवळच्या सोप्यात जागतच बसली होती.

वाचकांना ह्या रंगमहालातील झरीची तिच्या नुसत्या नावावरून मुळींच कल्पना यावयाची नाहीं. आज रंगमहालाच्या जागीं उभा असलेला रंगमहा-लाचा भग्नावशेष पाहून प्रेक्षकाचें मन उदास होतें, व त्या अवशेषाजवळच ज्या टेकडीवर अजिमतारा गड आज कैक वर्षांपासून अथवा कैक शतका-पासून जगाचे उन्हाळे पावसाळे पाहत आणि विचित्र दैवगतीचे आघात सोशील उन्हांत तापत, पावसात भिजत व थंडींत कुडकुडत उभा आहे, त्या टेकडीच्या पायथ्याशीं ती जिवंत पाण्याची झरी एकनिष्ठपणें वाहत अस-लेली पाहून पाहणाराच्या उदासीनतेंत भर पडते. अजिमतारा गड बांधला जाण्यापूर्वीही ती टेकडी त्या ठिकाणीं होती, आणि ती झरीही त्या टेकडी-च्या पायथ्यातून झुळझुळ वाहत होती. ती झरी रंगमहाल राजवाडा वैभव-

संपन्न होता तेव्हां राजवाड्याच्या आवारांत समाविष्ट करून घेण्यांत आली होती. त्या झरीच्या सोप्यात पुतळा बसली असताना तुळाजी तिच्यापाशीं जाऊन तिच्याशीं बोलू लागला.

थोड्या वेळापूर्वी तुळाजीला पुतळेनेच राणीच्या सागण्यावरून राजमहालांत बोलावून आणले होतें, तेव्हाच तिनें त्याच्यापाशीं राणीबरोबर रोज चाललेल्या वाटाघाटींविषयीं विचारणा केली होती. तेव्हा तुळाजीनें तिला उडवाउडवीचें उत्तर दिले होते.

तुळाजी पुढें निघून गेला, व अमळशानें पुतळा त्याच्या मागोमाग गेली. बाजीराव पेठेंत कोटेश्वरापाशीं तुळाजीचें घर होतें, व पुतळाही मूळपासून त्याच्या शेजारींच राहत होती. प्रतापराव ठार मारला गेल्या दिवसापासून पुतळेला राजवाड्यात राणीपाशीं कायम राहता आलें असतें. तिला घरांत एक म्हातारी आजेसासू होती, व त्या नावराबायकोंनीं मुकुंदा या नावाचा एक अनाथ मुलगा पाळलेला होता. यावेळीं मुकुदा पाच वर्षांचा होता. तो पुतळा व प्रतापराव यानाच आपले आईबाप मानीत असे. त्या मुलाला म्हातारीचाही लळा होता, व तो तिच्यापाशींही राहू शकला असता. अथवा त्याचें सगोपन पुतळेला राजवाड्यात राणीच्या तैनातींत राहूनही करता आलें असतें. राणीने तिला तसा आग्रहही केला होता. पण तिला तें मानवलें नाहीं. तें न मानवण्याचें खरें कारण काय असेल तें तिचें ती जाणे. पण राणीनें विचारता तिला तिने कारण सागितले तें असें कीं, "आपला पति आपल्या स्वप्नात आला, व वर्षभर आपण त्या घरात राहणार, तिथेंच माझें वर्षश्राद्ध उरकून म्हातारीची योग्य ती व्यवस्था लावून मग तू तुझ्या सुखाचा योग्य तो मार्ग स्वीकार, यात चूक केलीस तर मी तुझा गळा दाबून प्राण घेईन, असें त्यानें मला सांगितलें." त्याबरोबर पुतळा असेंही सागे कीं, हा अनाथ जीव आपण पदरीं आणला आहे, त्याला जरा जाणतेपणाचे पख फुटून तो आपलें दाणा-पाणी मिळविण्याला समर्थ होईतो त्याच्या सत्तेच्या घरात त्याची निगा राखली गेली पाहिजे असेंही प्रतापरावाच्या भुताचें सागणें आहे. आणि प्रताप-रावाच्या भुताचें आपसांतल्या जवळजवळच्या मडळींत मोठेंच प्रस्थ माजून राहिल्यामुळें जें जें त्या पिशाच्चानें सांगावें, तें तें कोणाला पटलें अथवा न पटलें तरी तें न मानण्याची कोणाचीही छाती नव्हती.

तुळाजी पुढें गेला तो पुतळेच्या दरवाजांत तिची वाट पाहत उभा राहिला. तोंच पुतळा तिथें येऊन पोहोंचली.

" कशाला मला बोलावलेंस ? " पुतळेनें प्रश्न केला.

" एक काम तूं कर. "

" काय करूं ? "

" आमच्या सरकारांना जाऊन कळव कीं तुळाजी आजारी आहे, तो दोन दिवस नोकरीवर येणार नाहीं. "

" तू आजारी आहेस ? "

" असें सरकारांना कळवायचें. "

" पण खरोखरच तूं आजारी आहेस का ? "

" नाहीं ग ! पण मला एका महत्त्वाच्या कामासाठीं परगांवीं जायचें आहे. त्या गोष्टीचा कुठेंही बोभाटा होता कामा नये. आणि आमच्या सरकारांना तर ती मुळींच कळता कामा नये. "

" कोणती ती गोष्ट ? "

" माझी परीक्षा पाहते आहेस होय ? "

" शपथेला मोकळें राह्यचें असलें तर नको सांगू मला. "

" नाहीं. नाहीं. कोणापाशीं ती गोष्ट बोलायची नाहीं अशी थोरल्या आईसाहेबांनीं मला शपथ घातली आहे. "

" मग नको सांगूं बापडा ! "

" पण मी शेजेच्या बायकोशींदेखील बोलायचा नाहीं अशी शपथ कुठें घेतली आहे ? मनुष्य आईबापापासून एखादी महत्त्वाची गोष्ट लपवून ठेवील, मुलांपासूनही ती वेळीं लपवून ठेवील. पण बायकोपाशीं—देवाधर्माच्या साक्षीनें उभ्या जन्माची भागीदारीण झालेल्या बायकोपाशीं—तो काय व कसें लपवून ठेवील ? आणि तें कां म्हणून ? माझा तर असा स्वभाव आहे कीं एकदा प्रेम म्हटलें कीं प्रेम ! विश्वास म्हटला कीं विश्वास ! तुझ्यावर माझा विश्वास आहे, तुझ्या मांडीवर मस्तक ठेवून मी निर्धास्तपणें झोंपी जाईन. मग तूं सुरी घेऊन माझी गर्दन कापलीस तरी मला त्याचें कांहीं वाटावयाचें नाहीं."

"गर्दन कापल्यावर काय वाटायचें !"

"नाहीं आपलें सांगितलें. बरें; तें[illegible] काम करणार ना ?"

पुतळेनें पुन्हा पूर्वपदावर येऊन विचारलें. तुळाजी मुद्याची माहिती तेवढी सांगण्याला नाकारतो आहे हें तेव्हांच तिच्या ध्यानीं आलें. त्यानें इतका वेळ प्रेमाच्या व विश्वासाच्या लोणकढ्या थापा मारल्या, त्या तिला पूर्णपणें कळत होत्या. ओढाळ जनावराप्रमाणे परदारा व परधन याकडे आधाशी-पणानें धाव घेणारें द्विपाद जनावर तें, त्याच्या ठायीं प्रेम व विश्वास संभवनीय देखील नाहीं, हें तिला कोणीं नव्यानें शिकवावयाला नको होतें. बोलूनचालून ती हाडवैऱ्याला डसण्यासाठीं दबा धरून बसलेली नागीण होती. तो त्या नागिणीच्या सोनेरी कान्तीला भुलून पागल बनला तर त्याला तिचा काय इलाज? त्याच्या प्रेमाच्या अघळपघळ बोलावर तिचा विश्वास बसला नाहींच; उलट ते बोल ऐकताना कोणीं तरी आपल्या कानीं काटे खुपशीत असल्याचा भास तिला झाला. राजहंसी अनाथ झाली म्हणून काय डोमकावळ्याला वरील? सिंहीण अन्नासाठीं तडफडूं लागली म्हणून काय गवत खाईल? ती आपल्या पणातील सूडाचा निर्धार खरा होण्यासाठीं तुळाजीला नुसता झुलवीत होती. राणीवरही सूड घेण्याचा तिचा निर्धार व त्याबरोबर शक्य तों मराठ-शाहीची सेवा करण्याची तिची पवित्र इच्छा असल्यानें केवळ त्या त्रिविध ध्येयावर नजर ठेवून ती वागत होती. तुळाजी आपण होऊन प्रेमानें तिला थोडीच माहिती देणार होता! तो नाना परींच्या थापा मारून तिला आपली मिंधी बनविण्याची सारी यातायात करीत होता. त्याला पुतळेचें अंतःकरण कोठें माहीत होतें?

अशा हृदयहीन माणसाला वश करावयाचा तर त्याला तसेंच कांहींतरी प्रलोभन दाखविण्याखेरीज गत्यंतर नाहीं, हें जाणून पुतळा तुळाजीशीं प्रेमा-च्या लटक्या हावभावानीं वागत होती. ह्या झाल्या पुतळेच्या मनांतल्या गोष्टी. त्या तिनें मनांतच ठेवल्या, व जरा पुढें जाऊन तुळाजीचा हात आपल्या हातीं घेऊन लडिवाळपणानें म्हटलें, "पण तू राणीसाहेबापाशीं कशाला गेला होतास, आणि दोन दिवसांत कसलें महत्त्वाचें काम करणार आहेस तें सांगितलें नाहींस!"

"हें पाहा, कुठें बोलायचें नाहीं. नागपूरकर रघूजीबाबा भोंसल्यांचे लेक मुधोजीबाबा सध्यां देऊर येथें आहेत ना, त्यांना दत्तक घेण्याचा थोरल्या आईसाहेबांचा निश्चय कायम झाला आहे. त्यांना प्रतिनिधि व मुतालिक

यांचीही पूर्ण संमति आहे. त्यांना महाराजांच्या भेटीच्या मिषानें इकडे बोलावण्यासाठीं मी चाललों आहे."

"आणि धाकटे राजाराम महाराज जिवत आहेत ते?"

"ते जिवत कुठें आहेत? आमच्या गमाजीरावानीं थोरल्या आईसाहेबांच्या सागण्यावरून मागल्याच वर्षी त्याचा बळी घेतला नाहीं का?"

"असें!" पुतळा क्षणभर विचार करून म्हणाली. अज्ञातवासी राजपुत्राला ठार मारण्यासाठीं थोरल्या राणीने मागील वर्षी रचिलेलें कारस्थान तिला पूर्ण माहीत होतें, व राजपुत्र मारला गेला नसून जिवंत आहे हेंही ती जाणत होती. पण तें ती तुळाजीपाशीं कशाला बोलून दाखवील! तिनें त्याच्या होला हो दिली. तिनें त्याला विचारलें, "महाराजांच्या देखत हा बेत ठरला का?"

"महाराजाना कोण पुसतो?" तुळाजी म्हणाला, "मी कांहीं महाराजाशीं थोरल्या आईसाहेबाना खलबत करताना ऐकलें नाहीं. पण काल प्रतिनिधि, सरकार, मुतालिक व थोरल्या आईसाहेब आणि सुमतांचे व्याही देवजी मेघःश्याम कोणी आहेत ते, यांचें खलबत मीं व गमाजीराव दोघेही जवळ उभे असताना झालेलें ऐकलें, त्यावरून मला वाटतें कीं थोरल्या आईसाहेब अशा कितीतरी महाराजांना बासनांत गुंडाळून ठेवतील. बाकी, आपणाला त्या थोरामोठ्यांच्या गोष्टींशीं काय करायचें आहे म्हणा! थोरल्या आईसाहेबांच्या मनाप्रमाणें नवे दत्तक राजे त्याच्या मांडीवर बसावे, असें मला वाटण्याचें कारण इतकेंच कीं त्या नव्या राजवटींत आमची पोळी चांगली पिकेल. तूं थोरल्या आईसाहेबाची आवडती दासी आहेस, आणि मीही आतां त्याच्या विश्वासाला पात्र होऊं लागलों आहें. नव्या राजांचें त्यांच्या मांडीवर ज्या दिवशीं दत्तविधान होईल त्या दिवशीं त्या महाराजांना सांगून मला सरदारकी देवविणार आहेत."

"देवविणार आहेत! त्या साऱ्या भविष्यकाळांतील गोष्टी आहेत. आज मरा आणि उद्यां धर्म करा त्यांतलीच अवस्था."

"तें सारें खरें ग! पण आपण मेल्याखेरीज स्वर्ग दिसत नाहीं म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. ही सरदारकी थोरल्या आईसाहेब मला कांहीं अगदीं फुकाची देणार नाहींत."

"तर?"

"आणखी एक कामगिरी त्या मला सांगणार आहेत."

"ती कोणती?"

"ती फारच महत्त्वाची आहे."

"माझ्यापेक्षाही त्या कामगिरीचे अधिक महत्त्व वाटते तुला?"

"नाहीं तुझ्यापेक्षा कसले महत्त्व? तुझ्यावरून मी सारी पृथ्वी ओवाळून टाकीन श्रीमंत पेशवे सरकाराचा काटा आपल्या वाटेतून काढून टाकण्याचा त्याचा फार मानस आहे"

"ते तर त्या माझ्यापाशींदेखील बोलल्या होत्या." आपणाला हवा तो विषय निघाला असे पाहून पुतळा तुळाजीला आणखी खुलविण्याचा मनोमन निश्चय करून म्हणाली, "मला त्या सांगत होत्या कीं मीं श्रीमंत सरकाराच्या पदरीं दासी म्हणून राहून हें काम करावे. पण मी म्हटले,–आणि खरेच, तूच सांग, श्रीमंतासारख्या रंगेल मालकाच्या पदरीं दासी म्हणून माझ्यासारख्या स्त्रीने राह्यचे, म्हणजे माझे तरुणपण आणि माझे रूप हीं माझे वैरी होणार नाहींत काय?"

"मग काय, तू महाराज सरकाराची जशी विरूबाई होती, तशी श्रीमंताची विरूबाईच शोभली असतीस कीं" मग तू मला थोडेच विचारलें असतेस? खरेच, मग मला तू विचारले असतेस का ग?"

"मग मीं काय केले असतें, याच्या सुखासुखी वाटाघाटी आता करून काय करायच्या आहेत? म्हणे आकाश कोसळून पडले असते, तर तें समुद्रात बुडाले असते की समुद्रावर तरले असते! असले विचित्र प्रश्न हे बघ, तू मला विचारू नकोस."

"बरें मग थोरल्या आईसाहेबाना तूं काय सांगितलेंस?"

"ते तुला कळत नाही का? वैभवासाठीं वचनाने मिळविलेल्या जोडीदाराशी बेइमानी करण्याइतकी ही पुतळा जगातून उठली आहे का?"

"त्यानीं मला हें काहींच सांगितले नाहीं. फक्त ती कामगिरी करशील का असे मला विचारलें, आणि त्यासाठीं त्यानीं मला आपल्या पदरीं सरदारकी देऊ केली"

"मग, सरदार व्हायचें आहे कीं नाहीं?"

" होणार तर? जरूर सरदार होणार. लढाईत वीराप्रमाणे तरवार गाजवून सरदारकी मिळविण्यापेक्षा श्रीमंतासारख्या एखाद्या खाशाचा अंधारात कसायासारखा खून करून सरदारकी मिळविणें मला तरी फारच सोपे वाटते."

" मग केव्हाचा बेत ठरला?"

" अजून नक्की बेत ठरला नाहीं थोरल्या आईसाहेबाच्या ह्या विचाराशीं मुतालिक बापलेकाचे अगदीं एकमत आहे. पण पंतप्रतिनिधि सरकार आणि सुमंताचे व्याही याना तो विचार तितकासा पसंत नाही म्हणून आईसाहेबानीं तूर्त तो विचार तेवढ्यावरच अर्धवट ठेवला आहे तरीपण गमाजीरावानीं मला खासगी सांगून ठेवले आहे कीं तो मोका आज ना उद्या नक्की येणार. त्यातही आणखी एक गुतागुत आहे"

" ती कोणती आणखी?"

" श्रीमंत पेशवे थोरल्या आईसाहेबाच्या डोळ्यात जितके सलतात, तितकेच माझे सध्याचे धनी चिटणीस सरकार, यमाजीराव आणि गमाजीराव याच्या डोळ्यात सलतात. त्याना वाटते की चिटणिसाचा काटा सर्वाच्या अगोदर आपल्या मार्गातून दूर व्हावा"

" पण मी तर पाहत्ये की अलीकडे आठ पधरा दिवस थोरल्या आईसाहेब आणि चिटणीस सरकार याचे चागलेच रहस्य जुळले आहे"

" होय. आणि म्हणूनच ते मुतालिक बापलेकाच्या डोळ्यात फार सलतात. त्याना वाटते, थोरल्या आईसाहेबाचे आम्ही एवढे सल्लागार असताना हे नवीन शेंडेनक्षत्र कशाला मध्येच उगवले?"

" अस्से! एकूण पुष्कळच भानगडी आहेत म्हणायच्या तर!"

" असेनात का? आपणाला त्याच्याशीं काय करायचें आहे? केली चाकरी पावला मुशाहिरा एवढ्याशीं आमचे काम"

तुळाजी मुद्दामच एका शब्दाला एकवीस शब्द वाढवून बोलत होता. पुतळेचे मनही जास्त प्रसन्न व्हावे, म्हणून तो मुद्दाम रेंगाळत उभा होता. बोलता बोलता त्याने हळुहळू सरकत सरकत पुतळेच्या जवळ जवळ जाण्याचा प्रयत्न केला. पण त्याने एक पाऊल पुढे सरकवलें कीं पुतळेने एक पाऊल दूर सरकावे. असे होता होता चागली पहाट झाली. कोंबडा आरवला. पुतळेच्या घरांतून म्हाताऱ्या आजीचा खोकण्याचा आवाज ऐकू येऊ लागला.

त्या आवाजाने असो अथवा झोप पुरी झाल्यामुळे असो, मुकुंदा एकदम जागा होऊन रडूं लागला. तुळाजीच्या पागलपणातून आपण सहीसलामत कसें बाहेर पडावें हा पुतळेला जो प्रश्न पडला होता, तो तिच्या पोष्यपुत्र बालवीरानें लीलेने असा सोडविला.

मुकुंदाला समजावण्यासाठीं पुतळा आपल्या घरात निघून गेली. आपल्या मनातील हेतु आज तरी पुतळेपाशीं बोलून दाखविता येत नाहीं असें पाहून तुळाजी हिरमुष्टी होऊन देऊरला जाण्याच्या उद्योगाला लागला. मात्र जाताना त्यानें पुतळेला पुन्हा एकवार बाहेर हाक मारून चिटणिसाकडे आपण आजारी असल्याची खबर पोंचविण्याची सूचना दिली, व तिनें ती मान्य केली.

तुळाजी तेथून अमळ दूर गेला, तो त्याच्या मागोमाग कोणी तरी व्यक्ति माजराच्या पावलानीं चालत चालत पुतळेच्या घराच्या वळचणींतून बाहेर पडली व काहीं अंतरावरून त्याचा पाठलाग करूं लागली. तुळाजीच्या तें ध्यानीं आलें नाहीं तो आणखी थोडा पुढें गेला तों उजव्या हाताकडील बाजिरावाच्या विहिरीच्या आवारातून एक आंब्याएवढा दगड येऊन धप्कन् त्याच्या पाठींत बसला, व त्या माराबरोबरच त्याला कोणाचेसे शद्ब ऐकूं आले, " हरामखोरा ! आता अगलगट कोणाशीं करीत होतास ! पुतळा ह्या प्रतापरावाची पत्नी आहे, हें तू विसरलास काय ? पुन्हा कधीं असले हलकटपणाचे चाळे करशील तर याद राख, परवा तुला ठार मारायचा तो उद्याच मारीन. मला एकटा गाठून माझा खून करणें तुला गोड वाटलें नाहीं काय ? आता प्राणाच्या मोलानें त्या पापाचें फळ भोगण्याला कचरशील तर खबरदार ! जीते रहो बेवकूफ. अगर तुम अदमी हो तो जान के वास्ते डरो मत. अभी जान तुमकू देनाही पडेगा, याद रखो ! "

पण तुळाजी घाबरून सभोंवार पहातो तों कुठें कोण आहे !

## प्रकरण १३ वें

# चिटणीस मांत्रिक बनले !

तुळाजी आजारी असल्याची खबर पुतळेने आपल्या शेजाऱ्यामार्फत त्याच दिवशीं चिटणिसाच्या वाड्यात कळविली.

तो दिवस गेला, व दुसऱ्या दिवशीं पहाटेला चिटणीस आपल्या नित्य नियमाप्रमाणे पण आज पायींच कोटेश्वराच्या दर्शनाला आले. ते देवदर्शन घेऊन गोमुखी प्रदक्षिणा घालीत उजव्या बाजूच्या गोमुखापाशीं येतात, तोंच त्याना उजव्या बाजूला देवालयाच्या आगणात असलेल्या विहिरीच्या आडून कोणाचासा स्वर ऐकू आला, "चिटणीस ! राणीने तुमचा राजकारणाचा सारा मामला फिसकटवण्याचा घाट घातला आहे. प्रतिनिधि, मुतालिक, ही मंडळी तिला सामील आहे मुधोजी भोंसल्याला दत्तक घेण्याचा त्या कपूचा निर्धार कायम झाला असून त्याला आज आमत्रणही गेले आहे तो महाराजाच्या भेटीच्या निमित्ताने राजधानींत इतक्यातच येईल. राणीच्या मायावी बोलाना भुलून तू फसू नकोस. पेशव्याच्या जिवाला राणी अपाय करू पाहते. तुझ्यावरही प्राणसकट ओढवण्याचा सभव आहे. निकटच्या सेवकापासून सावध रहा."

हा गूढ सदेश जरी निराळा असला, तरी सदेशवाहकाचा चिटणिसाना चागलाच परिचय झाला होता. प्रतापरावाच्या पिशाच्चानें आज त्याना दिली ही चौथी पाचवी तरी भेट असावी. प्रत्येक वेळीं त्या पिशाच्चानें काहीं नवा सदेश चिटणिसाना सागावा, व त्याचा त्याना हातोहात पडताळा यावा. त्यामुळें आज ते घाबरले अथवा भ्याले नाहीत. मात्र त्याना आतां कळलेल्या बाबतींत थोडा जास्त खुलासा पाहिजे होता, म्हणून ते त्या पिशाच्चाला म्हणाले, "राणी कोणत्या हस्तकाना हाताशीं धरून हीं कारस्थानें खेळत आहे तेवढें मला सागशील का ?"

यावर "उघड्या डोळ्यानीं नीट मार्ग पाहून विचारानें चाल म्हणजे सर्व कांहीं कळेल" एवढेंच उत्तर मिळालें, व चादण्याच्या प्रकाशात देवालयाच्या आवारातून सावली चालत गेलेली त्याना दिसली. त्या सावलीची मूर्ति मात्र त्याना वृक्षाखालच्या काळोखात दिसली नाहीं, व त्यानींही तितकें लक्ष्यपूर्वक पाहिलें नाहीं.

तो भयानक संदेश ऐकून चिटणिसाच्या छातींत क्षणभर धडकी भरल्यासारखी झाली ह्या घटनाचा पडताळा पाहावयाचा तरी कसा? बरें, त्यावर विश्वास न ठेवावा, तर आजवर पिशाच्चानें सांगितलेल्या साऱ्या गोष्टी ततोतत त्याच्या प्रचीतीला उतरलेल्या!

या बाबतींत आता प्रथम पेशव्याचा विचार घ्यावयाचा, असा विचार करून चिटणिस तसेच मोकळ्या हवेंत फिरावयाला जाण्याचा बेत रहित करून पेशव्याना भेटण्यासाठीं अदालतीच्या वाड्याकडे निघाले. जाताना त्याच्या डोक्यात राहून राहून विचार घोळत होता कीं राणी अलीकडे प्रत्येक बाबतींत आपलें मत घेते आणि ती दत्तकाची बाब तेवढी निराळीच कशी तिच्या ध्यानीं आली? तिनें त्या विषयीं आपणापाशीं आजवर चकारशब्द देखील उच्चारला नाहीं हें कसें काय? कीं आपणाला चोरून तिला हा आपला बेत तडीला न्यावयाचा आहे? या बाबतींत पेशव्याना तरी कांहीं माहिती असली तर विचारून तावडतोब योग्य उपाययोजना करण्याचा त्याचा इरादा होता.

चिटणीस अदालतीच्या वाड्यात जाऊन पोहोंचले, तों पेशवे सदेरवरच आपल्या निरनिराळ्या हेराकडून बातम्या ऐकत बसले होते. ते त्याचे महत्त्वाचे खासगी काम चाललेलें पाहून चिटणीस मागच्या पायीं मागें परतले. इतक्यात पेशव्याची त्याच्याकडे नजर गेली. त्यानीं हाक मारली, "बाबा! माघारे का चालला? या ना!"

"आपली कामगिरी आटोपू द्या. तोंवर मी गणपतीचें दर्शन घेऊन येतो" असें म्हणून चिटणीस बाहेर निघाले.

"जाऊ नका बाबा! अगादर इकडे या कसे? कसला गणपति व कसली सरस्वति घेऊन बसला? तूर्त आपण एवढ्या मोठ्या चक्रव्यूहात सांपडलो आहों कीं यातून पार पडेपावेतों आपणाला देवदर्शन काय पण

स्नानसंध्याही करीत बसायला फुरसत नाहीं. अगोदर इकडे या. आपण सध्या करीत आहों हें गोब्राह्मणप्रतिपालनाचें पुण्यकार्यच आहे. सध्या देवदानवाचें युद्ध जुंपण्याची वेळ आली आहे ह्या युद्धात आपण देवाचें देवपण अबाधित राखण्यासाठीं तळहातावर शीर घेऊन झगडणे हीच खरी देवसेवा आहे.. " असें बोलत बोलत पेशवे सदरेवरील आपल्या उच्चासनावरून उठून चिटणिसामागोमाग फाटकापावेतो चालत गेले त्यानीं चिटणिसाचा हात आपल्या हातीं घेऊन त्याना माघारें आणलें. सदरेवर जमलेल्या सर्व हेराकडून मिळणाऱ्या बातम्याची पुरधऱ्याना नोंद करून घ्यावयाला सागून ते चिटणिसाना म्हणाले, " चला जरा आत चला. आपणाशीं काहीं महत्त्वाच्या गोष्टी बोलावयाच्या आहेत.' मींच आता आपणाकडे येणार होतों, तों आपणच आला, फार चागलें झालें. "

" मीही आपणाकडे तशाच काहीं महत्त्वाच्या कामासाठीं आलो होतो." चिटणीस म्हणाले.

दोघेही आत बैठकखान्यात जाऊन लोडाशीं टेकून बसतात न बसतात, तोंच पुरधरे आत आले व पेशव्याना म्हणाले, " मग कऱ्हाडचा पचाक्षरी बोलवावयाचा काय ? "

" कशाला पाहिजे पचाक्षरी ? कोणाला भूत पिशाच्चबाधा वगैरे झाली आहे की काय ? " चिटणिसानीं मध्येंच विचारले

" होय हो ! आमच्या दोन हेराना पिशाच्चानें आज पधरा दिवस झाले, चागलेंच पछाडलें आहे. तो थोरल्या आईसाहेबाच्या पुतळा नावाच्या दासीचा दादला धाकट्या आईसाहेब वारल्या त्या दिवशीं ठार मारला गेला, त्याचें पिशाच्च त्या बिचाऱ्याच्या मागें लागलें आहे. काल रात्रौ त्या बिचाऱ्याचीं घरेंच पेटलीं. खरें, आपणही मागें एकदा त्या पिशाच्चाची कोटेश्वरीं भेट झाल्याचें बोलला होता. "

" होय, बोललों होतों. तें मला एकदाच का अनेकदा भेटलें. आजही भेटलें. तेंच जर पिशाच्च असेल, तर श्रीमंताना माझी अशी विनति आहे कीं त्याला गाडण्याचे इतके श्रम घेण्याचें कारण नाहीं. "

" तें पिशाच्च तर फारच त्रास देतें म्हणे ! "

" कुणाला ? आपणाला नाहीं ना त्याचा त्रास होत ? "

" आम्हाला नाहीं झाला म्हणून? आमच्या लोकाना तर तें छळतें ना?"

" त्याचा बदोबस्त आपणाला अन्य उपायानी करता येईल." चिटणीस पुरधऱ्याकडे वळून म्हणाले, " तुम्ही आता जा श्रीमताच्या व आमच्या विचारें त्या पिशाचाची खबरदारी काय घ्यावयाची ती ठरवून मग श्रीमत सागतील त्याप्रमाणें करा "

पुरधरे जावयाला निघाले त्याना चिटणीस पुन्हा हाक मारून म्हणाले, " आणि हें पहा आबाजीपत! ज्या कोणाला पिशाचाने झपाटलें आहे, त्याना सदरेवर थोपवून घ्या "

पुरधरे गेल्यावर पेशवे चिटणिसाना म्हणाले, " आपणाला ह्या भानगडींतील बरीच माहिती दिसते "

" होय थोडीशी माहिती आहे खरी " असे म्हणून चिटणिसानीं त्या पिशाचाची कोटेश्वराच्या देवालयात गाठ पडल्यापासून आज पहाटे—पावेतोची हकिकत पेशव्याना निवेदन केली, व शेवटी सागितलें, " या बाबतींत आपणापाशी शहानिशा करून घेण्यासाठींच मी आज आपणाकडे मुद्दाम इतक्या सकाळीं आलो आहें आता बोला "

" मोठेच आश्चर्य आहे! ह्या पिशाचांविषयीं आपले मत काय आहे?"

" मला तर असे वाटतें कीं प्रतापरावाच्या खुनाची बित्तबातमी ज्याला आहे व जो कोणी थोरल्या आईसाहेबांच्या पक्षाचा वैरी आहे, त्यानें त्या मडळीवर सूड घेण्याचा विडा उचलला असावा पिशाचाकडून इतक्या पद्धतशीरपणे ह्या बित्तबातम्या मिळणेंच शक्य नाहीं. आता आपल्या हेराच्या मागे ते पिशाच हात धुवून लागले आहे म्हणता, हें मात्र आश्चर्य आहे खरें."

" तो मनुष्य कोण असावा याचा तपास लावण्याचा आपण काहीं प्रयत्न केला का?"

" नाही. तसा प्रयत्न करणें इष्टही नाहीं त्यामुळें आपल्याच जिवावर एखादा भयकर प्रसग गुदरावयाचा! प्रसग गुदरला नाहीं तरी आपणाला आपला एक निःसीम हितकर्ता गमावून बसावे लागणार हें निश्चित. तसें होता उपयोगी नाहीं आता प्रश्न राहिला आपले जे दोघे सेवक त्या पिशाचाकडून झपाटले गेले आहेत त्याचा."

" होय. " पेशवे स्वतःशीं विचार करता करता एकदम म्हणाले, " तें राहूद्या. आपणाला आता अगोदर विचार करावयाचा थोरल्या आई-साहेबानीं आरंभिलेल्या दत्तकाबाबतच्या भानगडींचा मला वाटतें, महाराजाना आपण एकवार समक्ष भेटीत ह्या सर्व गोष्टींचा कायमचा खुलासा विचारून घ्यावा म्हणजे काही मळमळ मागे शिल्लक उरावयाला नको "

" महाराजापेक्षाही मला वाटते, आपण ताराबाई आईसाहेबानाच विश्वासात घेऊन त्याच्याकडून ह्या गोष्टीचा निर्णय लावून घ्यावा. "

" ही योजनाही काहीं वाईट नाही. अलीकडे त्याची वृत्ति पूर्वीपेक्षा पुष्कळच निवळलेली दिसते, वाडवडिलाच्या राजवटीची खरी कळकळ त्याना उत्पन्न झालेली दिसते. परवा महाराज रंगमहालात राहावयाला आले त्या दिवशींच्या भेटींतील त्याचें एकंदर वर्तन आपल्या ध्यानीं आलेच असेल "

" त्यावरून बरी आठवण झाली. " चिटणीस कमरेपासून गुढघ्याला शेल्याचा वेढा घेत म्हणाले, " कोल्हापूरकराचा वकील नेमका याच वेळीं इथे तळ देऊन राहिला आहे, त्याचा उद्देश काय बरे असावा ? "

" त्याचा उद्देश उघड आहे अगदी उघड्या भाषेत बोलतो मी, महाराज निवर्ततात केव्हा आणि त्याचे पिंड आपल्या भक्ष्यस्थानी पडतात केव्हा अशी तो कोल्हापुरी कावळा वाट पाहत बसला आहे कोल्हापूर व सातारा ह्या दोन्ही गाद्या एक व्हाव्या असा कोल्हापूरकराचा मानस स्पष्ट दिसतो. "

"तोच मानस प्रथमपासून आपलाही आहे " चिटणीस आस्थेनें पेशव्या-कडे तोंड फिरवून म्हणाले, व उत्सुकतेने त्याच्या उत्तराची अपेक्षा करू लागले.

" गोष्ट खरी आपण मीं पेशवाईचीं वस्त्रे धारण करण्यापूर्वी कोल्हापूर-कर संभाजी महाराजाशीं ज्या आणा भाका घेतल्या त्याना अनुसरून—"

" आणाभाकाच का बरें ? मीं तर ऐकले आहे कीं आपला कोल्हापूर-कराशीं तसा गुप्त करारनामाही झाला होता. " असे म्हणून चिटणीस जरा संदिग्ध वृत्तीने पेशव्याकडे पाहू लागले.

" होय करारनामाही झाला होता, व त्या करारनाम्याच्या वार्तेनेंच थोड्या दिवसापूर्वीपावेतों माझ्याविषयींच्या गैरसमजाचा पुष्कळच सावळा-गोंधळही माजविला होता. मध्यतरीं मला पेशवाईपदावरून दूर करण्यासाठीं आमचे ऋणानुबंधी वैरी बाबूजी नाईक आणि महाराजाचे दोन्ही महाल

याच्याकडून त्या किंवदंतीच्या भाडवलावरच जगड्व्याळ उदद्व्याप माडण्यांत आला होता तो करारनामा करण्यातील माझ्या हेतूचा खुलासा आजवर मला निरनिराळ्या माणसापाशीं निरनिराळ्या प्रकारें करावाही लागला आहे. परतु त्या करारनाम्याचा खरा हेतु असा होता कीं, एका मराठशाहीचीं तीं दोन शकले पुन्हा पूर्ववत् एकत्र साधली जावीं, आणि आज जी दोन ठिकाणची शक्ति मत्ते सुभ साभाळण्यात आणि इर्ईला पडून एकमेकाविरुद्ध भलत्या सलत्या गोष्टी करण्यात निष्कारण व्यतीत होत आहे, ती हिंदुपदपादशाहीच्या ऊर्जिताकारणे लागावी."

"ही एकी शक्य आहे असें आपणाला वाटतें का?"

"आता वाटत नाहीं, पण तेव्हा मात्र वाटत होतें. असें पाहा, दोघेही निपुत्रिकच, वशवृद्धीसाठीं दोघानाही दत्तक घेण्याची पाळी त्या निमित्तानें परक्या दोन घराण्याचे हात मराठशाहींत घुसावयाचे व डाव्या हाताने उजवा हात तोडून पहावयाचे, मग शत्रूला फावून त्याने आमचे दोन्ही हात तोडून टाकून लुळी पागळी झालेल्या हिंदुपदपादशाहीची शिकार आपल्या घशात टाकावयाची! हा अनर्थ सातारा व कोल्हापूर ह्या दोन्ही गाद्या गुण्या–गोविंदाने एक झाल्यावर टळणे अशक्य नव्हते."

'मग आताच तो आपला विचार पालटण्याचे कारण?"

"कारण आजवरचा अनुभव!"

"मी विचारलेल्या प्रश्नामुळे ही आपली अमर्यादा करतों आहें असें नाहींना वाटत आपणाला श्रीमत?" चिटणिसानीं मध्येंच विचारलें. "कारण, आजवर मीं कधींच आपणापाशीं ह्या गोष्टीची इतक्या उघडपणें चर्चा केली नाहीं."

"पण आपण मला वेळोवेळीं अमोल साह्य केले आहे. महाराजापाशीं वेळोवेळीं माझा कैवार घेऊन आपणच माझे रक्षण केले आहे. आपणासारख्या कळकळीच्या हितकर्त्यानें मला काहींही विचारलें तरी त्याचा मला कदापि राग येणार नाहीं."

"मीं वेळोवेळीं आपणाला साह्य केले खरे, सध्या करतों आहें व पुढेंही करीन. पण ते साह्य मी आपणाला करीत नसून मी राजवटीची एकनिष्ठेनें सेवा करण्याचा माझ्या पूर्वजानीं घालून दिलेला कित्ता गिरवीत आहें. जितक्या

मनमोकळेपणानें आपण माझ्याशीं आज बोलत आहा, तितक्याच मनमोकळे पणानें मीही आपणाला माझें हृद्गत सांगतो, आपल्या सौजन्यावर व राज निष्ठेवर माझा भरवसा नाहीं असे जरी नाही, तरी त्या सौजन्यावर विसबून मी आपला हरएक बाबींत पाठपुरावा चालविलेला नाहीं. तर आपण एक महापराक्रमी चतुरस्त्र राजकारणधुरंधर पुरुष, आपल्या तोडीचा कर्ता माणूस राजवटीचें तारू दरम्यानचे सर्व अपघात टाळून सुखरूपपणे किनाऱ्याला वल्हवीत नेईल असा दुसरा कोणी माझ्या आढळात नाहीं म्हणून मी आपली बाजू हरघडी सांभाळीत आलों. मी महाराजानाही वेळोवेळीं हेंच सांगत आलों कीं, पेशव्याच्या मनात स्वार्थ व सर्वसत्ताधारी होण्याची महत्त्वाकांक्षा असो अथवा नसो. ते जर आज कोणत्याही कारणाने बिथरले व नाराज होऊन पेशवाईकारभारातून मोकळे झाले, तर स्वस्थ बसतील असे नाहीं. पराक्रमी पुरुष कर्माला हात लावून स्वस्थ का म्हणून बसेल? तो परिस्थिती-च्या आहारीं जाणार नाहीं, तर आपणाला अनुकूल अशी नवी परिस्थिति निर्माण करील. प्रधानमंडळातील बहुतेकांचा व रघूजीबाबा भोसले, फत्तेसिंग बाबा, दाभाडे, गायकवाड, पवार, आणि काही प्रमाणात शिंदे होळकर वगैरे मातबर सरदारांचादेखील विरोध असताना जो नरश्रेष्ठ आपलें आसन त्या सर्वांच्या नाकावर टिचून अढळ राखावे इतकेंच काय पण दशदिशाना दिग्विजय संपादन करून साऱ्या हिंदुस्थानात हिंदुपदपादशाहीचा अपूर्व दरारा बसवितो, तो त्याला पेशवाईपद सोडावे लागले म्हणून तो घरात माश्या मारीत स्वस्थ बसेल हें शक्य तरी कसें आहे? तो स्वतःच्या सामर्थ्याच्या जोरावर नवे साम्राज्यही स्थापन करावयाला चुकणार नाहीं. ब्रह्मदेवाच्या बरोबरीनें तो स्वता साठीं नवी सृष्टि निर्माण करील. त्याला टक्कर देण्याला मग राजवटीतला कोणता मोहरा दंड थोपटून पुढे येईल? आम्हा चिटणिसांचे घराणे छत्रपतींची सेवा करून जगण्यासाठीं व त्या एकनिष्ठ सेवेपायीं मरण्यासाठींच जन्माला आलें आहे. स्वामिकार्यासाठीं निःसीम भक्तीनें स्वतःचें बलिदान हसत खेळत करणारे असे एकनिष्ठ मराठशाहींत फारच थोडे सापडतील.”

‘ हें आपण बोलावयाला नको, देवच बोलला आहे. त्याच्या नुसत्या नामस्मरणमात्रे आमचीं जन्मजन्मांतरींचीं पातकें धुवून निघावीं, इतकी चिटणिसाच्या स्वामिनिष्ठेची पुण्यायी थोर आहे.”

"ही आपण माझी वृथा स्तुति चालविली आहे. त्या स्तुतीला मी पात्र नाहीं" चिटणीस नम्रतापूर्वक उद्गारले.

"तो पाहा उगवता सूर्यनारायण. त्या सूर्यनारायणाला साक्ष ठेवून मी बोलतो आहे, माझ्या बोलण्यात लवलेश कृत्रिमता अथवा तोंडपुजेपणा असेल तर त्याची शपथ!" पेशवे पूर्वेकडे नुक्ताच क्षितिजावर येणाऱ्या, व ज्या बैठकखान्यात त्या दोघाचा हा विचारविनिमय चालला होता त्या बैठकखान्याच्या खिडकींतून आपलीं सोनेरी किरणें आत फेकणाऱ्या सूर्याला अनन्यभावानें दोन्ही हात जोडून उद्गारले, "असें आहे, एक सूर्य जसा साऱ्या जगाला तेज देतो, तसाच एखाददुसऱ्या पुण्यवान पुरुषाच्या पुण्याईवरच अशा मोठमोठ्या राजवटींचा व समाजाचा योगक्षेम चालत असतो. तीं माणसें आपल्या उघड्या डोळ्याना नेहमीं दिसत नाहींत. म्हणजे तीं आपण होऊन पुढें पुढे करीत नाहींत. त्याना प्रसिद्धीची अथवा मानमरातबाची हाव नसते अशा कोटीपैकीं—ज्याच्या पुण्याईवर आज ही राजवट आबादी आबाद चालली आहे अशा पुण्यात्म्यापैकीं आपण एक आहा, अशी माझी मूळपासून खात्री आहे. म्हणूनच राजकारणाचे ओघ ओळखण्याची आपली दृष्टि व माझी दृष्टि यात किंचित् फरक आहे हें ध्यानीं आणून देखील आपणाशीं मी जितक्या भाबड्या भावानें आजवर वागत आलो, तितक्या भाबड्या भावानें दुसऱ्या कोणाशीं—मला पितृस्थानी सदैव पूज्य असणाऱ्या महाराजाशीं देखील वागत आलो नाहीं.—" चिटणीस अशा काहीं अर्थपूर्ण दृष्टीनें पेशव्याकडे पाहू लागले कीं, 'तुमच्या भाषेंत जितका लाघवीपणा व रसाळपणा आहे तितका प्रामाणिकपणा नाहीं.' असा त्या दृष्टींतील मूक अर्थ धूर्त पेशव्यानीं तेव्हाच ओळखला, व त्याच क्षणीं त्याचेही निराकरण केलें, "आपला माझ्या बोलण्यावर सहजासहजीं विश्वास न बसणें संभवनीय आहे. आपणाला वाटेल, प्रत्यक्ष मायबापापेक्षाही थोर अशा महाराजाशीं देखील जितकी निष्ठा असावी, तितकी न ठेवणारा हा पेशवा राजनिष्ठ कसा? पण मी आपणाला खरेच सागतों, माणसाची व्यक्तीवरील निष्ठा अगर प्रेम निराळें, आणि त्या व्यक्तीचे माणसानें मार्गदर्शकत्व मान्य करणे निराळें. महाराजावर माझें किती गाढ प्रेम आहे हें मी माझ्या तोंडानीं काय वर्णन करून सागू? पण ती खासगी बाब झाली, आणि राजकारण

व लोकसंग्रह ही बाब सार्वजनिक हिताहिताची आहे. महाराजाना मनाच्या लवचिकपणामुळें सार्वजनिक बाबींत व राजकारणात जितक्या न्यायनिष्ठुरतेनें वास्तविक वागावयाला पाहिजे तितकें वागणे शक्य होत नाही, याचा अनुभव माझ्याप्रमाणे आपणालाही अनेक वेळा आला असेल. किंबहुना हें ध्यानी आणूनच आपण आजवर अनेक वेळा महाराजाची दिशाभूल त्याचे मन न दुखविता दूर करीत आला. उदाहरणेच द्यावयाची तर निजामाच्या व दिल्लीच्या बादशाहतीच्या बाबतींत महाराजाचे धोरण किती नरमाईचें आहे, राजवाड्यात धाकट्या मोठ्या महालाकडून प्रत्यहीं उत्पन्न केल्या जाणाऱ्या बखेड्यात ते कसे हतबुद्ध होऊन जातात, श्रीपतराव प्रतिनिधींचा कमकुवतपणा पूर्णपणे ध्यानी असून व बाबूजी नाइकाची कलहप्रियता पूर्णपणे अनुभवाला आली असून त्याना वेळीच जरब बसविणे महाराजाना कसे शक्य झाले नाहीं, नागपूरकर भोसले, फत्तेसिंगबाबा, वगैरे सरदार स्वार्थलोलुप होऊन राजवटीची घडी बिघडवीत असल्याचें उघड उघड दिसत असताही महाराज त्याच्यासमोर कसे मूग गिळून स्वस्थ बसतात, ह्या सर्व गोष्टी माझ्याप्रमाणेंच आपणालाही संमत न होणाऱ्या व कोणाही विचारी कार्यकर्त्याला स्वतंत्रपणे विचार करावयाला लावून कार्यक्षम बनविणाऱ्या आहेत. हे महाराजाचे दोष ध्यानीं न घेता व वेळोवेळी त्याची अडचण टाळून मार्ग न काढता जेव्हा तेव्हा महाराजाची आज्ञा अगर इच्छा अक्षरशः प्रमाण मानून कारभार करू लागलो, तर कारभाराचे बारा वाजण्याला कितीसा उशीर? आणि असाच राजा बोले दळ हाले या मासल्याचा राज्यकारभार करावयाचा तर तेथे स्वतंत्र बुद्धीच्या व कर्तबगारीच्या राजकारणधुरंधराची आवश्यकताच काय? हा! एवढे मात्र खरे कीं आम्ही महाराजाचे म्हणजे राजवटीचे एकनिष्ठ व जबाबदार सेवक. आम्हीं आपपरभाव विसरून महाराजाची व राजवटीची सेवा केली पाहिजे. पण ती सेवा करताना आम्हीं आपली बुद्धिदेखील महाराजाच्या पायापाशीं गहाण टाकून भागेल काय? आणि महाराजानीं तरी एवढ्याचसाठीं आमच्यावर राजकाजाची ही एवढी मोठी जगड्व्याळ जबाबदारी टाकली आहे काय? तीं काम करण्याला केवळ सागकाम्या व शरिराप्रमाणेंच मनाने व बुद्धीनेही महाराजाच्या आणि त्याच्या प्रिय पात्राच्या ताटाखालींल माजरे बनून राहणाऱ्या जोहुकुमी माणसाचा

दुष्काळ थोडाच आहे? महाराजांच्या व माझ्या नात्याचें मर्म माझ्या अल्प बुद्धीला पटतें ते मी आपणाला एका वाक्यात सांगतों, परमादरणीय, परमवंदनीय अशा वडीलधाऱ्या माणसांविषयीं मनात निःसीम आपुलकी बाळगून खासगी व्यवहारात लेकराच्या भावनेनें त्यांच्याशीं वागणे निराळें, आणि सार्वजनिक जबाबदारीच्या कार्यांत ऐकावे जनाचे आणि करावें मनाचें याप्रमाणे सर्वांच्या हितोपदेशाचा समन्वय करून स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीला प्रमाण ठेवून वागणे निराळे."

सूर्योदय झाला व सूर्याचे कोंवळे किरण सरोवरातील कमलकलिकावर आपल्या प्रकाशाची पखरण घालू लागले म्हणजे त्या कळया जशा हळू हळू उमलू लागतात, तसे पेशव्यानीं आपल्या विद्वत्तापूर्ण व विवेचक वाणीनें प्रकाश पाडताच त्या प्रकाशात चिटणिसाचे मुखकमल देखील हळु हळू विकसन पावू लागलें ते हसतमुखाने पेशव्याना म्हणाले, " एवढ्याचसाठीं मीं माझी होती नव्हती पुण्याई आजवर महाराजापाशीं खर्च करून आपल्याविषयीं त्यांच्या मनात प्रेम, आदर व विश्वास उत्पन्न करीत आलो. माझ्या मनात आपणाविषयीं आजवर असणारा संदेह मीं आज स्पष्टपणें बोलून दाखविला, ही मला परमेश्वरानें सद्बुद्धीच दिली म्हणावयाची. त्यामुळें माझ्या अप्रबुद्धाच्या सर्व शंकाचें निरसन करण्याची संधी आपणाला मिळाली ."

" तरीपण आपली मुख्य शंका अजून तशीच अनिर्णित राहिली आहे—" असे म्हणून पेशवे चिटणिसाचे कोल्हापूरकराशीं केलेल्या करारावाबत शंकानिरसन करणार, तोंच पुरंदरे पुन्हा आत येऊन म्हणाले, " त्या दोन माणसाना तूर्त जावयाला सांगावयाचे का ?"

" कोणत्या दोन माणसाना ?" पेशव्यानीं विचारले.

" पिशाच्चाने पछाडलेल्या ?" चिटणिसानीं प्रश्न केला.

" होय." पुरंधरे उत्तरले, "त्यांची तक्रार वेळींच दूर झालेली बरी."

" पिशाच्चबाधा दूर करण्याचा एक मंत्र आम्हालाही माहीत आहे. त्या दोघाना आमच्यासमोर आणा तर खरें ! पाहू द्या." चिटणीस म्हणाले, पेशवे काहीं न बोलता हसऱ्या चेहऱ्याने त्यांच्याकडे पाहू लागले. अमळशानें म्हणाले, " आपण केव्हांपासून मांत्रिक झालात ?"

"ह्या पिशाचाचा सुळसुळाट सुरू झाल्यापासून. वाकड्या मेढीला वांकडी दर खणण्याखेरीज गत्यतर नसतें. चला आपण सदरेवरच जाऊ. हा तमाशा आत नको."

बोलत बोलत पेशवे व चिटणीस सदरेवर जाऊन पाहतात तो तेथें कोणी नाहीं !

"हें काय ? ते लोक कुठें गेले ?" चिटणिसांनीं विचारलें.

"ते म्हणाले कीं आपण कोठे आपल्या यातनाची वाच्यता केल्यास पिशाच्च आपणाला जिवे मारील, म्हणून भीतीनें ते निघून गेले." पुरदरे म्हणाले.

"असें काय ? मात्रिकाचें नाव ऐकूनच तीं पिशाच्चे पळालेलीं दिसतात. आताच्या आता शिपाई पाठवून त्या दोघानाही घेऊन या. त्या पिशाचांना मोकळे सोडणें उपयोगाचे नाहीं." चिटणिसांनीं कडव्या वृत्तीनें आज्ञा केली. पेशव्यानीं त्याच आज्ञेची पुनरावृत्ति केली. ताबडतोब शिपायी त्या दोघा हेराना पकडून आणण्यासाठीं रवाना झाले. सभोवारच्या सर्वांना चिंता पडली, हा प्रकार आहे तरी काय ?

## प्रकरण १४ वें

# राणी खवळली !

" पिशाच्चें देवगणाच्या माणसाला पाहून भिऊन पळतात असें म्हणतात. आपला देवगण आहे का ? " पेशव्यानीं चिटणिसाना हसत हसत पण आश्चर्यपूर्वक म्हटले.

नाहीं, माझा राक्षसगण आहे म्हणूनच तीं पिशाचे पळालीं " चिटणिसानी हसत हसत उत्तर दिले " हीं पिशाच्चें आपण म्हणता त्या मामुली वर्गातील नाहीत हीं देवाना वाकुल्या दाखवून त्याच्याशीं दगलबाजपणा करणारीं व राक्षसाना धार्जिणी असावी देवाच्या साऱ्या हालचाली चोरून ओळखून घेण्यासाठींच याची दानवाकडून आपणासारख्या देवमाणसाच्या पदरीं योजना झाली असावी. "

इतक्यात शिपायी त्या दोघा हेराना पकडून घेऊन आले. वास्तविक ते दोघेही आता बदीवान होते पण ते खाशाची आज्ञा मोडून आपल्याच्च मताने निघून गेले व माघारे काहीं केल्या येईनात, त्यावरून सभोवारच्या बहुतेक शिपाईप्याद्याना व दासदासींना वाटले कीं याच्या अगात पिशाच्च-सचार झाला असावा ते सर्वजण भिऊन दूरदूर उभे राहिले. त्या हेराना पकडण्याला गेलेले शिपायी जरी सशस्त्र होते, तरी त्याचीही तशीच कल्पना झाल्यामुळे त्या दोघाना कैद करण्याचे त्याच्या अगदीं जिवावर आलें होतें. पण करतात काय ! ते पडले हुकुमाचे बदे !

चिटणिसानी दुरूनच त्या दोघा हेराना येताना पाहिलें, त्याबरोबर त्यांच्या मुखावाटे उद्गार निघाले, " अरे गुलामानो ! "

" आपण त्या दोघाना ओळखलें ! " पेशव्यानीं विचारलें.

" हो ! चागलें ओळखलें. यांची पिशाच्चबाधा मी खात्रीनें दूर करू शकेन. तें साध्या पचाक्षऱ्याचें काम नव्हे. " चिटणीस उत्तरले.

" मग हे लोक दगलबाज आहेत काय ? "

" आता आपणाला सारें कळेलच " असे म्हणून चिटणिसानीं त्या दोन हेरापैकीं एकाला हाक मारली, " कसे काय चाफाजी ! पाठीवरच आसुडाचे कोरडे साफ बरे झाले वाटते ? "

चिटणिसाचे शब्द कानीं पडताच चाफाजीची चर्या एकदम काळी ठिक्कर पडली. पेशवे व सभोवारचे सर्व लोक त्या दोघाच्या चेहऱ्याकडे न्याहाळून पाहू लागले. परंतु चिटणिसाच्या म्हणण्याचा अर्थ पेशवे व पुरंधरे याखेरीज इतराच्या ध्यानीं आला नाहीं. त्याना वाटलें, पूर्वी कधी चाफाजीला पिशाच्च-बाधा झालेली व कोणा मांत्रिकाने आसुडाच्या फटक्याखालीं त्याची पाठ फोडून ती बाधा दूर केलेली असावी पुरंदरे व पेशवे मात्र ओळखून चुकले कीं चाफाजीचा दगलबाज स्वभाव चिटणिसाच्या पूर्ण परिचयाचा असावा एरव्हीं त्यानीं त्याला नेमका प्रश्न विचारला नाही.

" आणि नाऱ्या, तू रे त्या पिशाच्चाला कुठे भेटलास ? शेजाऱ्या पाजाऱ्याच्या घरात चोऱ्या करण्याची सोय उरली नाहीं आणि शेजारच्या बायकांचीं पायतणें खाऊन खाऊन गाल सुजले, म्हणून हा नवा रोजगार पत्करलास होय ? "

चिटणिसानीं नारोजीलाही ओळखलें, तेव्हा शिपायी व इतर लोक आपसात कुजबुजू लागले, "हाही गडी चिटणीस सरकाराचा वाहिमी दिसतो."

तोंच चाफाजी व नारोजी ह्या दोघानीं उन्मत्तासारख्या अशा किंचाळ्या फोडल्या कीं त्या ऐकून सर्व मंडळीच्या कानाना दादरे बसले. सर्वांना वाटले कीं या दोघाच्याही अंगीं भुताचा संचार झाला. पेशवेसुद्धा एकाएकी चकित झाल्यासारखे झाले.

पण चिटणीस मात्र मुळींच डगमगले नाहींत. ते नारोजी व चाफाजी याचा थैथयाट पाहून बेफिकीरपणे हसून म्हणाले, " हें पिशाच्च आज फारच पिसाळलेलें दिसतें. एकाच वेळी एकाच स्थळीं दोन माणसानादेखील ते घेरू शकले, यावरून तें सामान्य भूत नाहीं हे तर उग्रडच आहे " त्यानी सभोवार-च्या शिपायाना सांगितले, " पहाता काय ? चांगलीं मजबूत दोरखडे घेऊन त्यानीं ह्या दोघानाही समोरच्या आंब्याच्या झाडाना बांधून घाला. मुळींच गय करू नका. "

शिपायांनीं तसें केलें. लगेच चिटणिसांनीं कातडी वादीचा आसुड हातीं घेतला, व " मी आता याचीं भुतें उतरतो पाहा तर खरीं !" असें म्हणून प्रथम चाफाजीची पाठ चाबकाखालीं फोडून काढण्याला सुरुवात केली. चांगले पांच पंचवीस आसुड फाडफाड खाल्ल्यावर चाफाजी शुद्धीवर आला, व दोन्ही हात जोडून चिटणिसापाशीं जीवदान मागूं लागला.

" तुझें भूत उतरलें ? " चिटणिसांनीं आणखी एक कोरडा चाफाजीच्या पाठीवर उडवून विचारलें.

" उतरलें ! "

" तर ! तें उतरायचेंच ! आसुड तसाच मंतरलेला आहे. " असें म्हणत चिटणीस नारोजीकडे वळतात, तोंच तो आपण होऊनच शुद्धीवर आल्यासारखें बोलूं लागला.

" चाफाजीच्या पाठीच्या चामड्या लोळूं लागलेल्या पाहून तुझ्या मानगुटीला बसलेलें भूत शहाणपणानें पळून गेलें असावें. ठीक आहे. आता एकेकाला विचारतों तें नीट सांगा. " असें म्हणून त्यांनीं चाफाजीकडे वळून त्याला प्रश्न केला, " यमाजी मुतालिकाकडून तुला दरमहा किती तनखा ठरला आहे ? "

चाफाजी निरुत्तर होऊन पायाकडे पाहूं लागला. पेशव्यांनीं तो प्रश्न ऐकून विस्मयपूर्वक मान तुकविली. सभोंवारची इतर मंडळी आ वासून एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागली. जो तो मनांत म्हणूं लागला व क्वचित् शेजाऱ्याच्या कानांत कुजबुजूं लागला, " चिटणीस सरकारांना इतकी बित्तबातमी मिळाली तरी कुठून ? "

चिटणिसांनीं चाफाजीच्या उत्तराची कांहीं क्षण वाट पाहून लगेच फडाडकन् आणखी एक आसुडाचा कोरडा त्याच्या पाठीवर ओढला. मार खाऊन रक्ताळलेल्या पाठीवर पडलेल्या त्या नव्या घावानें चाफाजी गुरासारखा किंचाळून दोन्ही हात जोडून उद्गारला, " सांगतों, सांगतों. सर्व कांहीं सांगतों. पण सरकारांनीं मला कृपा करून जीवदान द्यावें. "

" सांग तर. तू मुतालिकाच्या तर्फेनें हेर म्हणून श्रीमंताकडे नोकरीच्या मिषानें राहिला आहेस ना ? " चिटणिसांनी प्रश्न केला. त्यावेळीं चिटणिसांची मुद्रा कोपानें भडकलेल्या अग्नीसारखी धगधगत होती. त्याच्या डोळ्यांला

डोळा भिडविण्याचीही कोणाची छाती होत नव्हती. पेशव्यानीं त्याना इतके संतापताना आज प्रथमच पाहिलें होतें.

"सरकार! मी पडलों हुकुमाचा नोकर! जसा धन्याचा हुकूम होईल तसें करणें मला भाग!" चाफाजी विव्हळत उद्गारला.

"पण असल्याच हलकटपणाच्या कामगिरीवर तू मोतद्दाराच्या मिषानें माझ्या पदरीं होतास, व तुझें कपट उघडकीला येऊन मीं तुला घोड्याच्या चौखुरीला बाधून ठार करण्याची शिक्षा दिली होती, तेव्हा तू आईबापाची व तेहतीस कोटि देवाची शपथ घेऊन पुन्हा असल्या फदात न पडण्याचें कबूल करून जीवदान मागून घेतले होतेंस, तें तुला आठवतें का?"

"काय, हा या हेरगिरीच्या कामगिरीवर पूर्वी आपल्याही पदरीं होता?" पेशव्यानीं विस्मयाने चिटणिसाना प्रश्न केला.

"आता तो काय सागतो तेंच आपण ऐका म्हणजे झाले."

"पुन्हा मी असल्या भानगडीत पडणार नाहीं. माझ्यावर दया करा." असें म्हणत चाफाजीने पुन्हा हात जोडले.

"दया? दया तुझ्यासारख्या नीच दगलबाजावर नाहीं करावयाची तर कोणावर करावयाची? हे तुझे दयासागर धनी श्रीमत इथें आहेत, हे तुझ्यावर दयाच करतील." लगेच चिटणीस नारोजीकडे वळून म्हणाले, "काय रे ए! कोणती जहागीर ह्या हरामखोरीच्या कामाबद्दल यमाजीपतानीं तुला द्यावयाची कबूल केली आहे?"

"म्हणजे? हा देखील मुतालिकाचाच गुप्त हेर? आता मात्र कमाल झाली! मी तर ह्या दोघानाही अगदीं साळसूद व निःसीम स्वामिभक्त समजत होतों."

"याच्याही तोंडून याच्या पापाचा पाढा, श्रीमत! आपणाला ऐकावयाचा आहे काय?" लगेच चिटणिसानीं त्या दोघाकडे वळून दरडावून हातातील आसुडाचा एक फटकारा हवेत उडवून विचारले, "श्रीमताच्या हालचाली थोरल्या आईसाहेबानाही रोज पुरविता कीं नाहीं?"

"असेंही आणखी आहे काय? ठीक आहे." पेशवे संतापून उद्गारले.

ते दोघेही काहींच बोलेनात. पायाकडे नजर लावून उभे होते.

"आणि श्रीमताच्या जिवावर घाला कधीं घालायचा ठरला आहे?" चिटणिसानीं त्या दोघाना विचारले.

"बस्स! पुरे झाली चौकशी. आता या दोघांच्या हातात एकच हात-कडी घालून यांचे सातपाट काढून गाढवावरून साऱ्या नगरभर यांची धिंड काढा, आणि त्यांना भर मोतीचौकात हत्तीच्या पायाशीं बांधून ठार करा." पेशवे शिक्षा बोलून गेले.

"मायबाप सरकार! आमच्यावर एकवार–फक्त एकचवार दया करा." ते दोघेही पुन्हा कायम ठशाची विवनणी करू लागले. त्यांना दुसरें काहीं बोलावयाला तोंडच कुठें होते? त्यांच्या त्या विनवणीचा पेशवे अथवा चिटणिस यांच्या मनावर यत्किंचित् परिणाम झाला नाहीं. पुरंधरे उलट अधिक त्वेषाने म्हणाले, "श्रीमंत! काळसर्प आहेत हे, हें ध्यानीं ठेवा. भूतदया हा सद्‌गुण खरा, पण अपात्रीं भूतदया दाखविल्याने आम्हीच आमच्या नाशाला कारण होऊ."

"पाहता काय? आताच्या आता यांच्या हातात बेड्या ठोकून यांच्या तोंडाला काळें फासून व सातपाट काढून गाढवावरून यांची धिंड काढा; आणि दवंडी पिटून यांचा अपराध साऱ्या नगराला जाहीर करा. साऱ्या नगरभर यांची धिंड निघाल्यावर यांना सायंकाळीं मोतीचौकात हत्तीच्या पायाशीं देऊन ठार करा." पेशव्यांनीं पुन्हा निक्षून आज्ञा केली.

शिपायी त्या दोघांच्याही हातात बेड्या ठोकून त्यांना समोरून घेऊन निघून जाईतो पेशवे, चिटणीस व पुरंधरे तेथेच सदरेवर उभे होते.

"एथवर मुतालिकांच्या खुनशीपणाची मजल जाईल असें मला मुळींच वाटलें नव्हते आणि थोरल्या आईसाहेबही मला ठार करण्याच्या कारस्थानात सामील आहेत, हे ऐकणाऱ्या माझ्याच कानावर अजून माझाही विश्वास बसत नाही" पेशवे चिटणिसांना हाताशी धरून वाड्यासभोंवारच्या उद्यानांत जाता जाता म्हणाले, "कशा झाल्या तरी त्या महाराजांच्या राणीसाहेब आहेत, व मी महाराजांना माझ्या पितृस्थानीं मानतों त्याप्रमाणेंच त्यांनाही मातेच्या स्थानीं मानीत आलों——"

"पण ती सावत्रमाता निघाली! ती मुलाच्या नरडीला नख देण्यासाठीं न घडपडेल तर काय करील! मला वाटतें श्रीमंत! आपण ह्या गोष्टी महाराजांपाशीं उघड उघड बोलून दाखविण्याची हीच वेळ आहे. महा-राजांना वेळीच हा इषारा मिळाला नाहीं, तर ते ह्या आगलाव्या राणीच्या

नादाने दत्तक प्रकरणीं स्वतः फसून आम्हालाही तोंडघशीं पाडण्याचा फार संभव आहे. "

" तें काम मात्र माझ्या वस्तु मुळींच होणार नाहीं. आई आपल्या आईपणाला विसरून कृत्या बनली, तरी मुलानें आपला अपत्यधर्म कधींही सोडता कामा नये. त्याचें कर्म त्याच्यापाशीं. पण आज मी जर त्याच्याशीं असल्या वय्यक्तिक बाबतींत विरोध दाखवीन, तर उद्या माझीं मुले लेंकरेंही तोच कित्ता गिरवितील, आणि साराच गोंधळ उडेल. त्यातूनही त्या आमच्या सार्वजनिक कार्यांत जर उघड उघड बिब्बा घालू लागल्या, तर मग पाहता येईल. त्यापेक्षा मला एक उपाय मात्र सुचतो थोरल्या मासाहेबांपाशीं आपण आपलें गाऱ्हाणें नेल्यास त्या महाराजाना जरूर तो उपदेश करू शकतील व परस्पर काट्याने काटा या कानाचे त्या कानाला न कळता निघेल. चालू वाटाघाटींतही आपणाला त्याचे साह्य पाहिजेच आहे, तेही त्या खुल्या दिलाने देतील. "

" अवश्य देतील. सध्या तरी त्याची वृत्ति राजवटीवर प्रसन्न आहे खरी. असा त्याच्या मताचा वारा अनुकूल वाहत असल्यानें आपल्या कार्याची नौका कमी प्रयासानी यशाच्या किनाऱ्याला लागू शकेल. बरें आपल्या हेरांत आजच्या या दोन दगलबाजासारखे आणखी कोणी नाहींत ना ? बाकी, जो प्रश्न आपणाला मी करीन आहें, तोच मीं स्वतः माझ्या सभोंवारच्या माणसा विषयीं केला पाहिजे. कारण मला यापूर्वीच ठेच लागून चुकली आहे. "

" मी आजचा प्रकार पाहून इतका बुचकळ्यात पडलो आहें कीं मीच मला तर फसवीत नाहीं ना, असाही संदेह माझ्या मनात एखाद वेळीं उत्पन्न होऊं शकेल. हे दोन लोक माझ्या अत्यंत विश्वासू व हुषार हेरांपैकीं होते... "

" ते हुषार तर आहेतच. एरव्हीं उडत्या पाखराचीं पिसें मोजणाऱ्या आपणासारख्यांच्या डोळ्यांत ते धूळ कशी फेंकू शकले असते ? "

" आता माझ्यामागे आणखी एक नवा उद्योग लागला. त्या हराम-खोरांनीं मला इतके दिवस वेळोवेळीं ज्या बित्तबातम्या म्हणून येऊन सांगितल्या त्या नीट पारखून पडताळून पाहिल्या पाहिजेत. "

कोणत्या बित्तंबातम्या त्यांनीं सांगितल्या, असें पेशव्यांना विचारण्यासाठीं शब्द चिटणिसांच्या अगदीं ओंठावर आले होते. पण त्यांनीं जीभ आवरली.

पेशव्यापेक्षा ते वयानें वडील असले तरी इतकें स्वातंत्र्य पेशव्यापाशीं घेण्याचें धैर्य त्याना होईना.

"खरे पण आपणाला ह्या दोघाच्या चाळ्याची बित्तबातमी कशी मिळाली?" पेशव्यानीं पृच्छा केली.

"पिशाचसाधन मला झाले आहे असें मीं आपणाला सांगितलें ना, त्या प्रतापरावाच्या पिशाचानें हें सर्व गूढ कारस्थान मला सांगितलें. पहिल्याच दिवशीं मला त्या पिशाचाकडून कळलें कीं प्रतापरावाचा खून करण्याच्या बाबतींत हे दोघे गमाजीचे हस्तक होते. पण तेव्हा माझा त्या पिशाचवाणी-वर तितकासा भरवसा नसल्याने मीं तें मनावर घेतले नाहीं. पण पुढें जस-जसे पडताळे पटत चालले, तसतसा मी सावध होऊं लागलों. आपणही आपल्या जिवावरील अरिष्ट एवढ्यानें टळलें असें समजू नका. मला माझा नोकर तुळाजी याच्याकडून गेल्या सात आठ दिवसांपासून कळत होतें कीं आपल्या जिवावर घाला घालण्याचें कृष्णकारस्थान कुठें तरी शिजत आहे."

"मग त्याच्याकडून पुरा छडा आपण लावून घेतला नाहीं का?"

"मीं त्याला नीट चौकशी करण्याला सांगितले आहे. पण आज तो आजारी आहे. उद्या भेटल्यावर त्याला विचारून घईन."

इतके त्या दोघाचे संभाषण होत आहे, तोच पुरंधरे आत येऊन म्हणाले, "खासेराव श्रीमंताची भेट घेऊं इच्छितात."

"श्रीमंतानीं आता पुन्हा बुद्धिबळाचा पट माडून तयार व्हावें." चिटणीस हंसून म्हणाले.

"पट माडून तयार आहे. श्रीच्या कृपेनें कोणींही मनात डाव जिंकण्या-चा बेत करून यावे व डाव हरून अथवा कुजवून परत जावें. एकेक पात्र रंगभूमीवर येत आहे व जात आहे. ह्या नाटकाचा शेवट आनंदपर्यवसायी होतो कीं शोकपर्यवसायी, तेंच आता पाहणें आहे"

"बरें आहे, आम्ही आता आपली रजा घेतो. उगाच खासेरावाना संशय यावयाला नको" असें म्हणून चिटणीस जाण्यासाठीं उठले.

"आपण असला तरी काही हरकत नाहीं." पेशवे म्हणाले.

"हरकत आपली नसली तर खासेरावाची जरूर असेल. मी असताना ते आपणाशीं अंतःकरण उघडे करून बोलू शकणार नाहींत."

"तेंही खरें आहे. आम्हीच ते विश्वरूपदर्शन करून घेतों, मग आपण त्याविषयीं बोलूच "

याप्रमाणें बैठकीचा समारोप करून चिटणिस घरीं जाण्यासाठी वाड्या-बाहेर पडतात, तोंच एक घोडेस्वार दौडत आला तो त्याच्यापाशी येऊन उभा राहिला. चिटणिसानीं ओळखले, तो प्रतिनिधीच्या तैनातीतील नोकर होता. त्यानें चिटणिसाना नम्रतापूर्वक अभिवादन करून प्रतिनिधींचा संदेश निवेदन केला, "सरकारानी आपणाला तातडीनें भेटीला बोलाविले आहे "

"पंतापाशीं आणखी कोण कोण आहेत?"

"मुतालिक, सुमंत, राजाज्ञा, सुमंताचे व्याही, वगैरे बरीच खाशी मंडळी आहेत." स्वार उत्तरला.

"ठीक आहे. आम्ही आलोच असे पंताना सांग."

स्वार पुन्हा अभिवादन करून निघून गेला चिटणीसही जाता जाता आपल्या मनाशीं म्हणाले, "इकडे राजकारण, तिकडे राजकारण, एकूण आजचा खडाष्टकाचा मुहूर्त दिसतो."

## प्रकरण १५ वें

# रंगमहालांतील बेरंग

तो दिवस पेशवे आणि चिटणीस ह्या दोघानाही खडाष्टकासारखाच गेला. चिटणीस प्रतिनिधींच्या घरीं गेले तिथेही खडाष्टक, व इकडे खासेराव पेशव्याकडे आले तरी तेथेंही खडाष्टकच! सारा दिवस काथ्याकूट करून त्यानीं मिळविलें काय, तर तीव्र मतभेद आणि बेबनाव! समुद्रमथन कर कर केले, आणि त्यातून हलाहल निर्माण झाले

चिटणिसाना प्रतिनिधींनीं मुद्दाम बोलावून नेलें होते, ते त्याना भुरळ पाडून मथवण्यासाठीं. जाण्यापूर्वींच चिटणिसाना त्याची कल्पना नव्हती असें नाहीं पण काहीं काही सकटे अशीं निर्माण होतात कीं, तीं सोसताही येत नाहींत व टाळताही येत नाहींत. धरलें तर चावते आणि सोडलें तर शापतें अशी त्या फेऱ्यात सापडलेल्या माणसाची मग अवस्था होते. प्रतिनिधींच्या बोलावण्याचा मान न करणें म्हणजे चिटणिसानीं आपल्या हातानें अपेशाचे खापर आपल्या माथीं फोडून घेण्यासारखें होतें. म्हणूनच त्यानीं प्राप्त प्रसगाला धिमेपणाने तोंड देण्याचे ठरविलें होतें

चिटणीस पनाच्या गोटात जाऊन पाहतात तों तिथे बैठकखान्यात बैठकीवर मध्यभागीं प्रतिनिधि बसले होते. शक्रासभोवार जसा भुताचा भेळा असावा तसे त्याचे मुतालिक यमाजी शिवदेव, त्याचा मुलगा गमाजी, व आणखी काहीं खास गुलदस्तातील गण त्याच्या डाव्या हाताला बसले होते, तर उजव्या हाताला सुमत, सुमताचे व्याही देवगाव मेघश्याम, भगवतराव अमात्य व आणखीही काहीं मातबर लोक बसले होते चिटणीस बैठकखान्यात पाऊल टाकताक्षणीं तो दरबारी देखावा पाहून स्वतःच्या मनाशीं म्हणाले, " पेशव्याना पेशवेपदावरून हुसकून लावून दत्तक राजपुत्राच्या,

नावावर सर्व राज्यकारभार एकतंत्रीपणानें चालविण्याच्या नाटकाची ही रंगी तालीम दिसते आहे !"

आणि त्या नाटकाची नादी प्रतिनिधींनीं चिटणिसाना पाहतांच सुरू केली तीही भयसूचकच. चिटणिसांनीं आंत पाऊल टाकताच नमस्कार केला तो स्वीकारून त्याना आपल्या उजव्या बाजूच्या लोडगादीशीं बसण्यासाठीं अंगुलिनिर्देश करून प्रतिनिधि एकदम टोमणेवजा भावेन म्हणाले, "बाबा ! एवढ्या सकाळींच श्रीमंत पेशव्याकडे जाऊन कसलीं खलबतें चाललीं होतीं ? मराठशाहीची पेशवाई तर तुम्हीं बनवून सोडलीतच, ती आता आपल्या मुठींत आणण्याचा व्यूह कुठवर सिद्धीला गेला ? आजकाल आपणाला देवदर्शनदेखील सुचत नाहींसे दिसतें ! देव, धर्म, परमेश्वर, सत्र कांहीं आजकाल आपणाला पेशवे आहेत. खरें ना ?"

चिटणीस मनाचे जरी उदार व गोड्या स्वभावाचे आणि गोड वाणीचे होते, तरी प्रसंगीं ते लेखणीप्रमाणेच वाणीचेही तितकेच तिखट होते. प्रतिनिधींनीं कुत्सितपणें हाणलेला टोमणा त्याच्या मनाला झोंबला. तो त्यांनीं दुप्पट वेगानें माघारा परतविला, "तसेंच नाहीं कांहीं. पण असे पाहा राव, आम्ही बोलून चालून माणसें. देवाच्या कृपेखेरीज आम्हाला दुसरी सावली नाहीं, व भाविकपणाही आम्हाला सोडता येत नाहीं. त्यातल्यात्यात मग सारासार विचार एवढाच करावा लागतो कीं भजावयाचेच तर खऱ्या देवाला तरी भजावें ! शेंदूर फासून म्हसोबा बनविलेल्या नुसत्या माळावरच्या दगडधोंड्याना भजून काय मिळावयाचें आहे ?" कुंद हवेत बसलेल्या माणसांचा कोंडमारा व्हावा तशी त्या बैठकींतील सर्व मंडळीची अवस्था चिटणिसांचे खोंचदार उद्गार ऐकून झाली. पण एवढ्यावर तरी थोडेंच भागणार होतें ! चिटणिसांनीं आपल्या शाब्दिक गोफणगुंड्याची दुसरी फैरही लगेच झाडली, "तसेंच आपण आता म्हणाला त्याप्रमाणें मराठशाहीची ही पेशवाई बनली कीं काय झालें, हा प्रश्न सोडविणें माझ्या आवाक्याबाहेरचें आहे. असले निव्वळ बनवाबनवीचे डाव खेळावयाला मी पहिल्या दर्जाचा मुत्सद्दी थोडाच आहें ! रात्रंदिवस एकत्र बसून अमल्या वाटाघाटी व पात्र्यावर पवित्रे ठोकण्याचें काम राजकारणात मुरलेल्या, महाराज आणि महाराणी ह्या दोघांच्याही तळहातावरचा फोड बनून राहिलेल्या बुद्धकातल्या बुद्रुकाचें

आहे आता, आपण जें मराठशाही मुठींत आणण्याविषयीं बोलला, त्या बद्दल मात्र माझें अप्रबुद्धाचें मत व धोरण असे आहे कीं राजवटीवर नुस्या बायकी स्वभावाने मुठीं आवळीत बसण्यापेक्षा ज्याच्या मनगटात जोर असल त्याने राजवट मुठींत आणण्याचा प्रयत्न केला तर तो अगदींच काहीं वावगा नाहीं. चुलीसमोर बोटे मोडीत बसणाऱ्या विधवेपेक्षा मी म्हणेन तें खरें ह्या भावनेने वागणारा दाडगेश्वर मला जास्त रुचतो अहो, कुशल माणूस भेटला तर तो त्या दाडगेश्वराचाही उपयोग करून घेऊ शकेल ! ”

चिटणिसाच्या वाणीचा हा मुका मार सभस्थानीं असलेल्या एकूण एक मंडळीला चांगलाच वर्मी झोंबला, हे त्यांच्या गोऱ्यामोऱ्या चेहऱ्यावरून ढळढळीत दिसत होते पण चिटणीस तरी वृत्तीचे किती निष्ठुर ! त्याना त्या मंडळीच्या काळवडून कोमेजलेल्या चेहऱ्याचीही काहीं कींव आली नाहीं. त्यानीं शाब्दिक गोफणगुंड्याची तिसरी फैर झाडली, “ असल्या भाकड-कथा बोलून कधीं संपावयाच्या नाहींत मी तरी मांजराच्या गळयांत घाट बांधण्याच्या वाटाघाटी करण्याच्या उद्देशाने ह्या सभेत आलों आहे तेव्हा मांजराचा आवाज कानीं येण्यापूर्वी जितका लौकर सभेचा निर्णय ठरेल तितका चांगला. ”

प्रतिनिधि व तेथे उपस्थित असलेले इतर सभासद टकमका एकेमकाच्य तोंडाकडे पाहू लागले पण त्या प्रत्येकाच्या पाहण्यात निरनिराळे भाव व्यक्त होत होते प्रतिनिधि, यमाजी शिवदेव व गमाजी याच्या पाहण्यात बावनकशी रंगेलपणा ओतप्रोत भरला होता. राजाज्ञा व देवजी मेघःश्याम याच्या चर्या कोणींतरी ओरबडून रक्तबबाळ केल्याचा भास होत होता. सुमताच्या चर्येवर किंचित् समाधानाची झाक मारत होती. आणि अमात्याच्या चर्येवर प्रभातकालातील दहिंवराप्रमाणे कुतूहलाचे तुषार दिसून येत होते.

“ वा ! आपल्याकडून मिळणारी ठेप वळय लावून घेण्यासाठीं आम्ही आपणाला इथे बोलावलें नाहीं ” प्रतिनिधि मानखंडित होऊन डोळे वटारल्यासारखे करून उद्गारले

चिटणिसानीं बाह्यात्कारी शांतपणाने दोन्ही हात जोडून विचारले, तर मग नुसत्या कोपरखळया खाण्यासाठीं मला बोलावलें असल्यास हा आपला सेवक दोन हस्त व तिसरें मस्तक जोडून आपणासमोर हजर आहे ! ”

" आपलें मन आजकाल आमच्याविषयीं कलुषित झालें आहे हें आम्ही जाणतो तो गैरसमज दूर करण्यासाठींच आम्हीं आज मुद्दाम तुम्हाला बोलावलें. आमची आपणापाशीं आता प्रार्थना एवढीच आहे कीं, आम्हीं एकनिष्ठेनें छत्रपतींच्या गादीची सेवा करण्याचा जो निर्धार केला आहे, त्या सेवेंत गादीचे वंशपरंपरागत सेवक या नात्यानें आपणही आपला वाटा उचलला पाहिजे, व पेशव्यानाही अनुकूल करून घेतलें पाहिजे " प्रतिनिधि जरा खालच्या स्वरात म्हणाले

चिटणिसानीं पूर्ववत् शांतपणें उत्तर दिलें, " मी माझ्यापुरतें काय तें बोलू शकेन. पण सूर्याची आग पंचपात्रीभर थंड पाण्यानें विझवणें माझ्या आवाक्याबाहेरचें आहे. "

" हें आपले उत्तर मनमोकळेपणाचे नाहीं " देवजी मेघ:श्याम मध्येच म्हणाले, " श्रीमंत नानासाहेबाना पेशवेपद मिळण्याच्या वेळेपासून आम्ही पाहतों आहों कीं हरएक बाबतींत आपली छाप त्याच्यावर पडते, व ते आपल्या तंत्राने वागतात आपण त्याचे एक जबरे आधारस्तंभ आहात, व तेही तसे मानतात "

" झाकली मूठ सव्वा लाखाची. " चिटणीस मोजक्या शब्दात उत्तरले.

" बरें, मुधोजीराव भोसल्याना दत्तक घेण्याच्या बाबतींत तरी आपली आम्हाला पूर्ण सहानुभूति आहे ना ? " प्रतिनिधींनीं विचारलें.

" ही बाब सर्वस्वी महाराज व थोरल्या आईसाहेब याच्या विचारातील असल्यानें तेथें माझ्यासारख्या सेवकाच्या मताला काहींच मोल नाहीं. मी फक्त महाराजाच्या आज्ञेचा पायिक आहे "

" महाराज थोरल्या आईसाहेबाच्या शब्दाबाहेर कधींच वागणार नाहींत, हें निश्चित समजा. पेशव्याचा मात्र विरोध होण्याचा संभव उघड उघड दिसतो आहे."

" पण पेशवे काहीं महाराजापेक्षा थोर नाहींत त्याना महाराजाची सेवा करावयाची ती त्याच्या तंत्रानेच केली पाहिजे, आणि पेशवेही त्यात अंतर, करतील असें मला वाटत नाहीं "

" तें काय होते तें पुढें दिसेलच. पण एवढें आपण सर्वांनीं ध्यानीं ठेवावयाचें कीं, एक म्हातारी जेवली नाहीं म्हणून काहीं अन्नछत्र वाया जात

नाहीं पेशव्यांखेरीज बहुतेक कारभारी मंडळींचें या बाबतींत एकमत आहे, हे ध्यानी घेऊन तरी आपण आपला कोंबडा झाकू नये, एवढेंच शेवटचें सांगणे–"

"ठीक आहे मी सर्व परिस्थितीचा विचार करून ईश्वर जशी सद्-सद्विवेक बुद्धि देईल तसें करीन." असं म्हणून चिटणिसांनीं सर्वांचा निरोप घेतला.

चिटणीस निघून गेल्यावर अमात्य व सुमंत जाईतो झाल्या प्रकाराविषयीं चिटणिसाविरुद्ध खल जरा तोंड राखूनच चालला होता. पण ते दोघे जाताच बाकीच्या सर्वांनी चिटणीस व पेशवे याना इतके अद्वातद्वा बोलून घेतलें कीं ज्याचें नाव ते. यमाजी तर आवेशाने असेही बोलून गेला, "आपल्या वाटेतला हा काटा आपणाला गोडीनं दूर करता यावयाचा नाहीं, तो जागच्या जागीं चेचूनच नाहींसा केला पाहिजे"

रंगलेल्या बैठकींत तक्तपोशीतून साप पडल्यावर जसें होईल, तशी कालवा-कालव यमाजीच्या उद्गारांनीं सर्वांच्या मनात तेव्हा सुरू झाली. कोणींही त्याला एका अक्षरानेही विरोध दर्शविला नाहीं, किंवा मुक्तकंठाने संमतिही दिली नाहीं

तिकडे पंताच्या गोटातील बैठकीचा जसा नक्षा उतरला गेला, आणि पेशव्याच्या वाड्यात पेशवे व खासेराव याच्याही बैठकीचा परिणाम काहींसा तसाच झाला. तथापि त्या दोघातील चर्चा युक्तिवादाच्या स्वरूपाची असल्यानें त्या बैठकीला पंताच्या गोटातील बैठकीप्रमाणें बकाली स्वरूप मात्र प्राप्त झाले नाहीं. खासेराव जे पेशव्यापाशीं आले होते, ते आठ वर्षांपूर्वी पेशव्यानीं कोल्हापूरकर संभाजीराजाशीं केलेल्या गुप्त तहावर भर देऊन वाटाघाटी करण्यासाठीं त्याच्या प्रतिपादनाचा आशय असा कीं कोल्हापूर व सातारा ह्या दोन्ही गाद्या शाहू महाराजाच्या पश्चात् एक व्हाव्या. यासाठीं शाहू महाराजाच्या हयातीपावेतों पेशव्यानीं दत्तकाचा प्रश्न तसाच भिजत ठेवावा, व पश्चात् दोन्ही राज्यें एक करून कोल्हापूरची गादी मुकर करून दत्तक घ्यावयाचा तो संभाजीराजाच्या मांडीवर द्यावा.

पेशव्यानीं साताराची गादी रसातळाला नेऊन कोल्हापूरचें साम्राज्यवैभव वाढविण्याचा व 'तुम्ही आम्ही एक व कठाळीला मेख' या मासल्याचा

कोल्हापूरकराचा डाव अगोदरपासूनच ओळखला असल्यानें त्यांनीं खासेरावाशीं फारसा वादविवाद केलाच नाहीं, व चिटणिसांनीं प्रतिनिधींसमोर स्वीकारलेलें धोरण स्वीकारून मोजक्या साखरघोळ शद्बांनीं त्याची बोळवण केली, "हा प्रश्न सर्वस्वी महाराज व थोरल्या आईसाहेब याच्या मर्जीचा आहे. मी या बाबतींत काहीं बोलू अथवा करू शकत नाहीं महाराजाच्या पश्चात् दोन्ही राज्याच्या एकीचा प्रश्न आपणाला सोडवता येईलच त्याविषयीं आजच वाटाघाटी करून निष्कारण बभ्रा करून काय करावयाचे आहे ? "

" पण एकीच्या दृष्टीनें सर्व कारभार सभाजी महाराजावर सोपवून स्वतः जबाबदारींतून मुक्त होण्याची सल्ला तुम्हीं महाराजाना का देत नाही ? "

" महाराजाना ती माझी सल्ला कृतघ्नपणाची वाटेल त्याचा माझ्या वरील विश्वास अजिबात उडेल, व आमच्या तहनाम्याला कोऱ्या चिटोऱ्या इतकेंही महत्त्व उरणार नाहीं "

" समजा, आम्हीं याच वेळीं साताऱ्यावर स्वारी केली, तर तुम्ही आम्हाला साह्य करू शकाल कीं नाहीं ? "

" नाहीं इहलोकीं दुर्लौकिक व परलोकीं नरकवास याचे साधन मी कधींच करू शकणार नाहीं. "

" राजकारणात असल्या तात्त्विक पापपुण्याचा विचार करावयाचा नसतो. जो जिंकील त्याचें सत्य, त्याचा धर्म व त्याची नीति. "

" पण जिकल्यानतरच्या त्या गोष्टी आहेत. तुम्हाला वाटते इतकी ही राजवट दुबळी अथवा किडलेली नाहीं, कीं कोल्हापूरकरानीं स्वारी केली व पेशवे त्याना सामील झाले म्हणून तिचे कर्ते लोक हार खातील. म्हणून म्हणतों, असा अविचार करण्यात अर्थ नाहीं. "

" तुम्हाला सयुक्त मराठी साम्राज्याचे मुख्य पेशवे करण्यात यावयाचें आहे, ह्य जबर फायद्यावर तुम्ही अशा अकर्तेपणाने पाणी सोडणार काय ? "

" मीं कोल्हापूरकराना भलत्याच भरीला पाडून स्वतःच्या हितसर्वस्वाचा नाश करून घेण्याला प्रवृत्त करावे असे तुम्हाला वाटतें काय ? सयुक्त मराठी साम्राज्याचा पेशवा मीं होण्याची गोष्ट दूर राहिली, पण या झगड्यात कोल्हापूरकराचा पराजय होऊन खडे खावे लागले तर त्याला जबाबदार कोण ? "

इतक्या सभाषणावरून खासेरावानीं अदाज केला कीं पेशवे काही कच्च्या गुरूचे चेले नाहींत. शिवाय सकवारबाईचा पक्ष बराच जोरावत असून ती पेशव्यानाही म्हटल्या घटकेला चांगलाच शह दऊ शकेल व स्वतःच्या माडी वर दत्तक घेऊन राजमाता म्हणून मिरविण्याची तिची दुराराध्य महत्त्वाकाक्षा असल्यानें ती कोल्हापूर व सातारा हीं दोन राज्ये कधींच एकत्र होऊ देणार नाहीं, हेंही खासे राव पाहत होते आता अशा स्थितींत अखेरचा उपाय म्हणजे ताराबाई वश झाली तर पाहणे, तेवढा उपाय करून पाहण्याचें आपल्या मनाशीं ठरवून खासेराव पेशव्याचा निरोप घेऊन चालते झाले.

नत स्नानसध्या वगैरे आटोपून पेशवे भोजनासाठीं पाटावर बसतात न बसतात तोंच नारोजी व चाफाजी याच्या शिक्षेची अमलबजावणी करण्यासाठीं गेलेल्या शिपायापैकीं एकजण घाबऱ्याघुबऱ्या येऊन म्हणाला, "सरकार! रामाजीने वीस शिपायानिशीं येऊन आम्हाला भर रस्त्यात अडथळा चालावेल आहे. 'दोन्ही कैद्याना ताब्यात द्या, नाहींपेक्षा ठार व्हाल' अशी धमकी घालून तो बसला आहे"

लगेच पेशवे वाढल्या पानावरून तसेच उठले, व घाईघाईने कपडे करून पालखीतून निवडक सशस्त्र शिपायासह तिकडे निघाले.

आता काय होते व काय नाहीं ह्या भीतीनें वाड्यातील सर्व लोकाचें धाबें दणाणून गेलें.

## प्रकरण १९ वे

# महाराजांना नजरकैद

गुरुवारच्या हौदापाशीं गमाजीने पेशव्याच्या शिपायाना अडविले होतें. सभोवार लोकाची गर्दी भी म्हणत होती चाफाजी व नारोजी हे पेशव्याचे कैदी असतानाही हसतमुख दिसत होते. त्या कैद्याना कैदेतून डाम्बून ठेवणारे शिपायी मात्र काहीसे चिंतातुर दिसत होते उलट गमाजा व त्याचे सैनिक विजयमदाने फुरफुरत होते गमाजी मधून मधून पेशव्याना कःपदार्थ ठरविण्याच्या इराद्याने चाफाजी व नारोजी याना आश्वासन देत होता, " थोरल्या आईसाहेबाना तुमची दया येऊन त्यानीं तुम्हाला पाठीशीं घातलें आहे, आता तुम्हाला पेशव्याचेच काय पण पेशव्याच्या देवाचेही भय बाळगण्याचे कारण नाही. "

परंतु गमाजीच्या देखील साऱ्या गमजा ' जोंवरी न देखिला पचानन तोंवरी जबूक करी गर्जना ' याच मासल्याच्या ठरल्या. तो खून मारामाऱ्या करण्यात शूर असला तरी खाटीक झाला म्हणजे तो धुरधर तरवारबहाद्दर योद्धा असतो असे थोडेच आहे ! खुद्द पेशवे चौकशीसाठीं येत आहेत अशी खबर कानीं येताच गमाजी आपला तेथील पवित्रा ढळवून थेट रंगमहालाकडे पेशव्याच्या चढाईची बातमी राणीच्या कानावर घालण्यासाठीं गेला. घराची मुख्य धारणमेढ ढासळून पडल्यावर आढे–वासे–तुळ्या हळुहळू कोसळून पडणारच. त्याप्रमाणेंच गमाजी जाताच त्याच्या साह्यकाऱ्यानीही हळूहळू तेथून काढता पाय घेतला चाफाजी व नारोजी याचे चेहरे पुन्हा पूर्वीपेक्षा जास्त काळवडून गेले. त्याच्या मुसक्या बाधून रस्तोरस्तीं हिंडवणाऱ्या पेशव्याच्या शिपायाच्या चेहऱ्यावर मात्र विजयश्रीने वरल्याची नवी टवटवी आली. त्या दोघा कैद्याच्या अपराधाचा व त्याना झालेल्या शिक्षेचा पाढा

चौकात पुन्हा एकदा खूप जोरानें वाचून ते पुढें जाऊं लागले. अशा वेळीं बहुजनसमाजाची वृत्ति तमासगिराची असावयाचीच. पण आताच प्रत्ययाला आलेल्या 'थोरली राणी विरुद्ध पेशवे' या झगड्यामुळें तो तमशा विशेष कुतुहलजनक ठरला होता. गमाजी शिरा ताणीत ताणीत राणीकडे तक्रार घेऊन गेला होता, तो आता काय दाद लावून घेतो, पेशव्याच्या आज्ञेची प्रतिष्ठा राणी कितपत ठेवते, अथवा राणीच्या विरोधाला पेशवे कितपत जुमानतात, इकडे आता सर्वांचें लक्ष्य लागून रहाणें अगदीं स्वाभाविक होतें. याखेरीज आज बरेच दिवसात असली शिक्षा कोणाला झालेले लोकाच्या ऐकिवात नसल्यानें त्या शिक्षेची अमलबजावणी होताना पाहण्याचें भीतियुक्त कुतूहलही अनेकाच्या मनात वावरत होतें. त्यामुळे शिपायी त्या दोन अपराध्याना घेऊन पुढे चालले, त्याच्या मागोमाग लोकसमूहसरितेचा महापूर वाढत चालला होता त्या महापूरात काही निरुपद्रवी मासे असतील तर काहीं प्राणघातक नक्र असतील, तर काही बहुमोल चिजाही वाहून आलेल्या असतील पेशव्याचे हित चिंतिणारे, पेशव्यासाठी प्रसगीं स्वत:चा जीव गहाण ठेवणारे त्याचे उपासकही त्यात असतील, व पेशव्याच्या जिवावर उठणारे वैरीही असतील. पण अशा वेळीं कोण कोणाला ओळखणार ?

असो. पेशवे आपल्या वाड्यातून जे निघाले, ते सैनिकाना आपल्या आज्ञेची अमलबजावणी करण्याची व जरूर तर विरोध करणाऱ्या लोकाना कैद करण्याची आज्ञा देऊन तिकडे रवाना करून थेट रगमहालाकडे वळले. राजवाड्याच्या आत पाऊल टाकताच त्याना तेथील एकदर लोकाचें मानसिक वातावरण निरुत्साही व कुद हवेसारखें भासले 'माझी अशी कल्पना होतीच. ठिणगी पडली आहे, तिची आग भडकण्यापूर्वी कोरड्या जळणाच्या अभावीं ती प्रारभीं अशीच धुमसणार. ती आग विझवता येणें तर शक्यच दिसत नाहीं, कारण आपण ती एका बाजूनें विझवीत यावें तर आगलावी मडळी दुसऱ्या बाजूनें ती आग चेतवीत जाणार. हेतुपुर:सरच जिथें हा उपद्व्याप चालला आहे, तिथें सामोपचाराचे सार उपाय व्यर्थ आहेत. यास्तव धुमसणारी आग एकदा नीट भडकून जाऊदे तर खरी! एरव्हीं तरी केव्हाना केव्हा धोका येणारच, मग भिडस्तपणानें स्वस्थ सहन करीत बसण्यात अर्थ काय!' अशा मनाचा ठाम ग्रह ठरवून पेशवे रगमहालात प्रविष्ट

झाल्यामुळें त्याच्या उग्र मुद्रेनें जळत्या कोलित प्रमाणे धुमसणाऱ्या आगीला पेटती करण्याचें कार्य करावे यात काहींच नवल नाहीं.

आत पाऊल टाकताच उद्यानात थोरली राणी व गमाजी हीं दोघे बोलत उभीं असलेलीं पाहून जशी पेशव्याच्या तळपायाची आग मस्तकाला जाऊन झोंबली, तशीच राणीचीही अवस्था झाली. जशी त्याची मुद्रा क्रोधाविष्ट दिसत होती, तशीच राणीचीही दिसत होती. त्या दोघाच्या मध्यें गमाजी धनिणीनें छूः म्हणून इषारा दिलेल्या कुत्र्यासारखा खुनशी मुद्रेने पेशव्याकडे पाहत होता.

पेशव्याच्या क्रोधाग्नीची पहिली झळ गमाजीलाच झोंबली. ते म्हणाले, "गमाजी! आजवरचे तुझे सारे थेर मीं सहन केले पण आज तुझ्या बेबद वृत्तीचो कमाल झाली. यास्तव आपलेपणाचीं सारीं नातीं गुडाळून ठेवून केवळ पेशवा या नात्याने कठार कर्तव्य म्हणून मी तुला अशी आज्ञा करतो कीं तू जर असला चावटपणा पुन्हा केलास, तर सामान्य बदमाष गुन्हेगाराला शासन केलें जाते त्याप्रमाणे तुला शासन करण्यात येईल."

पेशव्याची अशा प्रकारची सडेतोड वृत्ति गमाजीला आजवर परिचित नव्हती. त्यामुळें तो मानखंडित होऊन राणीच्या तोंडाकडे ती आपला कैवार घेईल या आशेनें पाहू लागला

राणी तरी पेशव्यावर तोंड टाकण्याची वाटच पाहत होती तिला ही आयती सधी मिळाली. ती चंडिकेचा अवतार धारण करून म्हणाली, "नाना! हा गमाजीचा अपमान नसून माझा अपमान आहे गमाजीने जे केलें, तें माझ्या आज्ञेवरून केलें. पुढे काय म्हणणे आहे?"

पेशवे दोन्ही हात जोडून आपल्या अतःकरणातील सताप राणीची आपणा कडून अमर्यादा होईल या भयानें शक्य तितका आवरीत म्हणाले, "आई साहेब! आपणाला मी आजवर मातुश्रींच्या जागीं मानीत आलो व पुढेंही आमरण तेंच नातें मी पाळीन. परतु मी पेशवा या नात्याने एखादी गोष्ट करीत असताना मातेनेंदेखील माझ्या कारभारात ढवळाढवळ करणें इष्ट नाहीं, व तशी ढवळाढवळ मला सहन होणेंही शक्य नाहीं."

"तू पेशवा असलास तर मी महाराणी आहे. मी ह्या धनतर मराठी साम्राज्याची मालकीण आहें व तू माझा नोकर आहेस! नोकराची अरेरावी

मी तरी का म्हणून सहन करीन ? चाफाजी व नारोजी ह्या दोघा निरपराधी लोकाना मीं अभय दिले आहे माझी मालकिणीची आज्ञा धाब्यावर बस-विणारा नोकर तू कोण ? ''

राणीची समजूत थोडक्यात पटणार नाहीं हें स्वप्न पेशव्याना अगोदरच पडलें होते. ते तिला म्हणाले, '' एथे चवाठ्यावर दासदासींनीं आमचा तमाशा पाहणें बरे नव्हे मला काय सागावयाचें ते मी महाराजाना सागतों, आपणाला काय सागावयाचे तें आपणही त्याना सागा. ते जो निर्णय करतील तो मला शिरसामान्य आहे ''

'' पण अगोदर त्या दोघाची मुक्तता झाली पाहिजे. मग बाकीच्या गोष्टी. ''

'' त्यानीं अपराध माझा केला व मीं त्याना शासन केले आहे. पेशवा या नात्यानें मी केलेल्या न्यायात अशा नाजुक बाबतींत महाराणीनेंच काय, पण महाराजानींदेखील मन घालणें इष्ट नाहीं. आपल्या—माझ्यासारख्या जबाबदार माणसानीं एकमेकानीं एकमेकाचा बोज राखावयाचा असतो, जगाला असा तमाशा दाखवावयाचा नसतो त्या दोघा बदमाषाच्या बदमाषी-विषयीं पूर्ण खात्री करून घेऊनच मीं त्याना इतकी कठोर शिक्षा दिली आहे. एरव्हीं माझ्या नोकराचे बळी घेण्याइतका काहीं मी क्रूर कसायी नाहीं. ''

'' त्यानीं तुझा काय अपराध केला ? ''

'' आपण आत चला, आत आपण बोलू. इथें उघड्यावर आपण आपली शोभा करून कशाला द्या ! ''

''तूच गुन्हेगार आणि तूच न्यायाधीश, हा मोठा विचित्र प्रकार आहे.''

'' नाहीं आईसाहेब ! मी गुन्हेगार तर नाहींच, आणि हा न्यायही मीं एकट्याने केलेला नाहीं. माझ्यावर आपला विश्वास नसला तरी आपल्या चिटणिसावर तरी आपला विश्वास आहे ना ? त्याचा आपण हरएक बाब-तींत कधीं कधीं सल्ला घेता. त्यानींच हा न्याय केलेला आहे. तेच त्या दोन गुन्हेगाराच्या अपराधाच्या शाबितीला साक्ष आहेत ''

राणी गमाजीकडे वळून म्हणाली, '' जा रे, आणि आतांच्या आतां चिटणिसाना बोलावून आण. ह्या गोष्टींची शहानिशा आतांच्या आतां झाली पाहिजे. त्याखेरीज मी आज अन्न ग्रहण करणार नाहीं. ''

गमाजी चिटणिसाना बोलावून आणण्यासाठीं त्याच पावलीं निघाला.

पेशवे आपल्या मनाला आवरीत शात करीत राणीला म्हणाले, "चिटणीस आता येतील व काय सागावयाचें तें ते सागतील. पण त्यापूर्वी माझी आईसाहेबाना पुन्हा एकवार विनति आहे कीं, आत चलावें, मी काय म्हणतों तें एकस्यानें ऐकून घ्यावें, म्हणजे आपणालाच आपला स्वतःचा हात ते दोन हेर माझ्या वाड्यात घुसविण्यात किती लाब आहे हे कळून येईल. मग आपणालाच ह्या अप्रिय प्रकरणावर इथेंच पडदा टाकावा असे वाटेल. निष्कारण आपली कारस्थाने साक्षीपुराव्यानें जाहीर रीत्या सिद्ध करण्याचा प्रमग मजवर कशाला आणता? मी तर म्हणतों कीं महाराजाच्या कानापावेतोदेखील हा बोभाटा नेण्याची पाळी मजवर येऊ नये. आपली राणी आपल्याच लेकराच्या नाशाला टपून बसली आहे असें पाहून महाराजाना किती बरे वाईट वाटेल?"

'पेशव्यानीं आपल्या नोकराना देहान्त शासन दिले, ते आपण रद्द ठरविलें म्हणजे पेशवे चिडून खळखळ करू लागणार, त्याना आपण मग जास्त चिडवून भडकू द्यावयाचे, अपराध्याना निर्दोष ठरवून सोडून दिल्यामुळें पेशव्याचा पाणउतारा लोकात व्हावयाचा तितका होऊन आपल्या दयाळुत्वाचा डका सर्वत्र वाजू लागेल, राणीचा दरारा पेशव्यावरही चालू शकतो हें सर्वांना कळून येईल, महाराजाकडेही पेशव्याच्या अमर्याद अरेरावीच्या वर्तनाची तक्रार करता येईल, व आपल्या राणीचा देखील उघड उघड अपमान करण्याइतका पेशवा बळी मातला अशी महाराजाची खात्री होऊन त्याच्या मनातील पेशव्याविषयींचा आपलेपणा कमी होईल.' असे माडे मनातल्या मनात चुरण्यात राणी तेव्हा अगदीं चूर होती. तो कावा साधावयाला ही अनुकूल सधी आली होती. तिला राजकारणात मन मानेल तसा धुडगूस घालावयाला आडकाठी पेशव्याच्या चिरेबदी कारभाराचीच काय ती होती. महाराजाच्या मनातील पेशव्याविषयींचा आपलेपणा आणि विश्वास यामुळेच तर त्यानीं पेशव्याना इतकी कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम् शक्ति प्राप्त झाली होती. असतील पेशवे पराक्रमी, बुद्धिवान व चतुर, ते अगदीं कोहिनूर हिऱ्याच्या तोडीचे असतील. पण त्या कोहिनूराला जेव्हा राजभूषणात स्थान मिळालें तेव्हाच त्रिभुवनविख्यात महत्त्व प्राप्त झालें. तो

जोंवर खाणींत दगडमातीच्या ढिगाऱ्यात गाडलेला होता, तोंवर तो कोणाला माहीत होता ? तो हिरा कारागिराने खाणींतून काढला म्हणूनच तो इतक्या महत्वाला चढला कीं नाहीं ? दीपज्योति तेवू लागली कीं सर्वांना तिचा झगझगीत प्रकाश दिसतो, व त्या प्रकाशात जो तो आपला मार्ग नीट पाहून आक्रमू लागतो. पण त्या दिव्याला ते तेज तेलामुळें प्राप्त होत असतें. राणीला वाटत होतें कीं, तो कोहिनूर राजमुकुटातून काढून उकिरड्यावर फेंकून दिला म्हणजे उकिरड्यातील दगडाच्या बरोबरीनें त्याचें कवडीमोल होईल, दिव्याच्या ज्योतीला मिळणारा तेलाचा पुरवठा तोडला कीं ज्योत आपोआप विझून जाईल !

पण राणी खुळी ! दुर्दम व्यक्तिद्वेषाने आंधळी बनलेली ! तिला एवढें कळले नाहीं कीं राजानें राजमुकुटातील कोहिनूर काढून उकिरड्यावर फेंकला तरी जग बरें त्याला उकिरड्यात राहू देईल ? राजा त्यामुळें वैभवहीन करंटा ठरेल, व कोहिनूर मात्र जिथे पडेल तिथे आपला दिव्य प्रकाश पाडील, तिथें राजवैभव निर्माण करील. तेलाचा पुरवठा बंद करून दीपतेज मालवून टाकण्याचा राणीचा दुराग्रह ! पण तिला द्वेषांधतेमुळें एवढें कळलें नाहीं कीं आपण ज्या दीपाला तेजहीन करू पाहतों, तो तेल पिऊन तेज मिळविणारा दीप नसून स्वयंप्रकाशानें आधाऱ्या प्रदेशाला तेजस्वी करणारा देदीप्यमान सूर्य आहे !

एवढा मोठा व्यूह राणीनें पेशव्याविरुद्ध रचला होता, तो पेशव्याच्या सूचक व मर्मभेदक शब्दांच्या आघातानें राणीच्याच अंगावर कलता होऊन कोसळून पडू लागला 'आपलीं कारस्थानें त्या दोन हेराच्या मुखानें प्रगट झालीं त्यांत गौप्य असें काहींच राहिलें नाहीं, आणि पेशवे आकसानें बोलतात म्हणावें तर त्याला चिटणिसाची साक्ष ! आपण राजपुत्राला ठार मारण्यापासून पेशव्याना ठार मारण्यापावेतों जीं कारस्थानें केलीं, तीं कोणाही त्रयस्थाच्या दृष्टीला अत्यंत ओंगळ दिसणारीं आहेत यांत तर शंका नाहींच; पण त्या साऱ्या कारस्थानाची उभारणी राणीनें असल्या नीच वृत्तीच्या हस्तकामार्फत आपण केलेली ! तीं सफल झाल्यावर उघडकीला आलीं असतीं, तर ज्याच्या हातीं सत्ता तो पारधी या नात्याने शोभवून नेता आलीं असतीं. पण तीं मध्येंच उघडकीला आलीं, त्याचा बोभाटा महाराजापावेतों झाल्यावर

आपलें महाराजापाशीं असलेलें उरलें सुग्ले महत्त्वही रसातळाला जाणार! मग महाराज दत्तकाच्या बाबतींत आपल्या तत्राने थोडेच वागणार? त्यातच आणखी सवतीला विषप्रयोग केल्याचें बाहेर आलें.–हो! त्याचा काय भरवसा?–मग तर आपणाला जगात कोठेच तोंड दाखविण्याला जागा नाहीं. त्यापेक्षां आपण या काळीं जरा गम खाऊन एवढी वेळ निभावून न्यावी, पेशव्याच्या मनात आपणाविषयीं आदर उत्पन्न होईल अशा गरीबपणानें वागावें, आणि मग पेशवे बेसावध आहेत असे पाहून आधारात त्याच्यावर वार करावा. आपल्या डोळयाचें नुसतें पाते लवण्याचा अवकाश, कीं गमाजी–तुळाजी ही जोडी असल्या कैक पेशव्याना ठार करून त्यांचीं शिर-कमलें आणून आपल्या पायावर अर्पण करण्याला तयार आहे'

झालें. याप्रमाणे पेशव्याना पाजण्यासाठीं विषाचा पेला काठोकाठ भरून तयार झाला. तो जवळ ठेवून राणी पेशव्याना म्हणाली, "इतका त्या नीचानीं माझ्याविषयीं तुमच्या व चिटणिसाच्या मनात गैरसमज पसरविला आहे काय? हें मला माहीत नव्हतें. यावरून मला वाटतें कीं तुमच्या–माझ्यात द्वेषभाव आहे अशा समजुतीनें आपल्या हितशत्रूंनीं आमच्यात वैर उत्पन्न करण्यासाठीं त्या हेराना हाताशीं धरलें असावें. तें काहींही असलें तरी आता तुम्ही आपल्या मनातील सर्व विकल्प काढून टाकून माझ्याशीं पूर्ववत् आपलेपणानें वागलें पाहिजे. आपणा उभयताच्या वर्तनावरून सर्वांना असें वाटले पाहिजे कीं हीं मायलेकरेंच आहेत. महाराजाच्या मनात काहीं अंदेशा उत्पन्न झाला असला तर तो मी दूर करीन. त्याची काळजी नको. तुमच्याप्रमाणेंच मलाही वाटतें कीं ह्या कटकटी महाराजाच्या कानापावेतों नेऊन त्याना सध्यांच्या आजारीपणात आणखी त्रास देणें बरे नाहीं. तुम्हीं गुन्हेगाराना शासन करण्याचें ठरविले आहे तें अगदीं यथायोग्य आहे. असल्या चुगलखोर घातक्याना जितकें कठोर शासन होईल तितकें थोडें. जा तुम्ही आता."

पेशव्याना मौज वाटली, महाराजाच्या कानापावेतों कागाळ्या जाणार आणि आपलें खरें हिडीस स्वरूप पुराव्यानिशीं उघड होणार असें दिसतांच वाघीण आपलीं नखें पोटात घेऊन अगदीं गोगलगाय बनली. अरे तुरेच्या उपमर्दकारक भाषेंत आपणावर मर्मभेदक अपशब्दांचा अग्निवर्षाव करणारी

राणी आपणावर अहोजाहोची पुष्पांजलि उधळूं लागली. पण हीं पुष्पें विषानें माखलेलीं आहेत, ह्या प्रत्येक पुष्पात राणीच्या सूडात्मक विचाराचा एकेक महाविषारी तक्षक कीटकरूपानें दबा धरून बसला आहे, पुन्हा सावज आपल्या आटोक्यात येताच ही वाघीण आपलीं तीक्ष्ण नखें बाहेर काढून सावजावर झडप घालून त्याला फाडून खाण्याला कमी करणार नाहीं, हेंही पेशवे ओळखून होते

परतु तूर्त पेशव्याना वर्तमान काळापुरताच विचार कर्तव्य होता. त्यानीं राणीच्या शब्दाला होला हो दिली व आपला गैरसमज सर्व दूर झाला असें परिणामकारक भाषेनें राणीच्या मनावर बिंबवून ते राणीचा निरोप घेऊन माघारे गेले

एक दोन प्रहरानीं राणी असें कसें झालें, याचा विचार करीत एकटीच कपाळाला हात लावून बसली असताना गमाजीबरोबर चिटणीस येऊन पोहोंचले. चिटणिसाचें व राणीचें सभाषण होण्यापूर्वीच गमाजी राणीला खेदपूर्वक म्हणाला, " आईसाहेब ! पेशव्यानीं आपली आज्ञा अवमानून चाफाजी व नारोजी याना दिलेलें देहान्त शासन अमलात देखील आणलें. हा काय न्याय ? ही काय आपल्या शब्दाची प्रतिष्ठा ? "

राणी गमाजीला डोळ्याने खुणावून म्हणाली, " ते दोघेही खरोखर अपराधी असल्याबद्दल पेशव्यानीं माझी पूर्ण खातरजमा करून दिली आहे. त्याना झाली ती शिक्षा अगदीं यथायोग्य झाली. "

राणीच्या शब्दानीं व चोरट्या नेत्रसकेतानेंही गमाजीचें समाधान झालें नाहीं. तो असमाधान ने कपाळाला आठ्या घालून बाहेर निघून गेला.

लगेच राणी चिटणिसाकडे वळून म्हणाली, " चिटणीस, तुमच्या साक्षीची आता कांहीं आवश्यकता उरली नाहीं. ते गुन्हेगार खरोखर गुन्हेगार आहेत कीं नाहींत याविषयीं मी तुम्हाला विचारणार होतें. पण तें काम आता आपोआप झालें आहे. तुम्हीं आता जा. "

राणीची आपणाशीं जास्त बोलण्याची इच्छा नाहीं असें पाहून चिटणीस वाड्यात आल्यासारखे महाराजानांही भेटण्याचा प्रयत्न न करतां आल्या पावलीं माघारे निघून गेले. त्याचें पाऊल वाड्याबाहेर पडलें मात्र, आणि लगेच राणीनें महाराजाच्या महालावरील दरोबस्त चौकीदाराना आपणा-

समोर बोलावून आणून आज्ञा केली, " या क्षणापासून कोणालाही माझ्या परवानगीखेरीज महाराजाची भेट घेऊ द्यावयाची नाहीं. महाराजाची प्रकृति दिवसेदिवस जास्त जास्त बिघडते आहे, त्याना कोणाशींही काहींही बोलू द्यावयाचें नाहीं असें वैद्यराजानीं सांगितलें आहे. अगदीं चिटपाखरू देखील माझ्या परवानगीखेरीज महाराजाच्या महालात फिरकता कामा नये. जर कोणाकडून ह्या आज्ञेचें उल्लंघन झालें, तर त्याला जागच्या जागीं शिरच्छेदाची शिक्षा देण्यात येईल "

पुतळा तेव्हा राणीसाठीं फुलाचे गजरे तयार करून घेऊन आली होती. तीही म्हणाली, " इतकी खबरदारी घेतली तरच महाराजाची प्रकृति सुधारण्याची आशा आहे. मीदेखील आईसाहेबाना हेच सुचविणार होतें "

स्तुतिसुमनाचा वर्षाव कोणाला आल्हाद देत नाहीं ! राणीनें समाधानपूर्वक मान तुकविली. पुतळा तिचे केंस विंचरूं लागली.

## प्रकरण १७ वें

# आग! आग!!

"आमच्या हाडवैऱ्यापैकीं दोघे तर थाग्याला लागलेच." चाफाजी व नारोजी याना घोड्याच्या पायाशीं बांधून मोती चौकात ठार करण्यात आल्याची वार्ता कानीं येताच पुतळेनें आपल्याशींच समाधानाचे उद्गार काढून एक हायसा उसासा सोडला, व पुढे ती म्हणाली, "असेंच बाकीच्या हाडवैऱ्यांनें तळपट झाल्याचे ज्या दिवशीं मला कळून येईल, त्या दिवशीं मी साखर वाटीन."

पण चाफाजी आणि नारोजी हे जरी प्रतापरावाचे मारेकरी असले, तरी प्रतापरावाच्या पिशाच्चानेच त्याच्यावर हा सूड उगविला, यात कोणाला कांहींच शंका नव्हती. बिचाऱ्यांचीं घरे पूर्व दिवशींच जळालीं होतीं, व तींही त्या पिशाच्चानें सांगून सवरून राजरोस जाळलीं होतीं त्याना त्या गोष्टीची आगाऊ इशारत देऊन त्या पिशाच्चाने त्याच्या बायकामुलावर एक उपकारच केला म्हणावयाचा! त्यानेंही मनात विचार केला असेल, अपराधी हे दोघे, याच्या अपराधाबद्दल याच्या बायकोमुलाना देहान्त प्रायश्चित्त कां म्हणून द्या?

याप्रमाणें आपला दिवगत पति हाडवैऱ्यावर सूड घेण्याची आपली प्रतिज्ञा शेवटाला नेण्याच्या कामीं आपणाला मदतच करीत आहे, याविषयीं मनातून समाधान मानीत पुतळा त्या रात्रौ आपल्या घरीं झोपी गेली. आज तिचा लहानगा मुकुंद जरा आजारी असल्याने व म्हानारीचाही दम्याचा विकार अमावास्या जवळ आल्यामुळे बळावल्याकारणानें तिनें आज आपल्या घरीं राहण्याबद्दल राणीची परवानगी घेतली होती. ती रात्र घरीं काढून पहाटेच्या वेळीं पुतळा राजवाड्याकडे जावयाला घराबाहेर पडली, तेव्हा तुळाजीच्या घराच्या फाटकाशेजारीं कोणीतरी उभे असल्याचा भास तिला

झाला. तिला वाटले, तुळाजी तर देउराहून आला नाहीं ना? म्हणून तिनें हाक मारली, " तुळाजी ? "

पण एक नाहीं कीं दोन नाहीं पुतळेळाही लगेच वाटले, तुळाजी आला असता तर आपली हाक ऐकून ओ द्यावयाला चुकला नसता. पण ओ तर मिळाली नाही. मग तो कोण ? कोणी चोर बीर तर तुळाजीच्या घरात चोरी करण्यासाठीं आला नाहीं ना? तो चोर असल्यास कदाचित् आपल्या घरावरही धाड घालील या भयाने तिनें पुन्हा हाक मारली, " कोण आहे तें ? तुळाजी ? "

तरीही ओ नाहीं. तेव्हा पुतळेचा सशय दुणावला. तिनें जागच्याजागीं थबकून आपल्या निऱ्यात स्वसरक्षणासाठीं नेहमी सज्ज असलेला खजीर उजव्या हातात सावधगिरीनें धरीत पुन्हा हाक मारली, " कोण आहे तें बोलत का नाहीं ? "

" मी आहें. " तुळाजीच्या दारातून समोर असलेल्या लिंबिणीच्या झाडाखालील काळोखातून खोल व हळू आवाजात उत्तर मिळालें.

" तू कोण ? " असें विचारीत पुतळा धीटपणें त्या रोखानें जाऊ लागली.

" खबरदार. पुढें येशील तर प्राणाला मुकशील. मला तू इतक्यात विसरलीस ? आणि म्हणूनच तुळाजीशीं मैत्री करू पाहत आहेस काय ? चाफाजी आणि नारोजी याची वाताहात मींच लावली, चिटणिसाना सावध मींच केलें, आणि तुळाजी देऊरला कोणत्या कामासाठीं गेला आहे हेंही मला माहीत आहे, त्याची खबरही योग्य माणसाना मीं द्यावयाची ती दिली आहे, व असाच मी खुनाचा बदला घेणार आता तरी तू मला ओळखलेंस ? दुरून बोल. जवळ येशील तर खबरदार ! काल पहाटेला तुळाजीशीं तूं कसल्या गप्पागोष्टी मारीत होतीस ? तुळाजीशीं तू वर्षानें पाट लावणार इतकी तुझी मति चळली ? बायकोच्या जातीला देवाने काळीज मुळींच दिलेलें नाहीं काय ? "

पुतळा भीतीनें अगदीं गर्भगळित झाली. ती मनानें जरी पाक होती, तरी पिशाचाचें भय तिला वाटलेंच. मनानें पवित्र खरी; पण तें मन आपल्या पतीच्या भुताला तिनें कसें उघडें करून दाखवावें ? मनोभावनाचें दृष्टिगम्य असें चित्रण थोडेंच कोणाला करतां येतें ? तिला तेव्हा मनातून हुरहूर वाटली

ती अशासाठीं कीं, आपण तुळाजीशीं कपटानें का असेना; पण लाघवी बोल बोलून गेल्याचा बोभाटा जर तुळाजीनें केला असला, तर त्याचा फोलपणा आपण या घटकेला कसा सिद्ध करू शकणार? माणसाचे मनाचे व्यापार दृष्टिगोचर नसतात, म्हणून तर वाणीला व करणीला इतकें महत्त्व!

पण त्याच वेळीं पुतळेला असेंही वाटलें की आपल्या अंतरंगात अलीकडे अधूनमधून डोकावणारा तो विचारदेखील आपल्या पतीच्या पिशाच्चाला कळला असेल, त्यामुळेंच त्याला आपल्या वर्तनाविषयीं संशय येऊ लागला असेल. त्या विचाराचा त्या पिशाच्चाने जरी ओझरताही उल्लेख केला नाहीं, तरी आपली मति थोडी तरी चळल्याचा तो पुरावा त्याने आपल्या स्मरणशक्तींत जतन करून ठेवलाच असला पाहिजे.

तो पुतळेचा मनकवडा विचार त्या तरुण बैराग्याविषयींचा होता. कुठचा तो तरुण बैरागी आणि कुठची पुतळा! त्याची पहिली भेट झाली तीही स्मशानात व तीही अशा प्रसंगीं कीं जेव्हा माणसाच्या खळबळणाऱ्या मनात आपल्या उपकारकर्त्याविषयीं अभिलाषाचें बीज रुजणे शक्य नसतें. राब राबता घालून जाळून भाजून मशागत केलेल्या जमिनींत पेरलेलें बीं चांगलें फोफावून उगवतें व त्याला फुलाफळाचा बहरही चांगला येतो हें खरें. पण त्या जमिनीवर राबाचा थर जळत असताना त्या आगीच्या डोम्बात जर तेंच बीं पेरलें, तर फोफावून उगवण्यापेक्षा जळून मात्र जाईल. असला अडाणीपणा कोणी शेतकरी कधीं चुकून देखील करीत नाहीं. पुतळेच्या हातूनही स्मशानात त्या तरुण बैराग्याच्या बाबतींत तसला अडाणीपणा घडणें शक्यच नव्हतें. पण तेथून ती माघारी आली, तेव्हा त्या तरुण बैराग्याच्या अनाहूत उपकारकर्तेपणामुळें तिच्या मनोभूमींत आदराचा राब राबता जळूं लागून त्या भूमीची मशागत तिला न कळत सुरू होती हें मात्र खरें. असे आणखी काहीं दिवस गेले, आणि जगातील बहुधा प्रत्येक माणसाप्रमाणें पुतळेचेंही स्मशानवैराग्य जलाशयातील गढूळ पाण्याच्या तळाशीं स्थिरावणाऱ्या रेतीप्रमाणें स्थिरावू लागलें. दिवंगत पतीविषयींचा आदर जरी तिच्या मनात ओतप्रोत भरलेला होता, तरी पाण्याच्या उदरीं जसा विस्तव, तशा भोगलालसा पति-पत्नींनीं एकमेकाविषयीं वाटणाऱ्या आदराच्या सप्तपातळात थारा घेऊ शकतात. पुतळा तरुण होती. बरोबरीच्या मुलींचे सुखाचे

संसार गडगंज चाललेले ती प्रत्यहीं पाहत होती तिच्या कैक प्रेमळ व सुशील मैत्रिणीसुद्धा तिच्याप्रमाणेंच अकालीं वैधव्यपंकांत रुतल्या गेल्यावर कोणातरी विश्वासू व आवडत्या जोडीदाराच्या हाताच्या आधारानें त्या पंकातून वर येऊन नवें संसारसुख अनुभवूं लागल्या होत्या. तसेंच आपण केलें तर काय होईल? त्या तरुण बैराग्यानें आपणावर जे महदुपकार केले आहेत, त्या उपकाराची फेड या निमित्तानें करण्याची संधी जर आपणाला मिळाली, तर किती चांगलें होईल? ह्या नव्या विचारानें तिच्या मनावर हा हा म्हणता चांगलाच पगडा बसविला होता. पण ही तिच्या मनाची तयारी अश्वारूढ होऊन दिग्विजयाला निघण्याच्या इराद्यानें अश्वशोधार्थ निघालेल्या उत्साही वीराला अश्वाचा फक्त एक नाल सांपडावा, तशी होती. तिला खूप वाटलें कीं तो तरुण बैरागी आपणाला वश व्हावा, व त्यानें आपला स्वीकार करावा पण नुसतें तिला तसें वाटून थोडेंच भागणार होतें! तिच्याप्रमाणेंच त्या तरुण बैराग्यालाही वाटलें असतें तर उपयोग!

पुतळेच्या मनांत त्या तरुण बैराग्याविषयींची अशा प्रकारची अभिलाषबुद्धि एकदम पहिल्याच क्षणाला जागृत झाली होती असें नाहीं. अरुणोदयीं क्षितिजावर अगदीं सौम्य व नेत्रांना आल्हाददायक दिसणारा सूर्य क्षितिजावरून आकाशमार्गानें वर वर चढत असतां अधिकाधिक तेजःपुंज होतो, त्याप्रमाणेंच तिला प्रथम त्या उपकारकर्त्या तरुण बैराग्याविषयीं आदर वाटूं लागला, व आदरामुळें त्याचें पुण्यदर्शन घडावें अशी उत्कंठा वाटूं लागली. जसजशी ती वेळांत वेळ काढून त्याचें दर्शन घडण्यासाठीं माहुलीला महिन्या पंधरा दिवसांनीं फेऱ्या घालूं लागली, तसतसा त्या तरुण बैराग्याचा प्रेमळ स्वभाव तिच्या ओळखीचा होऊन त्याच्याविषयीं तिच्या मनांत प्रेमाचा उगम झाला, आणि त्या प्रेमाची परिणति संसारांत व्हावी असेंही तिला अगदीं अलीकडे वाटूं लागलें होतें.

हें पुतळेचें केवळ सर्व मनोराज्य होतें. आपलें मन त्या तरुण बैराग्यापाशीं उघड करण्याला तिला अजून धीर झाला नव्हता, व त्याच्या वर्तनांतही तशा प्रकारचा ओढा तिला दिसून येत नव्हता. त्याला पुतळा आवडे, तिचें कल्याण व्हावें असें त्याला वाटे, तो वारंवार तिला परोपरीनें धीर देई, तिच्यासाठीं कोणताही स्वार्थत्याग करण्याची त्याच्या मनाची तयारी

होती, सर्व खरें. पण ह्या साऱ्या कोमल भावना कोणत्या नात्याच्या असतील; पित्याचें कन्येवर, भावाचें बहिणीवर, गुरूचें शिष्येवर व प्रियकराचें प्रियतमेवर जें प्रेम असू शकते, त्यापैकीं कोणत्या प्रकारचे प्रेम त्या तरुण बैराग्याचें आपणावर आहे, याचा पुतळेला आजवर काहींच मागमूस लागला नव्हता. दिव्य रत्नांच्या राशीवर बसून तिचे डोळे त्या रत्नांच्या प्रकाशानें इतके दिपून गेले होते कीं त्यातले एकादें रत्न उचलून घेण्यानेंही आपण कुबेराच्या सपत्तीची मालकीण होऊ हे मनातून कळत असताही कोणत्या रत्नाला हात घालावा हेच तिला दिसेनासे झाले होते.

तें सर्व ब्रह्माण्ड पुतळेला त्या अज्ञात व्यक्तीचा सूचक प्रश्न ऐकून एकदम आठवलें. आपण तुळाजीला गोत्यात आणण्याच्या हेतूने झुलविण्यासाठीं उच्चारलेले बोल देखील जर त्या पिशाच्चाने जमेला धरले, तर बैराग्याविषयीं आपल्या मनात उत्पन्न झालेली ओढ तें जमेला का धरणार नाहीं ?

भयभीत चित्तानें पुतळा त्या पिशाच्चाला हात जोडून त्याची समजूत घालण्यासाठीं पुढे जाऊ लागली, तोच तिला इशारा मिळाला, " जवळ येशील तर खबरदार ! मला तुझें काहींही ऐकावयाचें नाहीं. स्वतःची फसवणूक करू नकोस, पूर्ण विचाराअतीं जे करणें योग्य वाटेल तें कर. नालायक माणसाशीं लग्नगाठ मारून जन्माची पस्तावू नको. ज्याच्याविषयीं तुझ्या मनात खरोखर आदर असेल, प्रेम असेल, ज्याच्यावर तुझा विश्वास असेल, जो आपणाला जन्मभर अंतर देणार नाहीं असा भरवसा तुला वाटत असेल, त्याच्याशींच लग्नगांठ मार. तो श्रीमत असो कीं नसो, त्याची पर्वा करूं नकोस. पैशाच्या श्रीमतीपेक्षा माणसाच्या हृदयाची श्रीमती पाहावयाची असते. जा तू आता. ही पाहा, मी तुळाजीच्या घराला आग लावतों आहें. हें तुझ्या माझ्याखेरीज दुसऱ्या कोणालाही माहीत नाहीं, व कोणाला माहीत होताही कामा नये. जा तू अगोदर दूर निघून जा कशी ! इथें जवळपास उभी राहूं नकोस. कोणीं पाहिलें तर तुझाच संशय येईल. जा लौकर."

यावर काहीं प्रश्न विचारण्याचें धैर्य पुतळेला मुळींच झालें नाहीं. नेम काय ? पिशाच्चाशीं गाठ ! रागाच्या भरांत त्यानें उचलून आगींत फेंकून दिलें तर ? तिला भय एवढेंच वाटलें कीं तुळाजीच्या घराला लागलेली आग वाऱ्यानें वाहावत आपल्या झोपडीला तर येऊन भिडणार नाहीं ना ?

"माझी गरिबाची झोंपडी शेजारीं आहे." पुतळा भीत भीत चांचरत उद्गारली, "माझी म्हातारी आणि माझा बाळ झोंपडींत आहे."

"तू त्याची काळजी करू नकोस. त्याच्या केसालाही धक्का लागणार नाहीं." उत्तर मिळालें.

पुतळा धडधडत्या अतःकरणानें तेथून राजवाड्याच्या मार्गाला लागली. जाताना तिनें पाच चार वेळा मागे वळून पाहिलें. प्रथम तिला कांहींच दिसलें नाहीं. तिसऱ्या वेळीं मात्र तुळाजीच्या घराला आग लागलेली दिसली. त्याबरोबर आपल्या धडधडत्या उरावर हाताचें दडपण ठेवून पुतळा पळत सुटली. तिला भय हें कीं आपणाला कोणीतरी पाहील व वहीम घेईल.

पुतळा आणखी अमळ पुढे जाते, तों सारी बाजीराव पेठ 'आग लागली आग लागली' अशा आरोळ्या मारीत खडबडून उठली

आगाऊ सर्व सूचना मिळाल्या असताही पुतळा थबकली. म्हातारी व मुकुद याच्या आठवणीनें तिच्या हृदयाचे पाणी पाणी होऊ लागलें. त्याचें तिकडे काय होईल या भयाने तिच्या जिवाची पाण्यावेगळ्या मासोळीसारखी तडफड सुरू होती. पण पिशाच्चाचा शब्द मोडून तिकडे जाण्याचें धैर्य काहीं तिला होईना. अखेर भीतीपेक्षा वात्सल्यप्रेमच प्रभावी ठरलें. आजूबाजूचे लोक आरडाओरड ऐकून आग विझविण्यासाठीं पाण्याच्या घागरी भरभरून घेऊन पळत जाऊ लागले, त्याबरोबर पुतळाही पळत गेली. जाऊन पाहते तों काय! आग जरी नुकतीच लागली होती, तरी गवती छपराच्या घराना पेटावयाला कितीसा उशीर? तुळाजीच्या घरानें तर चोहींकडून पेट घेतलाच पण तेवढ्यात वारा सोसाट्याचा सुटल्यामुळें आगीच्या ठिणग्या पुतळेच्या घरावर येऊन त्या घराचीही होळी पेटू लागली. पुतळा तें भयकर दृश्य पाहून एकदम बेशुद्धच पडली बेशुद्ध पडता पडता तिनें मुकुद व म्हातारी याना वाचविण्यासाठीं ओरडून सागण्याचा जिवापाड प्रयत्न केला तिला वाटलें, आपली किंचाळी ऐकून स्वर्गात देवदेखील झोंपेतून जागा होईल. पण खरोखर तिचा एकही शब्द तिच्या मुखावाटे उमटला नाहीं, व तशाच स्थितींत ती बेशुद्ध पडली.

बऱ्याच वेळानें—चागलें उजाडल्यावर पुतळा शुद्धीवर येऊन पाहते, तेव्हा चागला घटकाभर दिवस वर आला होता. पुतळेनें सभोंवार नजर टाकली

तों ती कोटेश्वराच्या मंदिराच्या मागील बाजूच्या धर्मशाळेंत एका तरटावर पडली होती, व जवळच तिचा मुकुंद म्हातारीशीं खेळत बोलत बसला होता.

म्हातारीनें सांगितलें त्यावरून पुतळेला कळले कीं आपलें व तुळाजीचें अशीं दोन्हीं घरें आगींत जळून खाक झालीं. बोटभर चिंधी अथवा वीत-भर लाकूडही अग्निप्रळयातून बचावलें नाहीं त्या दोघाना कोणींतरी एका माणसानें घरातून सुरक्षितपणें बाहेर काढून इथे आणून ठेवलें, व लौकरच तुमची व्यवस्था लागेल असे सांगितलें त्याच माणसानें पुतळेलाही बेशुद्धा-वस्थेंत उचलून तेथें नेऊन ठेवलें होतें उजाडताच राणीकडून एक माणूस समाचारासाठीं येऊन गेला. त्या माणसाच्या हातीं राणीनें निरोप पाठविला होता कीं भिण्याचें कांहींच कारण नाहीं, राजवाड्याशेजारीं आपण नवें घर राहावयाला देऊ आणि मुकुंदा व म्हातारी यांच्या निर्वाहाचीही तजवीज करू. तोच मनुष्य पुतळा बेशुद्ध आहे असें पाहून तिला शुद्धीवर आण-ण्याचा उपाय शोधण्यासाठीं कोठें बाहेर गेला होता.

पुतळा शुद्धीवर आल्यावर थोड्याच वेळात तो मनुष्य माघारा आला. त्यानें आणलेल्या औषधीचें आता कांहींच कारण उरलें नव्हतें. त्यानें सांगितल्याप्रमाणें म्हातारी व मुकुंदा यांच्यासह पुतळा त्याच्याबरोबर राज-वाड्याकडे निघून गेली. जातांना तिच्या मनान आगीविषयीं व पिशाचाच्या उद्गाराविषयीं विचार एकसारखे घोळत होते. तुळाजीचें घर पेटणार हें तिला माहीत होतें. पण त्याबरोबर पिशाचानें आपलेंही घर पेटवून दिलें तें का ! आपणावर त्याचा राग आहे म्हणून कीं काय ! बरें, राग आहे म्हणावें तर योग्य माणसाशीं लग्नगाठ मार असें त्यानें सांगितले त्याचा अर्थ काय !

शीड तुटलेल्या नावेसारखें पुतळेचें मन खवळलेल्या विचारसागरांत कोठच्या कोठे भरकटत चालले होतें.

## प्रकरण १८ वें

# ताराबाईची सहकारिता

खासेराव बोलून चालून राजकारण करण्यासाठीं कोल्हापुराहून साताऱ्यांत आले होते. त्याना पेशव्याचा जो मोठा आधार वाटत होता, तो तुटल्यावर लगेच त्यानीं प्रतिनिधींना विश्वासात घेऊन पेशव्याच्या विरुद्ध सगनमत करण्याचा प्रयत्न करून पाहिला. प्रतिनिधि म्हणजे साबाच्या पुढचा जसा नदी तसे राणीचे हस्तक होत कर्तबगारीच्या उणीवेमुळें त्याना मराठशाहीच्या राजकारणात स्वतंत्र अस्तित्व असे काहीं नाहीं, हें खासेरावाना पूर्ण माहीत होतें. म्हणूनच तर ते त्याच्या कच्छपीं लागले होते. आपण होऊन प्रतिनिधि कोणतीही जबाबदारी शिरावर घेण्याला असमर्थ असल्यानें ते पेशव्याविरुद्ध एवढें जबरें कारस्थान करण्यापूर्वी राणीचा विचार घेणार, त्या निमित्तानें अनायासें आपणाला राणीचा मनोदय पुन्हा एकवार कळावा, हा खासेरावाचा डाव होता.

प्रतिनिधि हे पेशव्याचे प्रतिस्पर्धी खरे. पण ती स्पर्धा त्यानीं केवळ पेशव्याचा नाश करण्यासाठीं माडली नसून त्या नाशात त्याना स्वार्थ साधावयाचा होता. पेशव्याची सत्ता त्याना आपल्या मुठींत आणावयाची होती. तो हेतु खासेरावामार्फत कोल्हापूकराना सामील झाल्याने मुळींच साधणार नाहीं, उलट आजला आपणाला महाराज व पेशवे याच्या अमदानींत जो थोडाफार सावळागोंधळ घालता येतो व अरेरावी गाजवता येते, तीही कोल्हापूरकराचा एकतंत्री अमल झाल्यानें मुळींच साधणार नाहीं, हें प्रतिनिधि ओळखून होते. त्यानीं त्या बाबतींत खासेरावाच्या आग्रहास्तव राणीची भेट घेतली, तिच्याशीं जरूर तो विचारविनिमयही केला, पण शेवटीं थोरल्या राणीसाहेब आणि महाराजही या गोष्टीला मुळींच कबूल नाहींत असें सागून तो प्रश्न निकालात काढला. महाराजाचा नकार हा केवळ काल्पनिकच होता. त्याना

कोणीं त्या बाबतींत विचारलें नाहीं कीं पुसलें नाहीं. खासेरावानीं स्वतंत्रपणें महाराजाची भेट घेण्याचा प्रयत्न केला, पण तोही राणीच्या दक्षतेमुळें फसला. महाराजाना सर्वतोपरी गुडाळून ठेवून राज्यकारभार हातीं घेण्यासाठीं कोणाची-ही भेट अगर सल्ला महाराजाना घेऊं द्यावयाची नाहीं अशा पूर्व योजने-नुसार राणीनेंच नजरकैदेचा कोट उभारला होता.

याप्रमाणें दोन ठिकाणीं अपयश पदरीं पडल्यामुळें आपली सातान्यात काहीं डाळ शिजत नाहीं अशी खासेरावाची जरी खातरजमा झाली होती, तरीही त्यानीं आपल्या प्रयत्नवादीपणाची शिकस्त करण्यासाठीं व मुत्सद्दे-गिरीची शेवटची परीक्षा पाहण्यासाठीं दुसऱ्या दिवशीं दोन प्रहरीं गडावर जाऊन ताराबाईची भेट घेतली. ताराबाईला तिच्या लोकाकडून खासेरावाच्या राजधानींतील घालमेलींची सारी बातमी रोजच्या रोज मिळत होतीच. इतकेंही करून तिला पूर्वीप्रमाणेच खासेरावाची भेट घेणें टाळता आलें असतें. पण एकतर ती शाहू महाराजाचे वनवासवाडीहून रंगमहालात आगमन घडले त्या रात्रौ शिष्टाचार म्हणून खासेरावाना भेट देण्याला वचनबद्ध झाली होती, आणि दुसरें, महाराजाचा अंतकाळ समीप आला या परिस्थितीचा फायदा घेऊन कोणीं कोणीं काय काय बखेडे माजविले आहेत याचें शक्य तितकें प्रत्यक्ष ज्ञान, तो प्रश्न राजवटीच्या इभ्रतीच्या व चिरस्थायीपणाच्या दृष्टीनें हलक्या व कुशल हातानें सोडविण्यासाठीं तिला करून घ्यावयाचें होतें, कोल्हापूरकराचे हृद्गतही तिला अजमावून पाहावयाचे होतें.

असो. खासेराव येताच ताराबाईने त्याचा यथोचित सत्कार करून संभाजी राजे व राणी जिजाबाई याच्या कुशलवृत्ताची आस्थापूर्वक चौकशी केली. खासेरावाना त्यावरून भरवसा वाटूं लागला कीं मासाहेबाना संभाजीराजे व राणी जिजाबाई याच्या भाऊबदकीच्या कारवाईमुळें जरी राज्यत्याग करून सातान्यात शाहूमहाराजाच्या आश्रयाला यावे लागले व याप्रमाणे सामर्थ्य-हीन झाल्यामुळे नजरकैद पत्करावी लागली, तरी तें किल्मिष आता त्याच्या मनात उरलेलें नाहीं, कोल्हापुराकडे त्याचा ओढा सातान्यापेक्षा जास्त आहे.

एथवर आपल्या कार्याची कौशल्यपूर्वक संपादणी केल्यावर खासेराव हलकेहलके हवापाण्याच्या गोष्टीचा किनारा सोडून आपल्या संभाषणाची चालणारी नाव राजकारणाच्या खोल पाण्यात हाकारूं लागले.

"आपणाला इथें जन्मभर असे नजरकैदेत राहावें लागत आहे, याबद्दल आमचे महाराज व राणीसाहेब याना फार वाईट वाटतें." याप्रमाणें त्या नावेचें पहिले वल्हें खासेरावानीं मारलें.

पण त्याना प्रथमच खडक लागला! ताराबाई उत्तरली, "कोल्हापुरातील रहिवासापेक्षा इथली नजरकैद मला कितीतरी सुखावह वाटते."

"पूर्वींच्या झाल्या गेल्या सर्व चुकींबद्दल आपण क्षमा करावी व वडील पणाच्या नात्यानें आपलें शेष आयुष्य कोल्हापुरात मानसन्मानपूर्वक घालवावें अशी उभयता सरकाराची आपणाला विनति आहे."

"त्याबद्दल मी त्याची फार आभारी आहे." ताराबाई उत्तरली.

"आपणाला अडचण जर एथील विरोधाची अथवा एथून आपली सुटका कशी होईल याची असेल, तर आपल्या सुटकेसाठीं सर्वस्व पणाला लावण्याची उभयता सरकाराची तयारी आहे."

"ते खरें. पण माझे आता असे कितीसे दिवस ह्या जगातले राहिले आहेत? तेवढ्यासाठीं मी शाहूला तरी का म्हणून दुखवू? माझ्या तिकडे येण्यानें सातारा-कोल्हापूर यातील मतभेद मात्र अधिक तीव्र होतील. आजच आहेत बखेडे तेवढे थोडे झाले, म्हणून मीं त्यात ही नवी भर घालावी कीं काय?"

"कोल्हापुरात स्वतत्र राज्याचे रोप आपणच लावलेलें आहे, त्याची योग्य प्रकारें जोपासना आपल्या कृपेच्या सावलीखेरीज होणार नाहीं. आपली अशीही इच्छा असेलच कीं ज्याअर्थी दोन्ही महाराज निपुत्रिकच आहेत व पुढेंही त्याना पुत्र होण्याची दोघाच्याही वार्धक्यामुळें आशा नाहीं, त्याअर्थी सातारा व कोल्हापूर यातील भेद लयाला जाऊन दोहोंचें मिळून एक प्रबळ सयुक्त मराठी साम्राज्य व्हावें."

"बरें. पुढें?"

"आणि ज्याअर्थी कोल्हापूरची गादी आपण स्थापन केली आहे, त्याअर्थी तीच त्या सयुक्त साम्राज्याची राजधानी होण्यात आपला खरा गौरव आहे."

"माझा गौरव!" असे अमळ मोठ्यानें स्वतःशीं म्हणून ताराबाईनें एक उसासा सोडला. तोंच बाहेरून त्या शद्बाना साथ मिळाली, "मासाहेबाचा सदैव गौरव असो."

खासेरावांनीं बिचकून मागें वळून पाहिलें. ताराबाईही 'हे कोण आले' असा मनाला प्रश्न विचारीत तिकडे पाहू लागली. तोंच पेशवे, चिटणीस, सुमंत, देवराव वगैरे मंडळी आत आली. पेशवे सर्वांच्या अग्रभागीं होते.

"मासाहेबांच्या एकान्तवासाचा भंग झाला, याबद्दल मी मासाहेबांची वास्तविक साष्टांग नमस्कार घालून माफी मागायला पाहिजे. पण माफी मुद्दामच मागत नाहीं. कारण मासाहेबांच्या तोंडचा रागाच्या शिव्यांचा आशिर्वाद मिळविण्याची मला फार उत्कंठा लागली आहे. मी लेंकरूं, मासाहेबांच्या मांडीवर खेळण्याबागडण्याचा माझा अधिकार आहे. मी मासाहेबांचेंच पतवंड आहें. वयाची, आणि मासाहेबांसारख्या सर्व वडील माणसांच्या कृपाप्रसादानें अधिकारवैभवाची दिवसेंदिवस वाढ होऊं लागल्यापासून अलीकडे महाराजदेखील आपल्या मुख्य प्रधानाचा बोज राखून अहो-जाहोच्या भाषेंतच बोलतात त्यामुळें अरे–जारेच्या आपुलकीच्या भाषेत वागवणारें कोणीच नाहीं म्हणून मनाला असमाधान वाटतें. त्या सगळ्याचें उट्टें आज मासाहेबांना माझ्यावर मनमुराद रागावायला लावून व त्यांच्या तोंडभर शिव्या खाऊन काढावें, अशी इच्छा आहे." असें म्हणून पेशवे ताराबाईसमोर दोन्ही हात जोडून अशा लडिवाळ नजरेनें ताराबाईकडे पाहत उभे राहिले कीं, वासराला पहाताच गाईला पान्हा फुटावा तसा ताराबाईचा ऊर वत्सलतेनें दाटून आला. तिने प्रसूतिवेदना सहन केल्या होत्या, अपत्य-सौख्य अनुभवलें होतें, तरी पण त्यात खरा 'राम' असा कधींच तिच्या प्रत्ययाला आला नव्हता. पोटचा पुत्र म्हणून तिला प्रिय जरी असला, तरी तो वेडा, तसल्या मुलाला आपण जन्म दिला असें सांगण्यात तिला समाधान जनातही नाहीं व मनातही नाहीं. शाहूमहाराजाचे बाळपण बादशहाच्या कैदेंत गेलेलें, व ते सुटून आल्यापासून दोघांत वाद असल्याने माता आणि लेंकरू या प्रेमळ नात्यानें वागण्याचा सुप्रसंग परवापावेतों त्या दोघांच्याही आयुष्यात कधींच आला नव्हता. संभाजीराजाचें बाळपणही ताराबाईवेगळेंच गेलें होतें. तात्पर्य, ती स्त्री गृहसौख्याच्या दृष्टीनें अभागीच होती. एवढा पराक्रम, एवढी महत्त्वाकांक्षा, एवढी उमेद, एवढी चतुराई, पण शाहू-महाराजांना एकाहून एक कर्तबगार असे पेशवे राज्याचा भार शेष सृष्टीचें ओझें सहन करतो म्हणतात त्याप्रमाणें सहन करणारे भेटले, म्हणून त्यांच्या

राज्याचा साम्राज्यविस्तार झाला आणि तसें मनुष्यबळ ताराबाईला न मिळाल्या-मुळें तिने स्थापिलेल्या सवत्या सुभ्याची अवस्था डबक्यातल्या जलसंचया-प्रमाणें झाली. तो अतुल पराक्रमी पुरुषाच्या प्रेमळ साहचर्याचा अलभ्य लाभ तिला तिच्या आयुष्यात आजच प्रथम होत होता तिनें बाळाजी विश्व-नाथाची यशस्वी पेशवाई पाहिली, त्या पेशवाईनेच तर तिचे महान् उद्योग हाणून पाडले होते. पण ते तिला लाभले नाहीत. तिने थोरल्या बाजिरावाचा अतुल पराक्रम पाहिला, त्यामुळेच तर शाहूमहाराजाना पराजित करून साताऱ्याच्या गादीवर राज्य करण्याच्या तिच्या महत्त्वाकांक्षेच्या ठिकऱ्या ठिकऱ्या झाल्या, पण त्याच्याशीं तिला सहकार्य करता आले नाहीं. मनातून तिची फार मोठी इच्छा कीं आपणाला पेशव्यासारखे कर्तबगार अनुयायी लाभावे व त्याच्या जिवावर आपण थोरल्या आबासाहेबाच्या नावाला साजेल अशी राजवट जोपासून वाढवावी—इतकी वाढवावी, कीं दिल्लीचे बादशाही तख्त मराठशाहीच्या टाकसाळींत आटविले जाऊन त्याचीं नाणीं पडावीं. असला चतुरस्त्र व अतुलनीय पराक्रम ह्या नव्या पेशव्याच्या अगीं आहे याविषयी तिची पेशव्याच्या प्रारभींच्या कामगिरीवरूनच कल्पना झाली होती परंतु हे पेशवेही आपणाशीं हाडवैऱ्याप्रमाणे वागून आपणाला सदैव पाण्यात पाहणार, ही निराशेची खूणगाठ तिनें आपल्या अंतःकरणात मारून ठेवली होती ते पेशवे इतक्या निरभिमानाने व प्रेमळपणानें आपणासमोर एखाद्या लेंकरासाखे उभे राहिलेले पाहून तिचें वात्सल्यप्रेम कसे उचंबळून येणार नाहीं ?

"ये नाना, माझ्याशेजारीं बैस ये." असें म्हणून ताराबाई पेशव्याना हाताशीं धरून आपल्या शेजारीं बसवू लागली पण पेशवे तिच्या पाया-पाशीं बसकण मारून म्हणाले, "हे स्थानच मला अधिक बहुमानाचे वाटते. मासाहेबाच्या शुभाशीर्वादानें मोठमोठे राजेमहाराजे व चक्रवर्ती मला बरो-बरीनें बसविणारे भेटतील, पण त्या बहुमानाला या बहुमानाची सर येणार नाहीं. आम्ही धसमुसळेपणानें आत आल्यामुळें आपली काहीं गैरसोय तर झाली नाहीं ना ?"

"नाहीं. गैरसोय कसली होणार? माझ्यापाशीं आता आत बाहेर अशा दुहेरी हेतूने वाळण्यासारखे गुपित काहींच उरलेलें नाहीं. उलट मी तर म्हणत्ये तूं आणि ही सारी मंडळी यावेळीं इकडे आला, हें फार चागलें झाले." तारा-

बाई खासेरावाकडे पाहत म्हणाली, "हे गृहस्थ मुद्दाम कोल्हापूर व सातारा याची एकी करण्याच्या स्तुत्य कामगिरीवर इकडे आले आहेत ही दोन्ही राज्यें मिळून एक सयुक्त साम्राज्य स्थापन होण्यात माझा गौरव आहे असें हे म्हणतात, व मलाही तें पटते या त्याच्या योजनेला मूर्त स्वरूप देणें आता तुम्हा सर्वाच्या हातीं आहे"

पेशवे वगैरे मडळी आत आली, तेव्हाच ही पिडा यावेळी इकडे कशाला आली, असे म्हणून खासेराव मनातल्या मनात जळफळू लागले होते. ताराबाईशीं पेशवे इतक्या प्रेमळपणाने वागले व तिनेही त्याना तसेंच प्रेमळपणानें वागविलें ते पाहून आपल्या भेदनीतीचा ताराबाईपाशीं काहीं उपयोग होणार नाहीं असे त्याना वाटू लागले. आणि आता ताराबाईने तें गुपित अखेरच्या निर्णयासाठीं पेशव्यासमोर उघडे केल्यानतर तर त्याच्या निराशेला पारावार राहिला नाही त्यानीं कोल्हापूर सोडताना सुमुहूर्त पाहिला होता, आज गडावर येतानाही त्याच आपल्या खास ज्योतिष्याकडून सुदिन व सुवेळ पाहिली होती, पण तें सारे भविष्य ततोतत खोटें ठरलेले पाहताच तो राग दुसऱ्या कोणावरही कढण्याला जागा नाहीं म्हणून त्या ज्योतिष्यावरच काढला त्याला मनातल्या मनात शिव्याची लाखोली मोजीत ते ताराबाईला म्हणाले, "श्रीमताशीं माझें या बाबतींत बोलणे पूर्वींच झाले आहे. आता त्याची इथे पुन्हा वाच्यता होण्याचे काहीं कारण नाहीं. आपला अभिप्राय मला हवा होता, तोही मिळाला. आता मीं आपली रजा घ्यावी काय ?"

"त्यानीं आम्हीं एकविचारें पुढें काय करावयाचे ते परवाच ठरवून टाकले आहे." पेशवे म्हणाले, व सर्व मडळीकडे पाहून त्यानीं स्मितहास्य केले.

खासेरावानीं अत्यत उतावळेपणाने तेथून पाय काढला ते निघून गेल्यावर सर्वाच्या मनमोकळ्या गप्पागोष्टी सुरू झाल्या. ताराबाईने खासेरावाची शिष्टाई निवेदन केली, पेशव्यानीं आपणाकडील त्याच्या शिष्टाईची हकिकत सागितली. त्याबरोबर सुखदुःखाच्या इतरही अनेक गोष्टी निघाल्या. त्या भरात पेशवे अशा अवेळी इकडे येण्याचाही आशय सागून मोकळे झाले. "ही स्वारी गडावर यावयाला निघाल्याची बातमी हेरामार्फत मिळाली,

आणि मासाहेबाच्या विशुद्ध अतःकरणाबद्दल आम्हाला आता लवमात्र शंका राहिलेली नाही, म्हणूनच आम्ही मुद्दाम एकजुटीनें इकडे आलों. नाहींतरी आम्हाला इतक्यात इकडे यावयाचेच होतें."

"पण हें असें का होतें याचा आपण मंडळींनीं कधीं विचार केला आहे काय ?" ताराबाईनें पेशव्याकडे पाहून पण सर्वांना अनुलक्षून प्रश्न केला.

"मासाहेबाच्या दीर्घानुभवाच्या सूर्यासमोर स्वतःच्या तुटपुज्या अर्ध्या-कच्च्या चातुर्याची दिवटी पाजळण्याची आमची इच्छाच नाहीं." पेशवे उत्तरले.

"देवघरासभोवारची भिंत जर पक्की असती, तर असल्या उदीर-घुशी विचरांना आत घुसून देवाच्या डोक्यावर नाचता आलेंच नसतें." बोलतांना सर्वांच्या चेहऱ्यावर प्रश्नार्थक भाव उमटलेला ताराबाईनें पाहिला जवळ जवळ अर्ध शतक राजकारणात पोहलेली व उन्हाळे पावसाळे अनुभवलेली ती त्यामुळें तिला मनुष्यस्वभावाचें सूक्ष्म ज्ञान स्वाभाविकताच होतें. आपल्या समोरची मंडळी आपणाला लेंकराप्रमाणें असली व आपणाला वडीलपणाचा मान देत असली, तरी ती काही बोळयानें दूध पिणारी नाहींत, भीडमुर्वतीखातर भलतीच गोष्ट त्यांच्याच्यानें कधींच मान्य करवणार नाहीं, हें तिला पक्कें माहीत होते. राजवटीच्या कारभाराचा व्यापक प्रश्न सोडवितांना गेल्या अर्धशतकाचा इतिहास व त्यात स्वतः घेतलेला प्रत्यक्षाप्रत्यक्ष भाग तिच्या मनश्चक्षूसमोर मूर्तिमत उभा होता आज जे कलहाचे वृक्ष वाढून सुसंगत राज्यकारभाराच्या रथाला मार्गात जागोजागीं नडत होते, त्या वृक्षांचे बीजारोपण मूळ आपल्याच हातून झालें असल्याची जाणीव तिला होती. असें असताही आजवर आपल्या व हातून निरनिराळ्या गुप्त कारस्थानांच्या रूपानें त्या कलहवृक्षांना खतपाणी मिळून ते फोफावत होते, म्हणूनच आजपावेतों शाहूमहाराजाचा पक्ष, त्यांच्या राण्यांचा पक्ष, कोल्हापूरकराचा पक्ष, दाभाडे-गायकवाडादि इतर मराठे सरदारांचा पक्ष, प्रतिनिधि-मुतालिक वगैरे घरच्या विरोधकांचा पक्ष, यापैकीं कोणीच आपणावर विश्वास टाकण्याला तयार नाहीं व त्यामुळे आपली स्थिति सर्वस्वी त्रिशंकूसारखी झाली आहे हें सर्व या क्षणींही तिला आठवत होतें. त्याच अप्रिय भूतकाळाची आठवण

आपणाला यावेळीं करून देण्याचा विचार समोर बसलेल्या दरोबस्त मंडळी-च्या डोळ्यात घोळू लागला आहे हें हेरून ताराबाईनें त्या दिलसफाईच्या बैठकींत दुधात साखर टाकली, "माझा कारभार व माझी कारवाई पुष्कळशा अंशीं ह्या कलहाच्या मुळाशीं आहे, हें मी तुम्हा लेंकरापाशीं मुळींच ना-कबूल करीत नाहीं. एकमेकावर शाब्दिक व बौद्धिक विजय मिळवीत बसणें ही व्यक्तींच्या अहंकाराची परमावधि होय. जबाबदार कर्त्या व्यक्ति ह्या अहंकाराच्या आहारीं गेल्या कीं लोककार्याची हानि व्हायची हें ठरलेलेंच. मला आज इथे तुमच्यावर शाब्दिक विजय मुळींच मिळवायचा नाहीं, मी इथवरचा पल्ला गाठताना कसकसा मार्ग चुकलें, कसकसे धोके मला भोवले तें सागून मागच्याला ठेच पुढचा शहाणा हेच तुम्हा सर्वांना शिकवणार आहे...."

ताराबाईचे कलहाच्या फोडीचे पहिले उद्गार ऐकून चिटणीस, सुमत, पेशवे वगैरे मंडळीचे ओंठ 'या सगळ्याला कारण आपणच ना' असें तिला विचारण्यासाठीं स्फुरत होते, ती त्याची भावना तिची स्वतःची कबुली ऐकून एका क्षणात बदलली, व केव्हाही एका हाताने टाळी वाजत नाहीं हा विवेक त्याना सुचला. मनुष्यस्वभावाची हीच तर मौज आहे. ज्या रगाची काच डोळ्यासमोर धरावी त्या रगाचें सभोंवारचे जग मनुष्याला दिसतें. चाळीस वर्षांपूर्वी शाहूमहाराजाची बादशाही कैदेंतून सुटका होऊन ते दक्षिणेंत यावयाला निघाल्यापासून ताराबाईकडून त्याना झालेला विरोध एकागी व विघातक मनोवृत्तीचा द्योतक असला तरी महाराज मराठशाहीचे अधिपति झाल्यामुळें मराठशाहीचा बोज कमी होऊन तिच्या इभ्रतीला धक्का लागेल अशी ताराबाईची प्रामाणिक समजूत होती, असें त्या मंडळीच्या मनाला तेवढ्या क्षणापुरते तरी वाटू लागलें.

इतका वेळ एकटे पेशवेच बोलत होते. आता चिटणीस बोलू लागले, "मासाहेबाचे आताचे उद्गार हें त्याच्या मनाच्या उदारतेचें द्योतक आहे. आजपावेतोंचा चाळीस वर्षांचा इतिहास हा एक प्रकारें समरागणाचा इतिहास आहे. तें समर आता थाबलें आहे, व सधि झाला आहे. यावेळीं त्या समरात आता या आणीबाणीच्या प्रसगीं एकोप्यानें वागण्याची वेळ आली आहे."

" मग मी काय करू, सांगा " ताराबाई म्हणाली, " माझे शेष आयुष्य मी महाराष्ट्राच्या अभ्युदयाकारणे वेचून त्याचे सोने व्हावे यास्तव तुमच्या स्वाधीन केले आहे. तुम्ही सांगाल ते करायला मी आनंदाने तयार आहे "

" कोल्हापूरकराचा विचार आपणाला पसंत नाहीं असेच आम्हीं धरून चालावयाचे ना? " चिटणिसांनीं प्रश्न केला

" अर्थात्! तशा योजनेने कलह न मिटतां उलट जास्त वाढतील. मात्र पेशव्याची जर काहीं निराळी योजना असेल तर गोष्ट निराळी कारण ह्या एकीच्या योजनेचे जनक ते आहेत आजला इथे जी मुख्य भानगड उत्पन्न झाली आहे, ती शाहूमहाराजाच्या पश्चात राज्याची व्यवस्था कशी लावावयाची याविषयीं. "

" ती भानगड मागेच मिटली आहे भोसले छत्रपतींचा औरस वंश छत्रपति धाकट्या शिवाजी महाराजाचा पुत्र मीं आजवर जिवापलीकडे जतन करून पानगावीं गुप्त वेशात ठेवला आहे त्याला तुम्हीं सर्वांनीं आणून एक विचारे गादीवर बसविलेत कीं सर्वच भानगडी मिटल्या. सातारा व कोल्हापूर ह्या गाद्या जर एक व्हायच्या असतील तर त्या एकोप्यालाही हा एक शुभमुहूर्तच होईल "

" नाहीं ते मात्र कालत्रयींही शक्य नाहीं कारण, राजाराममहाराजाना आम्हीं पानगावाहून आणवून राज्याभिषेक केला, तरी त्याना दोन्ही ठिकाणच्या राणीसाहेबाकडून नेहमी उपद्रव होत राहणार, त्याच्या जिवावर केव्हा संकट ओढवेल याचा भरवसा नाही त्यातल्या त्यात शेजारापेक्षा घरचीच भीती मला जास्त वाटते आमच्या थोरल्या आईसाहेबाच्या अंगीं इतका सुजाणपणा असता, तर प्रथमच त्यानीं राजाराममहाराजावर मारेकरी का घातले असते? सध्या त्या राजाराममहाराजाना ठार करण्याच्या कामी आपण यशस्वी झालों अशा घमेंडींत आहेत, व मुधोजी भोसल्याना दत्तक घेण्याचाही त्याचा विचार मुक्रर झाला असून लौकरच—बहुधा ह्या पाच चार दिवसात मुधोजी हे महाराजाचे पाहुणे म्हणून साताऱ्यात येऊन दाखल होतील "

" एथवर सूनबाईंनीं मजल मारली काय?" ताराबाईनें नवलाने प्रश्न केला

" होय एथवरचेच काय घेऊन बसला आपण मासाहेब? त्यानीं यापुढेही फार मोठी मजल मारली आहे. त्यानीं कोणालाही महाराजाची

भेट घेण्याची पूर्ण बदी केली आहे. आतील कारस्थाने बाहेर कळू द्यावयाचीं नाहींत, बाहेरील गोष्टी आत महाराजाना कळू द्यावयाच्या नाहींत, आम्हा कोणाचीही सल्ला महाराजाना घेऊ न देता प्रत्येक मनकवड्या योजनेला बळजोरीनें त्याची समति मिळवावयाची, व त्याचा मनोदय आम्हाला कळू द्यावयाचा नाही, अशी कडेकोट व्यवस्था राजवाड्यात झाली आहे, त्याप्रमाणेच ह्या भानगडीचा निकाल समरागणावर लावून घेणें प्राप्त होणार आहे हें आगाऊ ओळखून–किंवा आम्हा नावडत्या माणसाना ऐन वेळीं ठार करून अथवा तादळातल्या खड्याप्रमाणे वेचून बाजूला एखाद्या गडावर तुरुगवासात फेंकून देण्यासाठीं सैन्याचीही जुळवाजुळव त्यानीं चालविली आहे. ”

“ तिला तिच्यासारखे आणखी कोणकोण घरभेदे मिळाले आहेत तें तरी कळू दे ? ”

“ पत प्रतिनिधि व मुतालिक हे त्याचे दोघे मानसपुत्र आहेतच. त्याखेरीज आपला पुत्र छत्रपति होणार या आशेने रघूजीबाबा त्याच्या बाजूचे. कैलासवासी तीर्थरूपानीं सेनापति दाभाड्याच्या देशद्रोही चाळ्याना आळा घातला, त्याचा सूड माझ्यावर उगवण्यासाठीं दाभाडे, त्याचे कैवारी म्हणून गायकवाड, वगैरे पेशव्याच्या दावेदाराना काय तोटा ? शिवाय नाईक तिकडे कर्नाटकात पेशव्याच्या बाराव्याला जेवण्याची वाट पाहत बसले आहेतच ! त्याना कोणीं बोलावले नाहीं तरी ते आपण होऊन माझ्या डोक्यात दगड घालण्यासाठीं सोवळ्याने तर सोवळ्याने, बोडक्याने तर बोडक्याने धावून येतील फत्तेसिंग बाबानाही कळकळीचे आमत्रण गेले आहे असें ऐकतों. त्याच्या एका भरवशाच्या म्हशीने मात्र टोणगा घातला ! ” असे म्हणून पेशव्यानीं हसऱ्या नजरेने चिटणिसाकडे पाहिलें, व लगेच ते सुमत आणि पोतनीस याच्याकडे पाहून म्हणाले, “ तसेच हे दोन देवही थोरल्या आईसाहेबाच्या नवसाला पावले नाहींत ”

“ एकूण राजधानीचे रणक्षेत्र बनणार तर !” ताराबाई चितेत पडून उद्गारली

“ होय असा रग दिसतो खरा. यावेळीं आम्हा कारभाऱ्याची फार नाजुक स्थिति झाली आहे. महाराजाचा मनोदय खरा काय आहे तो कळण्याला काहींच मार्ग नाहीं. ” पेशवे म्हणाले.

"शाहूचा मनोदय बायकोच्या तंत्रानें वागून राज्याचें वाटोळें करण्याचा खास नसेल. पूर्वीचा शाहू आणि आजचा शाहू यांत जमीन–अस्मानाचें अंतर आहे." ताराबाई म्हणाली.

"तथापि त्याच्या अनुज्ञेशिवाय आपणाला कांहीं करता येत नाहीं हें तर खरें ना? तिकडे थोरल्या आईसाहेब त्यांना कसें पेंचात पकडतील व काय काय आज्ञापत्रें त्यांना काढायला लावतील याचा काय नेम? आम्हीं विरोधाचा प्रतिकार करण्याची कांहीं तजवीज न करता स्वस्थ बसावें तर केव्हां कसा प्रसंग ओढवेल याचा नेम नाहीं! बरें, प्रतिकाराची तयारी करावी तर ज्यांना आतल्या भानगडी माहीत नाहींत त्यांचा स्वाभाविक पणेंच असा गैरसमज होणार कीं पेशवे वगैरे मंडळीनें महाराजाच्या हयातींतच त्याचें राज्य बळकावण्याची तयारी चालविली आहे. आतां यांतून मार्ग कसा काढावा हेंच कांहीं कळत नाहीं."

"ह्या सर्व घोंटाळ्याचा समाधानकारक निकाल लागावयाचा तर शाहू, सूनबाई व तुम्ही सर्व त्याचे डावे उजवे हात यांनीं एकत्र बसून विचार केला पाहिजे. तसा योग मी शक्य तों जुळवून आणीन म्हणत्यें. माझा-देखील सूनबाईसमोर यावेळीं निभाव लागेल असा भरवसा मला नाहीं. मागें मीं राजवाड्यांत गेल्या वेळीं तिचें माझ्याशीं वर्तन किती बेपर्वाईचें होतें तें तुम्ही सर्वांनीं पाहिलेंच आहे. तथापि कार्यावर दृष्टि ठेवून मी असे अपमान आजवर गिळीत आल्यें तसेच पुढेंही गिळीन. एवढी मात्र मला तुमच्याकडून खात्री पाहिजे आहे कीं राजवंशाचा एकुलता एक अंकुर पानगांवीं रानावनांत कसा बसा तग धरून जो राहिला आहे, त्याची नीट निगा राहून तेथूनच भोंसल्याच्या औरस राजवंशाचा वेलविस्तार वाढेल अशी खटपट करण्यांत तुमच्याकडून कसूर होणार नाहीं."

लगेच पेशवे, चिटणीस वगैरे सर्व मंडळीनें ताराबाईच्या पायांना हात लावून तशी शपथ घेतली.

प्रकरण २९. ब

# गुलाब आणि निवडुंग

राजरोसपणें मागून सवरून प्रतापराव्या पिशाच्चानें तुळाजीचें आणि त्याबरोबरच आपलें म्हणजे पुतळेचेंही घर पेटवून दिल्यापासून पुतळेच्या मनाला एवढा जबरदस्त धक्का बसला कीं, ती पुढे दोन तीन दिवस भीतीनें आथरुणावरून उठलीही नाहीं. मग तुळाजीची भेट घेणं वगैरे तर दूरच राहिलें! पण तीन दिवसात तिच्या मनातील भय हळू हळू कमी झाले, व जसजशी अमळ हुशारी वाटू लागली, तसतशी तिची उत्कंठा वाढू लागली. तुळाजीने आजवर आणखी काय काय भानगडी केल्या असतील? चिटणिसानीं त्याला विचारलें असेलच कीं तुझ्या घराला आग लागली त्यातून तुझा बचाव कसा झाला. तर त्यानें त्याना काय उत्तर दिले असेल? राणीचे डावपेंच कोठवर आले असतील? आणि ह्या सर्व विचारावर उत्कटतेची कडी करणारा तिचा मनकवडा विचार . तो तरुण बैरागी!

पुतळेने आपल्या परीनें त्या तीन चार दिवसात त्या बैराग्याचा विचार आपल्या मनातून काढून टाकण्याचा शिकस्तीचा प्रयत्न करून पाहिला. पण परिणाम नेमका उलटा झाला. तो बैरागी तिला जास्त आवडता होऊ लागला! असल्या कामनेनें त्याचें चिंतन करण्यात तिला जितकी लाज वाटे तितकाच आनंदही वाटे व तितकेंच प्रतापरावाच्या पिशाच्चाचें भयही वाटे. पण पुन्हा ती त्या पिशाच्चाचे, त्याच्या घराना आग लागली त्या दिवशींचे उद्गार आठवून स्वतःच्या मनाचा विरंगुळा करी, "योग्य माणसाशीं लग्न गाठ मारण्याला हरकत नाहीं असें त्यानींच तर मला सांगितलें आहे. मग मीं माझ्या मनानें योग्य वाटणाऱ्या ह्या बैराग्याची निवड केली तर त्याना तें कां रुचणार नाहीं?"

त्या भरांत एकदां तिच्या डोक्यात असाही विचार भरारी मारून गेला कीं त्या बैराग्याला काहीं सिद्धि तर वश नसेल? आणि त्या सिद्धीचा प्रयोग

त्यानें वशीकरणासाठीं आपणावर तर केला नसेल? पण दुसऱ्याच क्षणाला तिचा तिलाच हा सशय अधमपणाचा वाटला. असा विकल्प आपल्या मनात यावयाला त्या बैराग्याचे वर्तन कोणत्याही प्रकारें कारण नसून केवळ हें आपल्या ऐहिक सुखलालसाच्या मालिन्यानें मलिन झालेल्या मनोभावनाचें प्रतिबिम्ब आहे हें ती तेव्हाच उमगली, व स्वतःशीं म्हणाली, "साधुसत आमच्यासारख्या ससारकर्दमात खितपत पडलेल्या लोभी जीवाच्या सपर्का पासून दूर रानावनात अथवा स्मशानात, उच्च पर्वताच्या गुहात अथवा गगा–यमुना–नर्मदा अशा पुण्यसरिताच्या काठच्या निबिड अरण्यात राहतात ते एवढ्याचसाठीं."

विचारी माणसाच्या हातून अकारण कोणा सज्जनाचा अपराध घडला कीं अपराध करणाऱ्या माणसाच्या मनाला पश्चात्तापाची टागणी लागतेच लागते. पुतळाही अशीच आपली आपण न्यायाधीश बनली, त्या न्यायासनासमोर तिचा साधुनिंदेचा व अमर्याद ऐहिक सुखलोलुपतेचा अपराध सिद्ध झाला, आणि तिने स्वतःलाच एकाएकीं भावनावश होऊन शिक्षा दिली, "मरण! मरण! असल्या भयकर अपराधाना मरणाखेरीज दुसरी शिक्षाच नाहीं."

ती शिक्षा भोगण्याला पुतळा तयार झाली माहुलीला जाऊन त्या तरुण बैराग्याची भेट घ्यावयाची, त्याच्या पायावर मस्तक ठेवून त्याची मनःपूर्वक क्षमा मागावयाची, व तशीच जाऊन कृष्णा–कोयना सगमाच्या डोहात उडी घ्यावयाची!

त्या विचारानें मस्तक भिरभिरल्यासारखी पुतळा आथरुणावरून उठली. तिला माहीत होते, त्या भूमींत ती जन्म घेऊन आजवर लहानाची मोठी झाली, त्या जन्मभूमीची आबाळ करण्याचे दुष्ट बेत सकवारबाई, प्रतिनिधि, मुतालिक वगैरे मडळीच्या मनात प्रामुख्याने घोळत होते ती आबाळ तिला तिच्या मतीप्रमाणें टाळता येण्याजोगी होती त्या कपूर्चीं कारस्थानें वेळोवेळीं प्रकाशात आणून तो भावी अनवस्थाप्रसगही तिला टाळता आला असता तिनें सकवारबाईशीं इतकी दावेदारी मनातून माडली होती, याचें मुख्य कारण तरी तिची ज्वलज्जहाल स्वदेशभाक्तिच होय. पण त्या ध्येयाची जाणीव तिला तिच्या आताच्या आत्महत्त्येच्या निर्धारापासून परावृत्त करूं

शकली नाहीं ती उठली, तिने थंड पाण्यानें चूळ भरून टाकली आणि देवाला नमस्कार केला. ती मनातून त्या घराचा शेवटचा निरोप घेत होती. तोच म्हातारी जागी झाली व मागील दारीं जाता जाता पुतळेला म्हणाली, " का ग आज इतकी लौकरशी उठलीस? रात्रभर देखील या कुशीवरून त्या कुशीवर एकसारखी तळमळत होतीस, झोंप लागली नाहीं वाटते? "

"नाहीं लागली नीटशी " पुतळा कांहींतरी उत्तरावयाचे म्हणून उत्तरली व बाहेर जाऊ लागली आपल्या मागे अनाथ म्हातारीचे कसे होईल, मुकुंदाची काळजी कोण घेईल, ही चिंता नेमकी त्याच वेळीं तिच्या अंतःकरणाचा चिमटा घेऊ लागली पण पुतळेने त्या चिमट्याला जुमानलें नाहीं. तिचा विचार म्हातारीला अथवा कोणालाही कळू न देता बाहेर निघून जावयाचा होता. पण म्हातारी जागी होऊन समोर उभीच राहिली, तेव्हा बाहेर जाण्यापुरती कांहींतरी सबब तिच्या तोंडावर फेकणे तिला प्राप्तच झालें. ती आपण होऊनच म्हातारीला म्हणाली, " आजी, मी माहुलीला जाऊन स्नान करून येत्ये. "

" इतक्या अपरात्रीं आणि एकटीच? "

" त्याला काय होते? चांगले स्वच्छ चांदणे पडले आहे. "

" बरे, जा पण लौकर माघारी मात्र ये हो! कदाचित् राजवाड्यातून थोरल्या आईसाहेबांकडून मनुष्य चौकशीला आला तर पंचाईत होईल "

" म्हातारीला निवारून पुतळा घराबाहेर पडते न पडते, तोच मुकुंदा झोंपेतून एकदम ओरडत जागा झाला त्याचा रूदनस्वर कानीं पडताच मात्र पुतळेचे बाहेर जाण्यासाठीं जो डलेले पाऊल आतल्या आत घोटाळू लागले

" आईऽ! आईऽऽ! " मुकुंदाने रडत रडत मोठमोठ्यानें हाका मारण्याला सुरुवात केली एवढेसे बालक, आणि त्याच्या त्या केविलवाण्या हाका पण पुतळा त्या स्नेहबंधनात एका क्षणात इतकी बांधली गेली कीं घर सोडून जावयाचें बाजूलाच राहिले, व आत्महत्या करण्याचे तर त्याच्याही पेक्षा दूर राहिले ती तशीच धावत माघारी आली व मुकुंदाला उचलून घेऊन त्याची समजूत करू लागली

" आई! बाबा कुठे गेले ग? " मुकुंदाने आपलें अखंडित रडे थोपवून हुंदक्याच्या टापूत आणून विचारले

पुतळेच्या डोळ्याना खळ्कन् पाणी आलें. तिनें पदरानें डोळे पुशीत मुकुदाच्या तोंडावरून प्रेमानें हात फिरवून त्याची नेहमींप्रमाणें समजूत केली, " बाळ ! ते देवाच्या घरीं गेले आहेत "

" ते माघारे कधीं येतील ग ? " मुकुदानें विचारलें

" तू मोठा झालास कीं नाहीं, म्हणजे येतील ते माघारे. " पुतळेनें उत्तर दिलें. मुकुदानें असले प्रश्न नेहमीं विचारावे, व पुतळेनें त्याला नेहमीं अशीं उडवाउडवीचीं उत्तरें देऊन त्याची समजूत करण्याचा प्रयत्न करावा.

" आई ! बाबा आता मला भेटले होते ते बाहेर निघाले व मीं त्याना जाऊ नको म्हणून सागितलें, तेव्हा त्यानीं मला सागितलें कीं तू आईपाशीं राहा. मी त्याना म्हटलें मीं तुमच्याबरोबर येणार तेव्हा ते मला म्हणाले कीं आईला घरात कोणी सोबत नाहीं, तू तिच्या सोबतीला रहा. आई ! तू कुठें ग चालली होतीस ? बाबाबरोबर का ? "

झालें ! त्या बालकाच्या त्या निर्मल बोबड्या बोलानीं पुन्हा विचाराचें सुदर्शन पुतळेच्या मस्तकात जोराजोरानें फिरतें केलें. " ते आता माझ्या बाळाला भेटून गेले, तें अर्थात् त्याला स्वप्न पडलें असेल. पण स्वप्नातदेखील ते त्याला म्हणाले कीं तू आपल्या आईच्या सोबतीला रहा माझी आणि माझ्या लेंकराची मरणोत्तर देखील ते इतकी काळजी घेतात. मागें आमचें कसें होईल ह्या चिंतेनें ते पिशाचयोनींतील बंधन मुद्दाम पत्करून अशी आमच्यावर सदैव मायेची पाखरछाया धरून आहेत. पुरुषाचें अंतःकरण कठोर असतें आणि स्त्रीचें प्रेमळ असते असें म्हणतात. पण इथें ते माझ्यासाठीं व माझ्या बाळासाठीं इतका जीव टाकतात आणि मी—मी ? मी आमच्या बाळाला ह्या जगात उघड्यावर टाकून आत्महत्या करायला तयार झाल्यें ! हें काय माझ्या कोमल हृदयाचें लक्षण ? . . "

भरतीच्या वेळीं समुद्र कोणीं त्याला आगठींतून जाणारी बहुमोल शालजोडी तिच्या टोंकाला कोहिनूर हिऱ्यासारखीं त्रिभुवनश्रेष्ठ रत्नें बाधून अर्पण केली तरी तीही निरपेक्षपणे आपल्या लाटानीं लाथाडीत किनाऱ्याला फेंकून देतो. पण तोच का ओहोटी सुरू झाली, कीं तोच समुद्र एखाद्या बुभुक्षित कृपणासारखा काठचा कुजका नासका पानपाचोळाही आपल्या लाटाबरोबर वाहून घेऊन जातो. पुतळेच्या वैराग्यशील विचाराची भरतीची वेळा संपली,

आणि ऐहिक व्यापाची ओहोटी तिथें सुरू झाली. मुकुंदा तिचा अगदीं जीव कीं प्राण पुत्र असला, तरी त्याची कसली इतकी पर्वा? स्वतःच्या जीवनसर्वस्वावर खरोखर उदार झालेल्या जीवाला आप्तपरिवाराची इतकी काळजी कशाला हवी? मुकुंदा काहीं पुतळेचा औरस मुलगा नव्हता. तो अनाथ जीव तिनें हौसेखातर आणून पाळलेला. पण ..नाहीं!–तो अनाथ आहे, म्हणूनच त्याला जगात निराधार सोडून जाणें मला शोभत नाहीं." असें पुतळा आपल्या मनाला सांगू लागली व त्यावर आणखी मल्लीनाथी करू लागली, "हा जर माझा पोटजाळ–माझा सत्तेचा मुलगा असता, तर गोष्ट निराळी होती, त्याला अशा स्थितींत सोडून गेल्याबद्दल कोणीं कांहींही म्हणालें, असतें तरी–पण तसे कोणी काहीं म्हणालेंच नसतें तथापि मुकुंदा हा अनाथ मुलगा मीं जवळ केलेला आहे, त्याला सोडून मी गेल्यें तर सारें जग मला निष्ठुर पाषाणहृदयी लावसट म्हणेल यासाठीं मला असा अविचार करता कामा नये"

हे विचार पुतळेच्या मनात यावयाला आणि 'जय जय रघुवीर समर्थ' अशी ललकारणी दारातून तिच्या कानों पडावयाला एक गाठ पडली पुतळा मुकुंदाला हाताशीं धरून कोण साधु दाराशीं आला आहे तें पाहावयाला जाते, तोंच तोच तरुण बैरागी दारात उभा! त्यानें भगवी कफनी धारण केली होती, हातात कुबडी होती, काखेला झोळी होती व माहुलीच्या स्मशानात धाकट्या राणीच्या आपल्या धनिणीच्या चितेपाशीं जागत बसणारी इमानी राईही त्याच्या बरोबर होती!

सूर्योदय होताच अंधाराचा नायनाट व्हावा त्याप्रमाणें त्या तरुण बैराग्याचें दर्शन होताच पुतळेच्या मनातील उद्वेग व निराशा चटसारी लयाला गेली. पण मुखानें बोलवेना मात्र. कांहींतरी बोलावयाचे म्हणून ती राईकडे वळून म्हणाली, "राई! तू इकडे कुठे ग?"

राई मुकीच खरी; पण ती आपल्या मुक्या भाषेत उत्तरली. तिनें शेपूट हलवीत आपले पुढचे दोन पाय उचलून पुतळेच्या छातीवर ठेवले पुतळा लडिवाळपणानें तिला उचलून घेऊन मटामट तिचे मुके घेऊ लागली.

तरुण बैरागी पुतळेला म्हणाला, "तुझें घर अग्निनारायणाच्या भक्ष्यस्थानीं पडलें असें ऐकलें, म्हणून मुद्दाम चौकशीसाठीं आलों. तू खुशाल आहेस ना?"

यावर पुतळेने ओशाळेपणाने मान खालीं घालून एक शद्वी उत्तर दिलें, "होय."

"हा कोण, तुझा मुलगा का?" बैराग्याने मुकुदाकडे पाहत विचारलें.

"होय." पुतळा पूर्ववत् अधोवदनपूर्वक उत्तरली.

"नाव काय याचें?" त्या तरुण बैराग्याने स्नेहाळू दृष्टीनें त्या मुलाकडे टक लावून पाहत विचारलें

मुकुदा फार धीट व पोरवयातही पुष्कळच समयज्ञ होता. तो आपण होऊन पुढे झाला व बैराग्याला म्हणाला, "अहो, मला विचारा कीं तिला का विचारता?"

बैराग्याला मुकुदाच्या धीटपणाचे कौतुक वाटलें त्यानें आपल्या उजव्या हाताने त्याच्या हनुवटीला स्पर्श करून विचारले, "काय नाव तुझें बाळ?"

"माझें नाव मुकुदा आणि माझ्या आईचें नाव साळू" मुकुदा पुतळेचा पदर आपल्या बाळदाताखालीं धरून ओढीत म्हणाला.

"साळू?" बैराग्याने आश्चर्यचकित होऊन पुतळेकडे वळून विचारलें, "हा मुलगा तुझा नव्हे का?"

"अहो, ह्या आईचाच मी, पण माझ्या आईचें नाव साळू." मुकुदा पुन्हा उत्तरला.

"अनाथ मूल मीं जवळ केलें आहे" पुतळा पूर्ववत् ओशाळेपणानें उद्गारली.

"असें अनाथाचें रक्षण करण्याचे भाग्य ज्याना ज्याना लाभते, तींच माणसें खरीं पुण्यवान होत." बैरागी मुकुदाच्या बाळमुखाकडे आतुरतेनें निरखून पाहत उद्गारला.

तो बैरागी अंमळशानें निघून गेला. त्याच्या मागोमाग राईही निघून गेली पुतळाही एक दीर्घ उसासा सोडून मुकुदासह घरात गेली. "...हे इतक्या पहाटेला माझा तपास करण्यासाठीं का बरे आले? . नेहमीं माझ्याशीं निरिच्छतेने वागण्याची याची विरक्त वृत्ति ढळली आहे काय?.. माझ्या-विषयीं इतकी सहानुभूति याना का बरें वाटू लागली?.. परमेश्वर माझा धावा ऐकून मला सुखी करण्यासाठीं याच्या मनोवृत्तींत बदल तर करीत नसेल ना:?.." असे नव्या विचाराचे हेलकावे खात खात ती सकाळच्या प्रहरीं

घरच्या कामधद्याला हात घालते, तोंच तिला बाहेरच्या दरवाज्यातून हाक ऐकू आली, " पुतळे ! "

पुतळेनें ती हाक ऐकता क्षणीं कपाळाला आठया घातल्या. ती हाक तुळाजीचीच होती तुळाजी कोणत्या का हीन हेतूने प्रेरित होऊन पुतळेकडे आला असेना ! जगात गुलाबाप्रमाणेंच काटेरी निवडुगानाही मोल आहे. इतका वेळ पुतळेनें गुलाबाच्या ताटव्यापाशीं उभें राहून वेळ घालविला, व आता ती शत्रूच्या मार्गात काटे पसरण्याकरिता निवडुगाचा फड तोडण्यासाठीं तुळाजीच्या हाकेला ओ देऊन बाहेर गेली

## प्रकरण २० वें

# दोन्ही टोळ्यांची भेट

खासेराव सर्व व जुनीं आपल्या शिष्टाईत अयशस्वी ठरून सातारा सोडून कोल्हापूराला माघारे निघून गेले, त्यामुळे आपल्या पाठीची ब्याद टळली असें सर्वांनाच हायसें वाटलें ते निघून जाईतों चार दिवसगावतों पेशवे म्हणा, ताराबाई म्हणा, सकवारबाइ व तिचा पक्ष म्हणा, कोणालाच स्वस्थता अशी लाभली नाहीं. कोल्हापूरकराचा एवढा दरारा सर्वांना वाटत होता असें नव्हे. पण हाडाभर दूध नासावयाला एक मिठाचा खडाही पुरेसा होतो. आणि दुधाच्या हाड्याचें नाहीं तरी मिठाच्या खड्याचें महत्त्व त्या प्रसंगीं कोल्हापुरकराना खास होतें.

ती एक ब्याद टळल्यावर पेशवे, चिटणीस वगैरे मडळी गडावर ताराबाईच्या वाड्यात ठरल्याप्रमाणें महाराजासह सर्वांनीं एकत्र बसून इष्ट तो विचारविनिमय करावा ह्या उद्योगाला लागली. ती सिद्धता त्यानीं कैक महिने चालविली होती. पण प्रत्येकाला विहीर खणता खणता पाणी लागण्यापूर्वीच शेखडासारखा कठीण खडक लागला. ताराबाईनें आपल्या कारभाऱ्याला महाराजाकडे पाठवून अशा भेटीची मागणी केली; पण तिला परस्पर सकवारबाईकडून नकार मिळाला. इतकेंच काय, पण सकवारबाई अथवा तिचा कारभारी याना गडाबाहेर पडण्याचीही बदी सकवारबाईनें आपल्या अधिकारात केली. पेशव्याना महाराज सकवारबाईच्या नजरकैदेंत आहेत हें माहीत असताही त्यानीं आपण भेटीला न गेल्यामुळें महाराजाच्या मनात भलताच विकल्प येईल या भयानें राजवाड्यावर जाऊन एकदोनदा त्याची भेट घेण्याचा प्रयत्न केला. पण तो निष्फल झाला. दुसऱ्या वेळीं तर सकवारबाईनें रामाजी शिवदेवाच्या हातीं पेशव्याना असा रोकडा जबाब पाठविला, "महाराजानीं प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें सर्व राज्यकारभार आमच्यावर सोंपविला

आहे, व यापुढे तुम्हाला आमच्या आज्ञेत वागणें प्राप्त आहे. यापुढें राज्य-कारभारातील बारीक सारीक बाबदेखील तुम्ही आमच्या विचाराखेरीज निकालात काढता कामा नये महाराजाच्या इच्छेनुसार व त्याच्याच आज्ञे-वरून श्रीमत मुधोजी भोंसल्याना दत्तक घ्यावयाचें ठरलें आहे. तो समारभ लौकरच सुमुहूर्त पाहून पार पाडावयाचा आहे. त्या योजनेला तुमची व इतर कारभारी मडळीची पूर्ण सहानुभूति असल्याचें कळवून त्या समारभाच्या तयारीला लागावे. तुम्ही गादीचे सेवक आहा. सेवेत अतर पडल्यास शासन करणें प्राप्त होईल तरी तसा प्रसग येऊ देऊ नये "

" पुढे ओढवणाऱ्या प्रसगाचीं हीं अशुभ चिन्हेच होत " पेशवे तो निरोप ऐकून आपल्याशीं म्हणाले.

" यावरून आपली काय पडावयाची ती समजूत पडली ना ? " यमाजीनें जणू काय हलवून खुंटा बळकट करण्यासाठीं विचारले.

पेशव्याना यमाजीच्या प्रश्नाचे क्षणभर आश्चर्य वाटले पण ते केवळ क्षणभरच. ते ओळखून होते कीं आज आपणाशीं बोलत आहे हा यमाजी बोलत नसून ही प्रत्यक्ष राणी सकवारबाईच त्याच्या मुखाने बोलते आहे. कुत्र्याला धन्यानें ज्याच्यावर छूः करावे त्याच्यावर तो तुटून पडणार त्यात कुत्र्याला दोष देण्यात काय फायदा, अशी स्वतःची समजूत करून घेऊन त्यानीं यमाजीला निरोप दिला.

किंबहुना असा काहीं तरी अनवस्था प्रसग लौकरच ओढवणार हें पेशवे ओळखून होते, व त्या प्रसगाला तोड देण्याची तयारी त्यानीं एव्हापासूनच चालविली होती. राणी सकवारबाई निरनिराळया सरदाराना सैन्यासह साताऱ्यांत बोलावून रणकंदनाची तयारी करीत आहे असे नक्की कळल्यावर पेशव्याना तरी कसें स्वस्थ बसता येणार ? राणीशीं व इतर प्रतिस्पर्ध्याशीं समरागणात दोन हात करण्यासाठीं म्हणून नव्हे, तर स्वसरक्षणासाठीं व सकटकालीं दौलतीचें रक्षण करण्यासाठीं त्यानाही तोडीस तोड या न्यायाने सैन्याची व युद्धसामुग्री-ची जुळवाजुळव करणें प्राप्तच होतें. राणीने आपल्या खास विश्वासांतील लोकाना लढाईच्या तयारीनें निघून येण्यासाठीं तातडीचे गुप्त खलिते पाठविले व तसेंच पेशव्यानींही केले. त्यानीं शिंदे–होळकरांनाही ताबडतोब सैन्यासह निघून येण्याला पाचारण केलें.

ह्या तयारीची बाह्य कारणपरंपरा मात्र दोन पक्षाची दोन प्रकारची होती. राणीला आपल्या राणीपणाचा व त्याला चिकटलेल्या उपाधींचा मोठा आधार असला तरी तिच्या पक्षात मुत्सद्देगिरीचा बहुतेक अभाव होता तिने आपल्या साह्यकाऱ्याना पाचारण करताना ' पेशव्याच्या मगरमिठीतून दौलतीला वाचविण्यासाठीं व तुम्हाला आईप्रमाणे पूज्य असणाऱ्या तुमच्या राणीच्या वाड्याचा तुरुगवास चुकविण्यासाठीं तुम्ही यावे ' अशा चढाईच्या रघड्या भाषेत तयारी चालविली होती पण पेशवे हे मुत्सद्याचे मुत्सद्दी असल्याने त्यानीं हीं गृहछिद्रे कोठेंही अशी उघडीं करून दाखविलीं नाहींत 'श्रीमान स्वामींचा अतकाळ समीप आला आहे राजवटीला मागे धनी कोणी नसल्यामुळे धनी कोणीं व्हावे याविषयीं आपसात गोंधळ माजण्याचा फार सभव आहे ह्याचा फायदा घेऊन नाना पर्गेनी स्वार्थसाधु लोक आपल्या पोळीवर तूप ओढून घेण्याच्या खटपटींत आहेत स्वामीना हे ज्ञान आहे, व त्याच्याच आज्ञेवरून आपणास कळविण्यात येते कीं यावेळीं दौलतीची आबादीआबाद राखण्याची जबाबदारी आपणासारख्या दौलतीच्या मातबर सेवकावर आहे. यास्तव हे स्वामींचे आज्ञापत्र मिळताच अविलंबे करून निघून यावे, व दौलतीची आणि स्वामींची लाज राखावी ' हा पेशव्यानी शिंदे-होळकरापासून दरोबस्त स्वामिनिष्ठ सरदाराना पाठविलेल्या खलित्याचा साराश होता. राणीचे उपद्व्याप सर्वत्र माहीत झाल्याने त्यानीं ह्या बाबतींत टाकात गुतून वाच्यता करण्याचे काहीं कारण नव्हतेच ते काम राणीने आपल्या तर्फेने चालविलेच होते, व त्यात पेशव्याचा फायदाच होता.

तथापि राणीचा आजचा धमकीचा निरोप मात्र पेशव्याना अगदीं अनपेक्षित होता. त्यानीं आपल्या दूरदर्शीपणावर विश्वासून राणीच्या धिटाईची परिसीमा आपल्या मनाशीं ओळखून ठेवली होती, ती परिसीमा आजच्या पत्रात पुरी ओलाडली गेली होती त्यामुळें त्याच्या खबीर मनाचा पाया किंचित् हादरल्यासारखा झाला. ते कोणत्याही कठीण प्रसगाला भीत होते अशातला अर्थ नाही. निजामासारख्या प्रबळ शत्रूलादेखील ज्यानीं खडे चारले, ते घरच्या कलहाना थोडेच भितात! पण त्याना विषाद वाटत होता तो एवढाच कीं, या प्रसगीं आपण मातेसमान पूज्य मानलेल्या राणीपाशीं आपणाला समरागणात उभें राहावे लागणार, व जग मग म्हणणार कीं,

" पहा ! पेशवा राजवटीचा सेवक असून प्रत्यक्ष राणीवर शस्त्र उगारावयाला धजला ! "

हा पेशव्याचा चितानल पुढें कैक दिवस एकसारखा धुमसतच होता. प्रत्येक उजाडत्या दिवशीं पूर्वीच्याहून बिकट परिस्थिति निर्माण होत होती. हेराकडून, अन्य ठिकाणाहून पुण्याहून रोज नव्या नव्या बातम्या कानावर येऊन त्या चितानलात नव्या नव्या चिताविषयाच्या जळणाची भर पडत होती. आज काय, राणीने रघूजी भोसल्याना तातडीने निघून येण्याविषयीं पुन्हा साडणीस्वार रवाना केला ! उद्या काय, फत्तेसिंग भोसले वेशीपावेतों येऊन थडकले व प्रतिनिधि त्याना सामोरे गेले ! परवा काय, रगमहालात राणी, प्रतिनिधि, यमाजी, वगैरे मडळीचें गुप्त खलबत होऊन सर्वांनीं अखेरपावेतो राणीचा पक्ष न सोडण्याच्या शपथा घेतल्या ! याखेरीज रोज कोणा ना कोणा बुद्रुक सरदाराला अथवा शिलेदाराला राणीने राजवाड्यात बोलावून न्यावें, 'राणीशीं व महाराजाशीं इमान सोडणार नाहीं नाहीं, छत्रपतींच्या गादीशीं कोणत्याही प्रकारें विरोध करणार नाहीं, राणीच्या मांडी-वर जो दत्तक घेतला जाईल त्याच्याशीं स्वामिनिष्ठापूर्वक वागेन, यात अतर पडल्यास माझे बेचाळीस पूर्वज नरकात पडोत, देव माझे वाटोळे करो ' अशा शपथा त्याना घ्यावयाला लावून त्याना बेलभडार उचलावयाला लावावा, आणि त्याना कोणाला नकळत राजधानीबाहेर काढून द्यावें. गावोगावीं अनेक एकाड्या शिलेदाराना एकटे गाठून त्याना सैन्याची जमवाजमव करावयाला सागून खर्चासाठीं पैशाची खैरातही राणीच्या हस्तकानीं करावी. हा राणीचा उद्योग अगोदरपासूनचा असल्यानें रानात मरून पडलेल्या जनावरासभोंवार गर्दी करणाऱ्या गिधाड—कावळ्यासारखी सर्वांची तारांबळ उडाली होती. त्याप्रमाणें फितुरीला गोमेसारखे अनत पाय फुटून ती निरनिराळ्या नेत्याच्या नेतृत्वाखालील सेनापथकाच्या रूपाने राजधानीच्या आसपास मारागिरीच्या जागा साभाळून दबा धरून बसू लागल्याचे पेशव्याना स्पष्ट दिसत होते.

इकडे महाराजाची प्रकृति तर दिवसेदिवस जास्त बिघडत चालली. त्याना उतार पडण्याचीं काहीं चिन्हे दिसेनात. महाराज व कोणीही कार-भारी याची भेट होणें राणीच्या आज्ञेवरून अशक्य झाल्यामुळें त्याच्या प्रकृतीचें खरें मानही बाहेर कळणे मुष्किल झालें. राणीच्या तर्फेनें मुधोजी

भोंसल्याला दत्तक घेण्याची तयारी जारीने सुरू होतीच. तो सोहाळा वास्तविक इतक्यात आटोपूनही जावयाचा. परंतु मध्ये रघूजी भोंसल्याचा बाधा पडला. मुधोजी हा रघूजींच्या प्रीतीतील पुत्र नसल्याने त्याला राजपद प्राप्त करून देण्याच्या बाबतीत ते उदासीनता दाखवू लागले. अनेक बायकांच्या दादल्याचें त्याच्या अपत्यावरील प्रेम म्हणजे चिखलातली मेढ! ज्या सवतीनें त्या मेढीला आपणाकडे खेचून घ्यावें, तिच्या बाजूला ती झुकावयाची, व या खेचाखेंचीत सामान्यतः तट्टा घोड्यावरच्या गोमाशीप्रमाणे तरुण सवत जी असेल, तिचाच विजय व्हावयाचा. मुधोजीची आई म्हातारपणामुळें जुन्या जुन्हेराप्रमाणे झाली होती, व रघूजींच्या अनेक बायकांपैकीं दुसऱ्याच एका तरुण रूपवतीचा त्याच्यावर पगडा बसल्यामुळें ते तिच्या तंत्रानें अलीकडे वागू लागले होते आपली सवत राजमाता झालेली दुसऱ्या सवतीला कशी सहन होणार? तिनें रघूजींना आपल्या मोहपाशात जखडून ठेवल्यामुळे ते काहीं मनमोकळेपणाने ह्या दत्तविधानाला समति देईनात, व त्यामुळे तें घोंगडें तसेंच भिजत पडले होते. मुधोजी देऊर मुक्कामीं पित्याच्या समतीची चातकाप्रमाणे वाट पाहत बसला होता. ह्या एका गोष्टीच्या अनुषगानें पेशव्याच्या मार्गांत येणाऱ्या दुसऱ्या अनेक अडचणी परस्पर दूर अडविल्या गेल्या होत्या, व त्या निराशेच्या अधारनगरींत केवळ त्या एका आशेच्या किरणावर नजर देऊन पेशवे राजवटीचा ढासळता मनोरा सावरण्याचा प्रयत्न करीत होते. ह्या मानवी प्रयत्नाना दैवी प्रयत्नाची जोड म्हणून त्यानीं ठिक—ठिकाणच्या देवाना अनुष्ठाने, जपजाप्य, नवस वगैरे भक्तिभावाच्या आळवणीनें वश करण्याचा क्रमही अव्याहत सुरूच ठेवला होता.

असा क्रम सुरू असताना एके दिवशीं सायंकाळीं सूर्यास्ताच्या सुमाराला पेशवे रोजच्या स्नानसंध्येतून मोकळे झाले व पुजारी खिंडीच्या गणपतीचें तीर्थ घेऊन आला ते प्राशन करून सहज सदरेला जाऊन बसले, तोंच एकाएकीं त्याचा उजवा डोळा लवूं लागला.

"आज काय शुभलाभ घडणार आहे?" असे पेशवे स्वतःशीं उद्गारतात, तोंच महाराजाचा विश्वासू सेवक मल्लिक शेटजी तेथे आला व म्हणाला, "महाराजानीं श्रीमताना तावडतोब भेटीला बोलाविले आहे, त्वरित चलावें. एका क्षणाचाही विलब लावू नये."

पेशव्यांना त्या आमंत्रणाचें आश्चर्य वाटलें. ते आपल्या मनाला विचारूं लागले, "हें कसें झालें? थोरल्या आईसाहेबांना इतका विवेक कसा सुचला! वाघीण गाईच्या वासराला कसें पाजूं लागली?"

"महाराजांची प्रकृति कशी आहे?" पेशव्यांनीं शेटजीला विचारलें.

"आहे तशीच आहे. कांहीं उतार नाहीं गेला दिवस तो बरा म्हणावा लागतो काय ईश्वराची इच्छा असेल ती खरी."

"बरें, थोरल्या आईसाहेबांच्या संमतीने महाराजांनीं मला बोलावलें आहे काय? नाहींतर महाराजांची आज्ञा शिरसावंद्य मानून मीं यावें, व थोरल्या आईसाहेबांनीं पूर्ववत् आमच्या भेटीला प्रतिबंध करून मला माघारें लावून द्यावें. त्यातही मी अपमान मानणार नाहीं, महाराज व थोरल्या आईसाहेब दोघेंही मला मातृपितृस्थानीं पूज्य आहेत. त्यांच्यासमोर मीं मानापमानाची प्रतिष्ठा काय बाळगावी! पण महाराजांना तो प्रसंग अत्यंत दुःखदायक होईल. यापूर्वीचे असले कितिएक प्रसंग मला माहीत आहेत. महाराज असल्या गोष्टी फारच मनाला लावून घेतात म्हणून विचारतो"

"ती कांहींच काळजी करण्याचें कारण नाहीं. आपण तांबडतोब चला म्हणजे झालें." शेटजी सभोंवार एकवार चौफेर नजर टाकून म्हणाला, "थोरल्या आईसाहेबांचा आज सोमवार असल्यामुळें काशीविश्वेश्वराचें दर्शन घेण्याची त्यांना इच्छा झाली, त्या माहुलीला गेल्या आहेत, व त्या उद्यीक सुप्रभातीं संगमस्नान करून माघाऱ्या येणार आहेत."

"मुधोजी भोंसले आज यावयाचे आहेत असें ऐकलें तें खरें काय?"

"मींही नुसतें ऐकलें. पण जास्त कांहींच मला माहीत नाहीं."

"आणि आम्हांला त्याची रीतसर दादही नाहीं! मोठेंच आश्चर्य आहे! त्यांच्या यथोचित सत्काराची व्यवस्था ठेवण्याची थोरल्या आईसाहेबांनीं मला आज्ञादेखील केली होती. आणि एकाएकीं हें कसें काय?"

"ते सर्व विचार मागाहून. अगोदर आपण चला पाहूं! महाराज आपल्या वाटेकडे तहानेलेल्या चातकाप्रमाणें डोळे लावून बसले आहेत. थोरल्या आईसाहेब महालात नाहींत, तोंवर आपण त्यांच्याशीं काय बोलूं शकाल तेवढें. ही संधी गेली तर पुन्हा यावज्जीव महाराजांची व आपली भेट होणें दुरापास्त."

पेशवेही वेळेचें महत्त्व ओळखून तसेच अगरखा पगडी चढवून एका हुजऱ्यानिशीं महाराजाच्या भेटीला निघाले. मात्र तसा प्रसग पडलाच, आपणाला थोरल्या आईसाहेबानीं कपटानें सकटात लोटण्याचे योजिलेंच, तर बाहेर दाद लागण्यासाठीं हजार पाचशे सशस्त्र विश्वासू सैनिक त्यानीं दिल्या हांकेला धावून यावयाला सज्ज राहतील, व वेळींच त्याना धोक्याचा इशाराही देता येईल, अशी गुप्त व्यवस्था आपल्या हस्तकाकरवी करून ठेवली. राणी जरी राजवाड्यात नसल्याचें त्याना कळले होतें तरी एकदर प्रसग त्यांना बराच भयकर दिसत होता. अघोर राज्यतृष्णेला बळी पडून आपणाशीं समरागणात सामना देण्याला समर्थ असलेली राणी आपला घातपात करण्यालाही कमी करणार नाहीं, अशी त्याची खात्री होती.

रगमहाल काहीं पेशव्याच्या वाड्यापासून दूर नव्हता. त्यामुळें पेशवे पायीं पायींच रगमहालाकडे गेले पण आत प्रवेश केल्या क्षणापासून सभोंवारच्या एकदर वातावरणाचादेखील त्याना सशय येऊ लागला, “आपण आज वाघिणीच्या गुहेत तर जात नाहीं ना ? वाघीण आपणावर अचानक झडप घालून आपला नाश तर करणार नाहीं ना ?” त्यानीं आत प्रवेश करताना मार्गात दिसणाऱ्या प्रत्येक चौकीदाराचा व हुजऱ्याचा चेहरा न्याहाळून पाहावा, तों तेथे त्याना राणीच्या कारस्थानाचीं थोडीं फार जळमटें दाटलेलीं दिसावीं. तें पाहून त्यानीं आपल्या मनाशीं उद्गारावे, “कुत्रा कितीही इमानी असला तरी तो पिसाळला कीं त्या नादात चुकून स्वतःच्या धन्याला देखील चावा घेतो. हे सारे कुत्रे पिसाळलेले दिसतात. हे ऐन वेळीं आपणावर तुटून तर पडणार नाहींत ना ?”

इतके सारे चिंताजनक विचार मनात घोळत असतानाही पेशव्यानीं महाराजावरील निःसीम निष्ठेमुळें व विश्वासामुळे आणि मराठशाहीच्या आत्यतिक हितानें प्रेरित होऊन महाराजाच्या शय्यागृहात प्रवेश केलाच.

महाराज गलितागं असे शय्येवर पडले होते. त्याचे डोळे अशक्तपणानें बोट बोट खोल गेले होते. शरीर झिजून झिजून केवळ अस्थिपजरवत् मात्र उरलें होतें. त्याना हातापायाची हालचाल करावयाची झाली तरी ती दुसऱ्या कोणाच्या तरी साह्याखेरीज करता येत नव्हती. त्याची ती अवस्था पाहून पेशव्याना अत्यंत वाईट वाटलें. ते महाराजाना हात जोडून म्हणाले,

"महाराज! इतके दिवस मला आपली भेट घेणे शक्य झालें नाहीं. तें कां शक्य झालें नाहीं त्याची अनिष्ट कारणपरंपरा सांगत बसण्याची ही वेळ नव्हे. पण दोन्ही डोळे शेजारी आणि गांठ नाही ससाणी अशी दैवानें काही दिवस माझी कुचंबणा केली होती खरी त्याबद्दल महाराजांनीं मला क्षमा करावी."

बोलता बोलता पेशवे लेकराप्रमाणे महाराजांच्या शेजारी जाऊन बसले. महाराज त्यांच्या पाठीवरून हात फिरवून म्हणाले, "नाना! मी सर्व परिस्थिति जाणतों आहे. थोरल्या राणीपुढें तुमचाच काही इलाज चालला नाहीं असे नव्हे, माझीही तीच स्थिति आहे मला मनाचा दुबळा म्हणा, भित्रा म्हणा, पण मी आज राणीच्या हातीं पराधीन होऊन पडलों आहें खरा. ही पराधीनता आता मरेतों माझ्या कर्मांत आहे. राणीच्या मर्जीनुरूप न वागावे तर जगात आजवर झालें ते हसें काहींच नाहीं इतकें हसें होणार, व तें टाळण्यासाठीं गप्प बसावें तर हा वनवास कपाळीं! ह्या वनवासाला कारण मात्र तुम्ही आहां. तुम्हीं सर्व कारभाऱ्यांनीं मला गळ घालून त्या वनवासातून या वनवासात आणून सोडलें. तो वनवास याहून सहस्रपट सुखावह होता. माहुलीला श्रीकृष्णामातेच्या पवित्र तटाकीं भगवच्चिंतन करीत आयुष्याचे अखेरचे दिवस शांतवृत्तीने घालविण्याचें मानस होते, तें तुम्हीं साधू दिलें नाहीं, आणि पुन्हा ह्या नरकवासात आणून सोडले." असे म्हणून महाराजांनीं खळ्कन् अश्रु गाळले.

महाराजांची ती शरपंजरीं पडलेल्या भीष्मासारखी स्थिति पाहून पेशव्यांचेही डोळे दुःखाश्रूंनीं डबडबून आले काय बोलावें हेच त्यांना सुचेना व मुखावाटे शब्दही उमटेना.

महाराज पुन्हा म्हणाले, "मी याबद्दल तुम्हाला दोष देत नाहीं, तुम्हीं केलें ते सद्बुद्धीनेच केले हें मी जाणतो पण माझ्या दुर्दैवाची गत सांगितली. त्याबद्दल तुम्हाला वाईट वाटावयाला नको" आपले बोलणें पेशव्याच्या मनाला लागल्यामुळे त्याच्या डोळ्यात अश्रू उभे राहिले असें पाहून त्याचें सांतवन करून ते पुढे म्हणाले, "बरें, आता ती महामाया माघारी येण्यापूर्वी आपणाला राजवटीची निरवानिरव काय करावयाची ती केली पाहिजे. राणी मुधोजी भोसल्याला दत्तक घेण्याच्या घालमेलींत आहे हें तुम्हाला माहीत असेलच."

"होय. त्याला महाराजाची मान्यता आहे असेही मीं ऐकलें होतें." पेशवे म्हणाले.

"असत्य! अगदीं असत्य! औरस वारस राज्याला असताना मी ह्या नसत्या भानगडींत कशाला पडेन? आता, राणीनें माझ्या कपाळापाशीं कट-कट करकरून मुधोजीला दत्तक घेण्याचा हट्ट चालविला आहे हें खरे. त्या तिच्या हट्टाला मी प्रत्यक्ष विरोध जरी करू शकलो नाहीं, तरी ही योजना मला मान्य नसल्याबद्दल, व या भानगडींत न पडण्याबद्दल मागेच मीं रघूजी भोंसल्याकडे आज्ञापत्र रवाना केले आहे मुधोजीलाही मी तसेंच आज्ञापत्र पाठविणार होतों परतु त्यापूर्वी मला तुमची समति घ्यावयाची होती. ते आज्ञापत्र आताच रवाना होईल" इतकें महाराज म्हणतात तोंच देवजी मेघःश्याम तेथे येऊन पोहोचले त्याना महाराजानीं मुधोजीला पाठविण्याच्या आज्ञापत्राचा मजकूर सागितला देवजी मेघःश्याम बाजूला बसून आज्ञा-पत्र लिहू लागले. महाराज पुन्हा पेशव्याशीं बोलू लागले, "या सर्व अनिष्ट गोष्टींत सतोषाची गोष्ट एवढीच कीं गडावरील महादैवत आपणावर प्रसन्न आहे. मासाहेबानीं आपल्या कारभाऱ्यामार्फत आम्हीं योजिलेल्या कार्याला अभिष्ट चिंतनपर समति दिली आहे"

"मग काय, पानगावाहून युवराजाना आणविण्याच्या तयारीला आम्हीं लागावें काय?" पेशव्यानीं विचारले

"नका तें मात्र इतक्यात करू नका माझा अत ज्या दिवशीं होईल, त्या दिवशीं तुम्ही मासाहेबाच्या विचारे राजारामाला आणविण्याची तजवीज करा, व त्याला छत्रपतींच्या गादीवर बसवा. त्यापूर्वी आणविल्यास राणी त्याच्या जिवावर झडप घालण्यालाही कमी करणार नाहीं, व तिच्या कुटिल कारस्थानाकडे लक्ष्य पुरविण्याला आता आम्हालाही अवसर मिळणार नाहीं. राणीच्या विरुद्ध मीं वास्तविक बोलू नये. पण माझ्या कोटमाप रयतेच्या कल्याणासाठीं व तुम्हा सर्व निष्ठावत कारभाऱ्याच्या इभ्रतीसाठीं मला बोलावें लागतें-आहे. प्रतिनिधींसारख्या फितुराना हाताशीं धरून राजवटीचा चुथडा करण्यासाठीं राणीनें कबर कसली आहे. ती आपल्या पाठपुराव्यासाठीं शत्रु-सैन्याची जुळवाजुळवही करीत आहे. तिच्या टकरेला टक्कर देण्याइतकी तुमची तयारी असल्याखेरीज राजारामाला इकडे आणू नका."

" मी मध्यें बोलतो याबद्दल क्षमा असावी. पण या प्रसंगीं महाराजांच्या आज्ञेविरहित प्रमाद माझ्या हातून कांहीं घडले आहेत थोरल्या आईसाहेबांची ही दुर्मति ध्यानीं येताच मींही महाराजांच्या पुण्यनामाचा उपयोग करून शिंदे होळकरादि सरदाराना तातडीनें पाचारण केलें आहे थोरल्या आई-साहेबाना चिथविणाऱ्या लोकांचा उद्योग दांडगा असल्यानें राज्यकारभाराच्या पुनर्घटनेच्या बाबतींत युद्ध व रक्तपात करूनही आपला हेका चालविण्याला त्या कमी करणार नाहींत. तो अप्रिय प्रसंग टाळण्यासाठीं सैन्याची जुळवा-जुळव करणें मलाही अवश्य वाटलें. यातील माझा उदात्त हेतु ध्यानीं घेऊन महाराजांनीं मला क्षमा करावी. " असे म्हणून पेशव्यानीं महाराजांचे पाय धरले.

" क्षमा केली आहे! नाना! तुला मी क्षमा केली आहे. " महाराज आपल्या निःशक्त हातानें पेशव्याची पाठ थोपटींत प्रेमात येऊन अरेतुरेच्या घरगुती भाषेंत त्यांना म्हणाले, " तू माझी निष्ठापूर्वक सेवा करणारा सच्चा धर्मपुत्र आहेस, तुला सात खून माफ! इतकी दूरदृष्टि तुला आहे, यावरून तू सध्याच्या संकटातून मराठशाहीचे तारू कुशल कर्णधाराप्रमाणे तरवून पैलतीराला नेशील यात मला तिळमात्र संशय वाटत नाहीं. माझ्या पश्चात् स्वतंत्रपणे राज्यकार हाकण्याला तूच एकटा समर्थ आहेस. मीं तुला विरोध करणाऱ्या सर्व लोकांचा अंदाज पाहिला ते विरोध करावयाला जितके तत्पर तितकेच राज्यकारभाराची धुरा उचलावयाला भिऊन नाकबूल! अशा स्थितींत मीं पूर्ण विचार करून तुलाच माझ्या पश्चात् मराठी साम्राज्याचा वंशपरंपरा पेशवा नेमीत आहे " महाराजांनीं आपल्या उशाखालीं हात घालून एक घडी केलेला कागद काढून पेशव्याच्या हातीं देऊन म्हटलें, " हें तुला माझें स्वदस्तुरचे आज्ञापत्र आहे भेटीचा योग न येता तर हें मी शेटीच्या हातीं तुझ्याकडे पाठविणार होतों पण परमेश्वरानें भेटीचा योग आणला, संतोष वाटला. "

पेशव्यानीं महाराजाना वंदन करून तें आज्ञापत्र हातीं घेतलें, व तें वाचून न पाहताच आंगरख्याच्या खिशात घातलें

इतक्यात देवजी मेघःश्यामानीं मुधोजी भोसल्याना धाडावयाचें आज्ञापत्र लिहून आणलें, व महाराजानीं तें पेशव्याना वाचून पाहावयाला सांगून

पेशव्यानीं वाचून मान्यता दर्शविल्यावर त्यावर स्वाक्षरी केली. तें आज्ञापत्र गुप्तपणें मुधोजीकडे पावतें करण्यासाठीं तसेच देवजी मेघःशामाकडे देऊन महाराज शेटीला म्हणाले, " शेटी! चिटणीस अद्यापि कसे आले नाहींत? ते राणीला भिऊन यावयाचे राहिले कीं काय? राणीचा पेशव्यावर जितका दात आहे तितका तुमच्यावर नाहीं, असें मीं सांगितल्याप्रमाणे त्याना तूं खुलासेवार सांगितले नाहींस काय?"

" मीं सारें सांगितलें महाराज! ते लौकरच येतो म्हणालेही होते. पुन्हा जाऊन पाहूं काय?" शेटीनें विचारलें

" जा पहा पाहू जरा! म्हणावे, पेशवेही आले आहेत, तुम्ही लौकर या. राणी माघारी येण्यापूर्वी याल तर उपयोग! उशीर झाल्यास तुमची आमची भेट या जन्मीं पुन्हा होईल असा भरंवसा नाहीं असेंही त्याना सांग."

इतकें महाराज बोलत आहेत, तोंच चिटणिसांचा हुजऱ्या तुळाजी पुढे आला. त्याला पाहून पेशवे म्हणाले, " चिटणीस आले वाटते!"

## प्रकरण २१ वें

# ' भुताटकीचें घर '

चिटणीस आले, त्याच वेळीं महाराजाना वैद्यराजानीं औषध आणून दिलें. तें महाराज सेवन करीत असता चिटणीस पेशव्याना खुणेनें आपणाकडे बोलावून हळूच त्याच्या कानाशीं लागून म्हणाले, "श्रीमत! वाघिणीच्या गुहेत आपण शिरला आहा. आत प्रवेश करणे सोपें गेले पण बाहेर पडताना पचाईत आहे "

" का?" पेशव्यानीं तितक्याच हळुवार स्वरात विचारले.

" आपल्या जिवावर हल्ला होण्याचा सभव आहे."

" इथे या बैठकींत?"

" या बैठकींत नसला तरी आसपास."

" आणि तो कोणामार्फत?"

इतक्यात महराजाची दृष्टि तिकडे वळल्यामुळे चिटणीस व पेशवे याचा सवाद तसाच खडित झाला. चिटणिसानीं पेशव्याना अखेरची एकच सूचना दिली, "सावध असा. ह्या प्रसगातून पार पडल्यावर सर्व खुलासा मी करीन."

महाराजानीं चिटणिसाना पाहताच पेशव्यापाशीं जसें आपलें अतःकरण थोड्या वेळापूर्वी उघड केलें होतें, तसेंच त्याच्यापाशींही केलें, व आपल्या पश्चात् राजवटीची व्यवस्था कशी करावयाची हें दोघाना मिळून थोडक्यात समजावून दिलें.

त्यावर चिटणीस पेशव्याकडे अर्थपूर्ण दृष्टीनें एकवार पाहून महाराजाना म्हणाले, "महाराजाच्या कृपाप्रसादानें व ईश्वराच्या कृपेनें आम्हाला आयुष्य मिळाल्यास आम्ही महाराजाच्या आज्ञेप्रमाणें वागण्यात अतर करणार नाहीं."

" असें का म्हणता?" महाराजानीं चिटणिसाना विचारलें.

"महाराज! जीवित क्षणभंगुर आहे. कालाचा महिमा अगाध आहे. ग्रहदशा आली की विक्रमचरित्रातल्याप्रमाणें खुटीवरचा लाकडी हंसदेखील जिवंत होऊन हार गिळतो, मग आमचा काय पाड?" एवढें चिटणीस बोलून गेले खरे. पण पुन्हा त्यानाच वाटलें कीं त्या साधुपुरुषाच्या मनाला आणखी वेदना होतील असे का बोला? म्हणून त्यांनीं आपण होऊनच भाषणाचा ओघ बळेंच बदलला, व म्हटलें, "यावेळीं थोरल्या आईसाहेब इथें असत्या तर फार बरें झालें असतें सर्वांच्या विचारें भावी कारभाराची दिशा मुकर झाली असती म्हणजे तटेबखेडे उत्पन्न होण्याला कांहीं कारण उरलें नसतें."

"त्या नाहींत तेंच एका अर्थी बरे आहे. त्या हटकून कार्यनाश मात्र करावयाला चुकल्या नसत्या. माझ्या पश्चात् त्याची त्याच्या इतमामाला शोभेशी योग्य व्यवस्था तुमच्याकडून राखली जाईल अशी मला आशा आहे." महाराज म्हणाले.

पेशवे इतका वेळ स्तब्ध होते, ते उत्तरले, "थोरल्या आईसाहेब आम्हांला जन्मदात्या मातेच्या ठायीं पूज्य आहेत, व त्या पूज्यच राहतील."

"महाराजानीं भावी व्यवस्था करताना पंतप्रतिनिधींची देखील सल्ला घेतली असती, तर फार चांगलें झालें असतें" चिटणीस म्हणाले.

"सल्ला सर्वांची आम्हीं घेतली मानमरातब व सत्ता गुडाळण्यात सर्वांचें पाऊल पुढें, पण जबाबदारी उचलता का, असें विचारताच मात्र हातात बांगड्या भरतात. असले बेभरवशाचे कारभारी काय करावयाचे? माझा सारा भरंवसा नानावर आहे आता माझ्याच्यानें जास्त बोलवत नाहीं. वरकड सर्व तुम्ही ते एक विचारें पार पाडा" असें म्हणून महाराज बोलण्याचे श्रम फार झाल्यामुळे सुस्कारे सोडीत दुसऱ्या कुशीला वळले.

पेशव्यानीं चिटणिसाना नेत्रसंकेत केला, "आता चलावें."

"यापुढें तरी महाराजाची भेट आम्हाला नित्य घेता यावी, ही विनंति." चिटणीस म्हणाले

महाराजाचा कंठ एकदम दाटून आला. घोगऱ्या क्षीण स्वरात ते म्हणाले, "तुम्हा दोघाच्याही भेटीसाठीं माझा जीव एकसारखा तळमळत असतो. पण मी परस्वाधीन आहें हो! माझ्या शरिरावर माझा ताबा नाहीं, आणि

सभोंवारच्या दासदासींवरही नाहीं. मी दुबळ्याहून दुबळा झालों आहें. मी कैदी आहें दुबळयाच्या इच्छेला मोल नाहीं. त्यातूनही तुम्ही या. राणीनें माझ्यावर व तुमच्यावर कृपा केली तर भेट होईल, नाहींतर–भगवताची इच्छा !"

'भगवताची इच्छा' हे शद्ब उच्चारताना महाराजाना जोराचा हुदका आला. एखाद्या मुलासारखे ते स्फुदून स्फुदून रडू लागले. त्या विवेकमूर्तीला आपण विवेकाच्या गोष्टी काय सागावयाच्या असे चिटणीस व पेशवे या दोघानाही वाटल्यामुळें ते स्तब्ध होते. त्या महालात सर्वत्र स्मशानशातते-सारखी निस्तब्धता पसरली होती. पण त्याला कोणाचा काय इलाज ! चिटणीस व पेशवे आणखी थोडावेळ तिथे थाबले, आणखी काहीं सुखदुःखाचें बोलणें महाराजाशीं झाले, आणि शेवटीं त्या दोघानींही जड अतःकरणानें महा-राजाचा निरोप घेतला. चिटणीस पुढे चालले व पेशवे त्याच्या मागाहून चालले. चिटणिसाचा हुजऱ्या तुळाजी त्याच्या बरोबरीनें चालला होता. चिटणीस का न कळे मधून मधून एकसारखे त्याच्याकडे पाहत होते. चिटणि-सानीं आताच दिलेल्या धोक्याच्या सूचनेमुळें पेशव्याचा जीव धागधूग करीत होता. त्यानीं आपल्या हुजऱ्याला सावध राहण्याबद्दल सूचना दिली व स्वतः कमरपट्ट्यातील जाबियाची मूठ मुठींत धरून सभोवार तीक्ष्ण दृष्टीने पाहत मोजून पावलें टाकू लागले सभोंवतीं फिरणाऱ्या नोकर चाकराची मुद्रा त्याना पहिल्याप्रमाणेंच सशयी दिसली. त्यातले काहीं तुळाजीला पाहून हंसले, व तुळाजी त्याना पाहून हसला. पण ते फक्त त्यानाच माहीत.

राजवाड्याबाहेर जाईपावेतो पेशव्याच्या जिवात जीव नव्हता. एकदा बाहेर पडल्यावर त्यानीं हायसा एक उसासा सोडला, तरी भीतीनें शरिराचा थरकाप होत होताच. त्याची गोंधळलेली मनस्थिति ओळखून चिटणीसही त्याना पाठीशीं घालून त्याच्या बरोबरीनें चालले होते.

तुळाजी तेवढ्यात चिटणिसाना म्हणाला, "धनी ! वाड्यात बाईसाहेब चिंता करीत बसल्या असतील. आज कोणताही अनन्वित प्रसग अपेक्षे-प्रमाणें ओढवला नाहीं ही आनदाची वार्ता त्याना कळविण्यासाठीं मी पुढें जाऊ का ?"

"जा." चिटणीस म्हणाले.

"अदालतीच्या वाड्यापाशीं अर्थात् पेशव्याच्या निवासस्थानापाशीं जाऊन पोहोंचताच चिटणीस म्हणाले, "नाना! आजच्यापुरतें तरी मरण टळलें असें म्हणावयाला आता हरकत नाहीं."

"तेंच काय तें मला नीट समजलें नाहीं. चला ना, जरा आत बसू" नानासाहेबानीं उत्तर दिलें.

"आता बोलत बसावयाचे तें सावकाशीनें उद्या बोलत बसू. मला आज प्रथम माझ्या कानीं आलेल्या बातम्याविषयीं तपास करावयाचा आहे. थोरल्या आईसाहेब हयात आहेत तोंवर त्यानीं तुमच्या आमच्या मार्गांत निरनिराळ्या संकटाच्या धोंडी आणून उभ्या कराव्या, व आम्हीं त्या बाजूला सारून मार्ग सुधारावा, ही दगदग आमच्या पाचवीलाच पुजली आहे म्हणाना! मला मिळालेल्या माहितीप्रमाणें त्यानीं आज भर राजवाड्यात तुम्हाला दगा देऊन ठार करण्याचा बेत केला होता. तो दोष आपणावर येऊ नये म्हणून मुद्दाम त्या आज विश्वेश्वराच्या दर्शनाचे निमित्त करून माहुलीला गेल्या आहेत. तिकडे आज मुधोजी भोंसलेही यावयाचा आहे म्हणे, व त्याच्याशीं त्याचीं काहीं गुप्त खलबतें व्हावयाची आहेत. प्रतिनिधि, मुतालिक वगैरे त्या गटातील झाडून सारी मडळी माहुलीला गेली आहेत."

जिवावरचे सकट टळल्यामुळें पेशव्याना आनद झाला होता. त्या आनंदाच्या भरात त्याना विनोद आठवला. ते म्हणाले, "आम्हाला माहुलीला पोंचविण्याचा प्रयत्न करता करता आमच्यापूर्वी स्वतःच माहुलीला गेले म्हणावयाचे!"

चिटणिसानींही त्या विनोदाला साथ दिली, "ते माघारे न आले तर जाण्याचा उपयोग!"

तुळाजी जो तेथून गेला, तो चिटणिसाच्या वाड्याकडे जाण्याचें मिष करून थोडेंसें अंतर चालून गेल्यावर तेथें एक जुनाट मोठे घर होतें, त्या घरांत शिरला. तेथें सात आठ हत्यारबद गुड काळे बुरखे पाघरून बसले होते. त्यापैकीं एकानें तोंडावरचा बुरखा दूर करून तुळाजीला विचारलें, "किती उशीर आहे?"

"फार उशीर नाहीं काहीं, इतक्यातच चिटणीस वाड्याकडे जावयाला निघतील. सावध असा. ते बहुधा याच वाटेनें जातील. मी त्याच्या पाळती-

वर राहतो. ते निराळ्या वाटेने जाऊ लागले तर मी लगेच तुम्हांला तसा इषारा देईन."

एवढें त्रुटित सभाषण होताच तुळाजी झाडाझुडपातून लपतलपत पेशव्याच्या वाड्यासमोर एक मोठे पिपळाचें झाड होतें, त्या झाडाआड जाऊन चौथऱ्याच्या आडवशाला उभा राहिला. तो तेथे जाऊन पोहोचावयाला व चिटणिसाच्या तोंडून विनोदाचे शद्ब निघावयाला एक गाठ पडली. तुळाजी ते शद्ब ऐकून आपल्या मनाशीं म्हणाला, "तू माहुलीला जाऊन पोहोंचल्याखेरीज ते माघारे कशाला येतील ?"

"पण काय हो, ह्या कारस्थानाचा इतका बेमालूम सुगावा आपणाला लागला तरी कसा ?" पेशव्यानीं चिटणिसाना विचारले.

"म्हणतात ना, देव तारी त्याला कोण मारी ? राणीची पुतळा या नावाची एक दासी आहे ना, ती आज आपण होऊन मजकडे आली, व तिने ह्या सर्व कारस्थानाचा स्फोट केला. राणीचीं कृष्णकारस्थानें इतकीं खोल आहेत कीं फक्त परमेश्वरच त्यातून आमचा आणि राजवटीचा बचाव करू जाणे !"

तुळाजी तें ऐकून आपल्याशी म्हणाला, "पण ते कारस्थान आणखी पाव घटकेच्या आत तुझ्या जिवावर बेतणार आहे, हे तो परमेश्वरदेखील न जाणे !"

"माझा समज इतके दिवस त्या पुतळेविषयीं निराळाच होता. त्या सशयाचा धागादोरा थेट आपल्यापावेतो पोचत होता." पेशवे म्हणाले.

"तो कसा काय ?" चिटणिसानीं विचारलें.

तुळाजी कान टवकारून ऐकू लागला.

पेशवे म्हणाले, "आपल्या पदरी तुळाजी या नावाचा नवीन हुजऱ्या आहे. त्याचे पुतळा हें प्रियपात्र आहे, व तुळाजी हा राणीचा हेर आहे, असे मीं कालच ऐकलें."

तुळाजीने आपले कान अधिकच टवकारले.

"आपली शका मुळींच अन्यथा नाहीं. पण तिचा बराच खरा अर्थ मला आज पहाटे प्रतापरावाच्या उपकारी पिशाचाच्या तोंडून प्रथम कळला, व आज सूर्यास्ताच्या अगोदर स्वतः पुतळेनें येऊन सर्व प्रकार उघड करून

सागतला. पुतळेचें पूर्ववृत्त आपणालाही माहीत आहेच. तिच्या नवऱ्याला ठार करण्यात तुळाजीच प्रमुख होता, व त्याच्यावर पुरेपूर सूड घेण्यासाठींच पुतळा त्याच्याशीं इतक्या आपलेपणानें वागल्याचे दर्शविते. राणीवरही तिचा पहिल्यापासून दात आहे व तुळाजीप्रमाणेच राणीचेंही समूळ वाटोळे झालेले पाहिल्याशिवाय ती स्वस्थ बसणार नाहीं."

"इतकी हरामखोर विश्वासघातकी ती × × आहे काय? थाब म्हणावें, आज चिटणिसानंतर तुलाही ठार करून चिटणीसाच्या चितेला तुझेंच सरपण पुरवतो ते पिशाच्च मात्र कसे गाडावें हें काहीं कळत नाहीं." तुळाजी आपल्याशीं बडबडला पुतळा फितूर आहे हें कळताच त्याच्या सर्वांगाची होळी झाली व तो तिच्यावर दात ओंठ खाऊ लागला.

"असला हरामखोर नोकर आपण तरी पदरीं का ठेवलात?" पेशव्यानीं विचारलें.

"त्याचा विचार एथून पुढें. त्या हरामखोराच्या कपाळीं आता देहान्त शासन ठेवलेलें आहे."

"त्यापूर्वीच मूर्खा! देहान्त शासन तुझ्या कपाळी आहे! तुझ्या बाराव्याला जेवून ढेकर दिल्यावर हा तुळाजी थोरल्या बाईसाहेबाच्या कारकीर्दीत जाधव–दाभाडे–गायकवाडाच्या तोडीचा मराठा सरदार म्हणून मिरवणार आहे." तुळाजीनें आपल्याशीं चोरटी बढाई मारली.

चिटणीस लगेच पेशव्याचा निरोप घेऊन तुळाजीने अपेक्षिलेल्या मार्गानेंच आपल्या वाड्याकडे निघाले तुळाजीने तें पाहिले, व त्याच्या मागोमाग झाडाच्या सावली सावलीने तो लपत छपत निघाला. त्याचे काळे बुरखेवाले साथीदार जरी थोड्या अंतरावर त्याला साह्य करण्यासाठीं सज्ज होते, तरी त्याची मनीषा ही कीं आपण एकट्यानेच चिटणिसाना ठार केल्यावर त्या बहादुरींत व त्याप्रीत्यर्थ मिळणाऱ्या बक्षिसात इतर कोणी वाटेकरी नकोत.

इतक्यात तुळाजी एका झाडाआडून जात असता सणसणत एक दगड कोठूनसा आला व धपकन् त्याच्या पाठीवर आदळला. त्यासरसा तुळाजी 'अग आई ग! मेलों' असें ओरडत मटकन् खालीं बसला. चिटणिसाना चाहूल मिळेल व सारेंच ऑफस् होईल या भयानें तो तें दुःख अधाशासारखें आतल्या आत गिळीत होता. पण भीतीनें त्याचे हातपाय मात्र

लटपटत होते. चिटणीस ती किंचाळी ऐकून जागच्या जागीं क्षणभर थबकले.

तुळाजी लटपटत्या पायांनीं उठण्याचा प्रयत्न करूं लागला, तों त्याला त्याच्यामागें काळोखात एक आकृति उभी दिसली. त्याबरोबर तो जास्तच घाबरला.

" खबरदार एक पाऊल तरी पुढें टाकशील तर ! मी तुझा वैरी प्रतापराव आहें. माझा खून तू केलास, त्याचा बदला घेण्यासाठीं मी आलों आहें. मुकाट्यानें ती कमरेची तरवार खालीं उतरून ठेव, तर मी तुला क्षमा करीन." ती आकृति दरडावणीच्या भाषेंत बोलली.

तुळाजी भयानें नखशिखान्त थरथर कापू लागला. त्याची बोबडी वळली व दातखिळी कडकड वाजूं लागली. त्यानें अनन्यगतिक होऊन आपल्या कमरेची तरवार सोडून खालीं ठेवली, व हात जोडून त्या पिशाच्चाची प्रार्थना केली, "प्र–प्र–प्रतापराव ! म–मला क्षमा क–र ! मी यापुढें पुतळेच्या वाटेला जा–जाणार नाहीं. म–मला क्ष–क्ष–क्षमा कर !"

तुळाजीची वर पाहण्याची छातीच होईना तो पायाकडे पाहून बोलत होता. पिशाच्चानें ती तरवार लाथेनें दूर लोटली व तुळाजीच्या कमरपट्ट्यात असलेला जांबिया एकदम एका हिसक्यासरसा काढून घेतला.

"हरामखोरा ! प्रथम इहलोकींच्या तुझ्या पापाचें हें प्रायश्चित घे, आणि परलोकीं नरकात जा !" हे त्या पिशाच्चाचे शब्द तुळाजीच्या कानीं पडतात न पडतात तोंच त्याच्या हातातील तुळाजीचा जांबिया खसूकन त्याच्या छातींत घुसला, व तुळाजी खालीं कोसळला. तो प्राणांतिक दुःखानें ओरडू लागला. तोंच पिशाच्चाने एक पाय त्याच्या नरडीवर दिला. त्यामुळे त्याला ओरडता येईना. दुसऱ्या हातानें त्या पिशाच्चानें ती तरवार ओढून घेतली, व तिच्या साह्यानें त्याचें शीर कापून धडावेगळें केलें. लगेच ते प्रेत त्याच्या एका पायाला धरून ज्या घरात तुळाजीचे बुरखेवाले साथीदार वाट पाहत बसले होते, तेथवर ओढीत नेलें. ती चाहूल लागताच ते लोक आपला डाव उघडकीला आला कीं काय या संशयाने भाले सरसावून घराच्या दरवाजात येऊन उभे राहिले. इतक्यात पिशाच्चाची दहशत त्याना समोरच्या वृक्षाखालून ऐकूं आली, " खबरदार पुढें याल तर ! मी प्रतापराव आहें. मला ज्यानें

मारलें, त्याचा हा घ्या मुडदा. आणखी ज्यांना ज्याना मरावयाचे असेल त्यांनीं पुढें यावें."

ती पिशाच्चवाणि हवेंत घुमत होती तेव्हाच तुळाजीचें प्रेत धाड्कन् घराच्या दरवाजांत त्या लोकाच्या अगदीं पायाशीं जाऊन पडलें. त्याबरोबर ते लोक भीतीनें दचकून आत वळले.

" उजाडेपावेतों बाहेर पडाल तर जी गत तुमच्या साथीदाराची झाली तीच्च तुमचीही होईल, याद राखून ठेवा." पुन्हा पिशाच्चवाणि त्या लोकाना ऐकूं आली. ते लोक आतल्या आत भीतीने अर्धमेले झाले.

चिटणीस इतका वेळपावेतो जागच्या जागींच उभे होते. ही पिशाच्च-लीला असेल अशी त्याना कल्पनाही नव्हती. हा कोणाच्यातरी आपसातील कलागतीचा परिणाम आहे असे त्याना वाटलें म्हणून त्यानीं विस्मित वृत्तीनें मोठयानें विचारले, " कोण आहे तिकडे ?"

त्याना उत्तर मिळाले, " मी प्रतापरावाचे पिशाच्च आहे. मी तुमचा उपकारकर्ता आहें. तुमच्या जिवावर टपलेल्या हरामखोर मारेकऱ्याचा न्याय-निवाडा मी करीत आहें. तुम्हाला भिण्याचें कारण नाहीं. तुम्ही निर्भयपणें मुकाट्यानें आपल्या मार्गाने निघून जा."

ही पिशाच्चलीला नव्हे, ही कोणातरी अज्ञात पण सामर्थ्यवान माणसाची लीला आहे, असा चिटणिसाना मूळपासूनच जबर सशय होता. तो आताच्या प्रसंगानें दुणावला. हा आपला उपकारकर्ता आहे तरी कोण, व हा माझ्या जिवावर उठलेले मारेकरी म्हणतो ते कोण असावे, हें जाणण्याच्या तीव्र उत्कठेनें प्रेरित होऊन ते तसेच मागें वळून पेशव्याच्या वाड्यात गेले. तेथें त्यानीं पेशव्याना घडलेला वृत्तान्त थोडक्यात सागितला. दोघानीं एक विचार करून त्या रहस्याचा तात्बडतोब उलगडा करून घेण्याचें ठरविलें, व शंभर सशस्त्र शिपायी बरोबर घेऊन मशाली पाजळून ते त्या घराशेजारीं आले. घराचा दरवाजा लावलेला व दरवाजात तुळाजीचा मुडदा पडलेला दिसला. जवळच त्या मुडद्याचें मुडकेंही पडलेलें होतें. हा काय प्रकार असावा, या-विषयीं विचार करीत पेशवे व चिटणीस तेथे उभे आहेत, तोंच मागच्या बाजूनें तें घर पेटू लागलें, व पिशाच्याच्या भयानें गर्भगाळित होऊन आत लपून बसलेले सात आठ लोक जीव बचावण्यासाठीं बुरखे टाकून दाराबाहेर




दरवाजात तुळाजीचा मुडदा पडलेला दिसला. [ पृ १९०

पडले. पण त्यात चिटणिसाच्या अपेक्षेप्रमाणे प्रतापरावाचें पिशाच कोणीच दिसेना !

" ह्या सर्वांना कैद करा. " पेशव्यानीं आपल्या शिपायाना आज्ञा केली. सर्व लोक शरमिंदे होऊन व आता निरुपाय झाला हें ओळखून मुकाट्यानें शिपायाच्या स्वाधीन झाले. नाहीं म्हणावयाला त्यातील एकजण मात्र जरा धीटपणें पुढें येऊन पेशव्याना म्हणाला, " श्रीमत! हें भुताटकीचें घर आहे. फार भयकर ! मरता मरता वाचलो. "

" पण या भूतखान्यात तू आलासच कशाला? " चिटणिसानीं गमाजीला ओळखून विचारलें.

"आलों कसला? मला त्या भुताने इथें आणून कोंडलें आपण आला म्हणून माझा बचाव झाला नाहींतर प्रसग मोठा कठीण होता." असें म्हणून गमाजी निगरगट्टासारखा त्या सर्वांसमोरून दूर निघून गेला.

चिटणिसानीं 'जाऊ द्या' म्हटल्यामुळे पेशव्यानीं तिकडे दुर्लक्ष्य केलें, व गमाजीला कैद करू नका असे आपल्या शिपायाना सागितलें. तथापि चिटणिसानीं त्याला जाता जाता टोमणा हाणला, " खरेंच, प्रसग मोठा कठीण होता. तू थोराचा आश्रित म्हणूनच त्यातून शीरसलामत निभावलास."

मशालींच्या उजेडात चिटणीस व पेशवे यानीं पकडलेल्या लोकाचे चेहरे न्याहाळून पाहिले, तों ते सारे मुतालिक बापलेंकाच्या आवतीं भोंवतीं शिकारी कुत्र्याच्या कळपाप्रमाणें हिंडणारे लोक !

## प्रकरण २२ वें

# रावजी जगदाळ्याचें स्मरण

" हात्, दळभऱ्या !"

दुसऱ्या दिवशीं दोन प्रहरीं राणी माहुलीहून माघारी राजधानींत आली, त्या वेळीं तिनें गमाजीला मुद्दाम बोलावून घेतले व त्यानें आपल्या फसलेल्या कारस्थानाचा वृतान्त सांगितला तो ऐकून तिरस्काराचे उद्गार ओघानेंच तिच्या तोंडून निघाले.

"सगळे मेले मिळतात ते पाढऱ्या पायाचे आणि अक्कलशून्य ! एक-जात शाळिग्राम आणि नर्मदे गणपती. त्यात हिरा—माणिक—पाच अथवा निदान सूर्यकान्त एकादा तरी हातीं लागेल तर शपथ ! असले जीवत मुडदे घेऊन कुठच्या खदकाची भर करता आली तर न नकळे !" ही सभावना राणीने आपल्या सर्व साह्यकाऱ्याची व अनुयायाची मिळून तेव्हाच निराशे-च्या भरात केली, व त्याच्या समारोपादाखल आणखी म्हटलें, "मीच खुळी म्हणून असल्या मूर्खांवर भरवसा ठेवून राजवट मुठींत आणण्याचा घाट घातला. शेषाच्या माथ्यावरची पृथ्वी उचलून आणून मी सरड्याच्या माथ्या-वर आधारून उभी करू पाहत होत्यें. पण तें कसें जमावे ? शेष तो शेष व सरडे ते सरडे. त्यानीं परसातल्या डबक्यात बुड्या माराव्या आणि कुपणा-वर धांवपळ करावी. पाताळलोकीं त्याचा थोडाच पाड लागणार !"

राणीचे हे उद्विग्नतेचे व निराशेचे बोल अनुभवाचे होते. निदान कालच्या दिवसावरून तर परिस्थिति तिला पावलोपावलीं दगा देऊन वाकुल्या दाखवूं लागली होती. पेशव्याना ठार करून ती अडचण आपल्या वाटेतून दूर करण्यासाठीं म्हणून तिनें तुळाजीला हाताशीं धरलें, राजवाड्यातील सर्व नोकरचाकराना कोणाला कसल्यातरी अमिषाने तर कोणाला धमकावणीनें वश करून घेतलें, आणि त्या कटात सामील असल्याचा पुसट दोषाआरोप

देखील आपणावर येऊ नये यास्तव देवदर्शनाचें व तीर्थस्नानाचें निमित्त करून ती माहुलीला निघून गेली. त्याच दिवशीं माहुलीला जाण्यांत राणी-चा आणखी हेतु असा कीं, मुधोजी भोंसला त्या रात्रौ तिला तेथें येऊन भेटावयाचा असा आगाऊ संकेत ठरला होता. तिकडे त्याच्याशीं दत्तकाची वाटाघाट पक्की करून त्याला भारून राजधानींत आणावयाचें, त्याला आपल्या मांडीवर दत्तक घेऊन राजमाता व्हावयाचें, व दत्तकाविषयीं अन्यथा बेत करणाऱ्या सर्वांच्या तोंडाला पानें पुसावयाचीं. त्या कारस्थानात जोड्यातील खड्याप्रमाणें नडणारे एकटे पेशवे, त्याचा आपल्या अपरोक्ष परस्पर खून होऊन गेला कीं सुटीवाचून खोकला गेला. खुनी आरोपींना क्षमा करून व मोठमोठीं बक्षिसें वाटून त्या किळसवाण्या प्रसंगावर जरतारी पांघरूण घालण्याला तिला मग प्रतिबंध करणारा कोणी नव्हता. राहता राहिले चिटणीस, ती चिखलातील मेढ जिकडे जोर लागेल तिकडे ओढली जाणार हें राणी ओळखून होती. महाराज शरपजरीं पडलेले असल्यानें त्याना या कोणत्याच भानगडींत जातीनें लक्ष्य घालता येणें शक्य नाहीं व आपल्या एकतंत्री अमलाला विरोध करणें त्याना शक्यही नाहीं, व ताराबाईला ढवळाढवळ करण्याला फुरसत मिळू नये म्हणून गडावरील चौकीपहारे तेथें आपल्या विश्वासातील माणसें नेणून मजबूत करून तोही बंदोबस्त राणीनें अगोदर-पासून केलाच होता. इतकेंही करून कोणी विरोधी वर डोकें काढू लागलाच, तर त्याला जागच्याजागीं बसविण्याला प्रतिनिधि वगैरेंच्या आधारानें जम-विलेलें सैन्य तयार होतेंच. याखेरीज बाबाजी शिर्क्यांना—आपल्या भावाला-ही तिनें आपला सारा डाव कळवून साह्यार्थ बोलविलें बोलविलें होतें. बाबाजी कसा झाला तरी आपला भाऊ, तो सर्वांपेक्षा जास्त विश्वासाचा, म्हणून मुधोजीला देउराहून नकळत्या नजरबंदींतून राजधानींत आणून सोडण्याची नाजुक कामगिरीही तिनें त्याच्यावरच सोंपविली होती.

पण हा कारस्थानाचा सात मजली किल्ला काल एकदम कोसळून पडल होता. मुधोजी व बाबाजी तिला पूर्वसंकेताप्रमाणें माहुलीला भेटले खरे: पण प्रथमपासूनच ते महाराजाच्या आज्ञेखेरीज पेशव्याविरुद्ध ह्या कारस्थानात सामील व्हावयाला नाखूष दिसले. पेशव्याशीं स्पर्धा करून सतीचें वाण पत्करण्याला ते तयार होईनात. मुधोजीनें तर आपण तीर्थरूपांच्या संमती-

खेरीज कांहीं करू शकत नाहीं असें स्पष्टच सांगितलें. त्याचें बरोबरच होतें. महाराज व महाराणी याच्या मांडीवर दत्तक जाऊन आज युवराज व उद्यां छत्रपति होणे जितकें सोपें होते, तितकें तें अळवावरचें पाणी अळवावर टिकवून धरणें सोपें नव्हतें. त्या कामीं रघूजी भोंसल्याचें साह्य नसल्यावर तो काय करणार? तशीच अवस्था बाबाजी शिर्क्याचीही. ते पेशव्याचा दरारा ओळखून होते ते ह्या पेटत्या खाईत उडी घालावयाला कसे तयार होतील? त्या दोघानींही 'मागाहून पाहू' अशी टाळाटाळ चालविली, त्यावरून राणी त्याचें पाणी ओळखून चुकली. तेवढ्यात महाराजाचा खलिता मुधोजी-च्या हातीं जाऊन पडल्यावर तर तो दत्तक जाण्याला कुठचा पण राजधानींत प्रवेश करण्यालाही नाखूष झाला. महाराजानीं त्याला स्पष्टच या भानगडींत न पडण्याविषयीं बजावले होते, व याचा कोठेंही बोभाटा होता कामा नये अशीही ताकीद दिली होती त्याने त्या खलित्याचा मागमूसही राणीला लागू दिला नाहीं, तरी त्याचा त्याच्या मनावर व्हावयाचा तो परिणाम झालाच.

राहता राहिला राणीचा भर पेशव्याच्या खुनावर तेवढें झाल्यावर तरी हे दोघे आपणाला वळतील अशी तिला आशा. म्हणून त्या सुवार्तेची वाट पाहत ती दुसऱ्या दिवसापावेतो माहुलीला बसली तिला हें पक्कें माहीत होतें कीं आपण राजवाड्यात नाहीं अशी संधी साधून महाराज पेशव्याना भेटीला बोलावतील, त्यानीं न बोलावले तरी पेशवे आपण होऊन जातील, हें ओळ-खूनच तिने पेशव्याचा घात करण्याचा डाव रचिला होता.

त्या शुभवार्तेची वाट पाहत राणी माहुलीला बसली होती. तिला ती वार्ता तर त्या दिवशीं ऐकावयाला मिळाली नाहींच, पण दुसऱ्या दिवशीं तुळाजीचा प्रतापरावाच्या पिशाच्चानें खून केल्यामुळे सारा ओंगळ प्रकार उघडकीला आल्याची दुर्वार्ता मात्र ऐकावयाला मिळाली!

याप्रमाणें राणी करावयाला गेली एक आणि झालें मात्र भलतेंच. तें निस्तरण्यासाठीं राणीला तातडीनें राजधानींत यावें लागलें. नाहींतरी ती आज राजधानींत येणार होतीच, पण विजयी मुद्रेनें पेशव्याच्या खुनाबद्दल दुःखाचें नाटक करीत येणार होती. तिला आपले सारे बेत सर्वस्वी फसल्या-मुळें दुःख करीत पण चिटणिसाच्या जिवावरील संकट टळल्यामुळे वरवर आनंद दर्शवीत यावें लागलें.

## पेशवाईचा मध्यान्ह

राजवाड्यात येण्यापूर्वीच्, माहुलीला येऊन भेटलेल्या हस्तकांपाशीं राणीनें चौकशी केली होती कीं असें कसें झालें ? पेशव्यावर हल्ला व्हावयाचा राहून चिटणिसावर हल्ला व्हावयाचा कसा ठरला ? कोणीं ठरविला ! खुद्द राणीला चिटणीस जरी फारसे प्रिय व विश्वासार्ह नव्हते, तरी अजूनही आपण त्यांना हाताशीं धरून आपल्या मनाजोग्या उलाढाली घडवून आणूं अशी तिला उमेद होती तिला चिटणिसाचा घात तर व्हावयाला नकोच होता, पण त्याचें मनही दुखवले जावयाला नको होतें तें मुतालिक पितापुत्रामुळें निष्कारण दुखवलें मात्र गेले. आता राणीनें कितीही कठशोष करून चिटणिसाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला तरी त्याला थोडेच यश येणार होतें ! एवढेंच काय पण गमाजीनें चिटणिसाच्या घातासाठीं हातीं धरलेल्या भाडोत्री मारेकऱ्याकडून सकाळींच पेशव्यानीं चौकशी केल्या वेळीं राणीनें पेशव्याना ठार करण्यासाठीं रचिलेल्या कटाची परिस्फुटता झाली होती. प्रथम त्यानीं चिटणिसाना ठार करावयाचे, मग पेशव्याना तशीच एखादी नामी संधी साधून ठार करावयाचे, व मग त्याना ठरलेले बक्षीस मिळणार होतें !

प्रत्यक्ष गुन्हेगाराच्या तोडून या विषयाचा परिस्फोट झाल्यावर त्याच्या खरेखोटेपणाबद्दल सामान्य जनसमूहाला शका घेण्याचें कारणच उरलें नाहीं. परतु पेशवे त्या वेळीं अत्यत चतुरतेनें वागले. त्यानीं प्रथम जरी त्या सर्व गुन्हेगाराना देहान्त शासन देण्याचा निश्चय केला होता, तरी अखेर त्यांना त्याची दया आली. चिटणिसानींही त्याना समजावून सागितलें, "श्रीमंत! यात खरा न्याय होणार नाहीं. खरे अपराधी मोकळेच राहणार. ते सांबाच्या पिंडीवरचे विंचू म्हणून त्याना आपण धक्का लावूं शकत नाहीं. त्या बिचाऱ्यानीं बोलून चालून पोटासाठीं हें दुष्कृत्य केले. याच्या पोटांतील भुकेच्या आगीनें त्याना या दुष्कर्माला प्रवृत्त केलें. यात याचा देहान्त शासन देण्याजोगा अपराध खास नाहीं असले धाडसी वीर शोधूनही सापडणें कठीण. याना आपण आपल्या खास सैन्यात नोकरी द्यावी, म्हणजे ते जन्मभर आपले मिंधे होऊन राहतील." ही सल्ला पेशव्यानाही पटली, व त्याप्रमाणे त्यानीं केलें. हा पेशव्याचा दयाळुपणाही थोड्या वेळापूर्वीच राणीच्या कानीं आला होता. त्यामुळे तिचा सतापाग्नि जास्तच भडकला होता. तो अग्नि भडकावयाला व गमाजी समोर यावयाला एक गाठ पडली.

" इतकी झक् मारलीस ती मारलीस, पण आपला डाव फसतो असें कळल्यावर आपल्या भाडोत्री साथीदाराना जागच्या जागीं ठार करून कटाचा मुद्देमाल नष्ट करण्याइतका देखील शहाणपणा तुला सुचला नाहीं ? तेव्हांच जर तू त्याना ठार केलें असतेस, तर आज तुझ्या पापाना वाचा फुटावयाची तरी टळली नसती का ? मूर्ख ! अक्कलशून्य ! जा ! माझ्या पुढून काळें करून चालता हो ! पुन्हा वाड्यात तोंड दाखविशील तर खबरदार ! "

राणीचा हा राग म्हणजे केवळ पुराचे खळखळें पाणी आहे, आपणाशिवाय तिला गति नसल्यानें ती आज ना उद्या पुन्हा आपल्याशीं पूर्ववत् गोडीने वागू लागेल, हें गमाजीला पूर्णपणें माहीत असल्यानें तो मनातून फारसा नाराज न होता मुकाट्यानें बाहेर निघून गेला

तेव्हापासून हें गढूळ पाणी शात करण्यात राणीचे आठ पधरा दिवस सहज निघून गेले. तिने चिटणीस, पेशवे याना एकेकट्याला बोलावून घेऊन सर्व अनर्थांचे खापर मुतालिक पितापुत्राच्या माथीं मारण्याचा क्रम सुरू ठेवला. त्याच्या उलट त्या पितापुत्रानीं असा बहाणा चालविला कीं राणी सर्व काहीं करून सवरून पुन्हा नामानिराळी ! हा लपडावाचा खेळ चालला असता मुतालिक, प्रतिनिधि वगैरे मडळीने गुप्तपणें राणीला धीर देऊन सामन्यासाठीं उभी ठेवण्याची करामत चालविलीच होती.

राणीही जरी त्या हस्तकाच्या तत्राप्रमाणे थोडीफार वागत असे, तरी तिची अवस्था सर्व बाजूनीं पख तोडलेल्या मैनेसारखी झाली होती. निरनिराळ्या सरदाराशीं सधानें राखून सैन्याची जुळवाजुळव तिनें जरी चालविली होती, तरी यात काहीं राम नाहीं असेंही तिचेंच मन तिला सांगत होतें. आता आपला डाव जर साधावयाचाच असला तर तो महाराजाच्या पश्चात्, तोंवर काहीं शक्य नाहीं, हें ओळखून ती भावी काळावर नजर देऊन धिमेपणानें वागत होती.

पेशवेही जरी बाह्यात्कारीं राणीची मर्जी राखून वागत असल्याचा बहाणा करीत होते, तरी तिच्या अतरगाचें त्याना मुळींच विस्मरण पडलें नव्हतें. त्यामुळें ते डोळ्यात तेल घालून आगामी सकटाला तोंड देण्याची तयारी करीत होते. महाराजानीं त्यांना जवळ जवळ सर्वाधिकार बहाल केल्यामुळें त्याना कोणतीही खबरदारीची तजवीज पूर्वीपेक्षा जास्त आत्मविश्वासानें करतां

येऊ लागली होती. शिंदे होळकर सातान्यांत येऊन पोहोंचलेच होते, इतर सरदारही येऊं घातले होते मुधोजी भोंसले जसा गुपचुप आला तसा गुपचुप माघारा गेल्यामुळें दत्तकाचें बंड तेवढ्यापुरतें तरी मोडलें होतें. रघूजी भोंसले, दाभाडे, गायकवाड व पवार हे राजधानींत येण्याची हेतुपुरःसर टाळाटाळ करीत असल्याने त्याची भीति बाळगण्याचें पेशव्याना कांहीं कारण उरलें नव्हते नाहीं म्हणावयाला कोल्हापूरकराची धडपड मात्र अजून पूर्ण थाबली नव्हती. मानवी उपायांनीं आपला कार्यभाग होत नाहीं असें पाहून त्यांनीं दैवी उपायाचा जारीनें अवलंब केला होता. ती बातमी राजधानींत येऊन पोहोचण्याला कितीसा उशीर ! प्रतापगडची भवानी देवी म्हणजे स्वराज्यसंस्थापक श्री शिवछत्रपतींचे उपास्य दैवत. त्या भवानीच्या कृपेनेंच शिवाजीमहाराजाना स्वराज्याची स्थापना करता आली. त्या भवानीवर जसा कोल्हापूरकराचा, तसाच सातारकराचाही विश्वास. त्यातूनही अलीकडे राणी पेशव्याना आजारून गोंजारून आपला कार्यभाग साधण्याची अखेरची खटपट करीत असल्याने व भवानी देवीला त्याप्रीत्यर्थ तिचीं अनुष्ठानें चालू असल्यानें कोल्हापूरकराच्या भक्तीला देवी भवानी भाळून त्याच्यासारखा कौल देईल कीं काय हें भय तिला उत्पन्न झालें, व तिने आपल्या अधिकारात प्रतापगडीं सैनिक पाठवून कोल्हापूरकराच्या अनुष्ठानकर्त्या ब्राह्मणाना तेथून हाकलून लावलें.

परंतु राणीची ही आपद्धर्मरूपी प्रसन्नताही फार दिवस कायम टिकू शकली नाहीं. बेगडी दागिन्यावरची बेगड कितीशी टिकवू असणार ? ती डाव–प्रतिडावाच्या घासाघिशींत हळुहळू निघून जाऊ लागली, व महाराजाची प्रकृति फारच बिघडून आता त्याचा महिन्या–पधरा दिवसाचाही भरवसा नाहीं असें वैद्यराजानीं जाहीर करताना महाराजाच्या पश्चात् गादीला वारस कोण, हा प्रश्न धसाला लागला. या बाबतींत आजवर तिच्या वाटाघाटी कोणाशीं झाल्या असतील तर त्या एकट्या पुतळेशीं; व त्याखेरीज आणखी एका व्यक्तीशीं तिनें त्याविषयीं वाटाघाट केली होती. कावळा बसावयाला व फादी मोडावयाला एक गाठ पडावी त्याच मासल्याची ती वाटाघाट होती. ती वाटाघाट कोणाशीं झाली व त्यात काय निष्पन्न झालें हें तिनें आजवर पुतळेपासूनही गुप्त राखून ठेवलें होते. पण एके दिवशीं तिनें पुतळेला

एकान्तांत जवळ बोलावून विचारले, " काय ग, रावजी जगदाळा आजकाल कुठें आहे याचा तुला कांहीं पत्ता आहे काय ? "

रावजी जगदाळ्याचें नाव कानीं पडताच पुतळेला अंगावर पाल पडल्याचा भास झाला. रावजी जगदाळा हे तिच्या जीवनातील एक अत्यंत महत्त्वाचें अत्यंत गुप्त पण तितकेंच तिच्या जिव्हाळ्याचे रहस्य होते प्रतापराव तिचा लग्नाचा पति खरा, तिचें त्याच्यावर पतिव्रता या नात्याने अलोट प्रेम होतें हेंही खरें, पण खरे पाहता तिला तिच्या प्रेमाचा पुरेपूर मोबदला प्रतापरावाकडून कधींच मिळाला नव्हता. त्याच्या उलट रावजी जगदाळ्याचें जवळ जवळ तिच्या लग्नापूर्वींपासून तिच्यावर प्रेम होते, तें त्याने तिचें लग्न झाल्यावर राजपुत्र राजारामाच्या खुनाचे कारस्थान सकवारबाईच्या नेतृत्वाखालीं शिजत असताना एका प्रसंगीं पुतळेपाशीं व्यक्त केले होतें, व पुतळेनें त्याची तेव्हा निर्भर्त्सना केली होती तरीही रावजीचें तिच्यावरील प्रेम अढळ—अगदीं ध्रुवताऱ्याप्रमाणें अचल होते. रावजी हा प्रतापरावाचा एक जीवश्चकण्ठश्च मित्र होता राजपुत्राला वाचविण्याच्या कामगिरीवर प्रतापराव पुतळेच्या प्रोत्साहानाने गेला, व गमाजीच्या वतीने राजपुत्राचा खून करण्यासाठीं म्हणून रावजी जगदाळाही तिकडे गेला, तेव्हा रावजीने भगीरथ प्रयत्न करून केवळ पुतळेवरील प्रेमासाठीं आपला जीव धोक्यात घालून राजपुत्राचा व प्रताप रावाचाही जीव वाचविल्याचे प्रतापरावाच्याच तोंडून पुतळेला कळलें होते. रावजीचें पुतळेवरील प्रेम मेरूप्रमाणे अढळ होते, तर पुतळेची प्रतापरावाविषयींची भावना विजेप्रमाणें कधीं एका बाजूला आदराने तळपे, कधीं दुसऱ्या बाजूला कोपानें झळके, अशी आपणाशींच शिवाशिवीचा खेळ खेळे. परंतु शेवटीं प्रतापरावाच्या तोंडून रावजीच्या अपूर्व स्वार्थत्यागाची कहाणी ऐकल्यापासून ती त्याला मनुष्यकोटीपेक्षाही श्रेष्ठ अशा देवकोटींतील गणू लागली होती इतके सारे पूर्वस्मृतीचें त्रिभुवन राणीच्या एका प्रश्नासरसें पुतळेसमोर उभे राहिले, तेव्हा तिच्या मुखावाटे शद्ब निघेना.

" का ग बोलत नाहींस ? " पुतळा बोलत नाहीं असें पाहून राणीनें पुन्हा विचारलें.

" मला त्याचा पत्ता माहीत नाहीं आईसाहेब ! "

" त्याचा पत्ता काढशील का ? "

" कशाला ? "

" एक महत्त्वाचें काम आहे. "

" मला त्याचा पत्ता कसा मिळणार ? "

" मिळाला तर तो तुलाच मिळणार. तुझ्यासाठींच तर तो इतक्या तरुणपणीं वनवासी झाला आहे असें ऐकत्यें. "

" कोणीं सागितले हें आपणाला ? "

" कोणीं सागितलें ! तू सागितलें नाहींस म्हणून कळायचें राहतें होय ?"

" पण कोणीं सागितले ? "

" माहुलीच्या स्मशानात तो एक तरुण बैरागी आहे ना, त्यानें सागितलें. "

बैराग्याचें नाव ऐकताच पुतळेच्या विस्मयाला पारावार उरला नाहीं. तिला प्रश्न पडला, त्याला इतकी माहिती कशी ? त्याला ही सारी माहिती पुरवितें तरी कोण ? कीं तो अतर्ज्ञानी आहे ?

" त्यानें काय काय सागितले ? "

" तुझी आणि रावजीची गेल्या वर्षी गाठ पडली होती ना ? तेव्हा तो गमाजीच्या पदरीं नोकरीला होता. प्रतापराव तुझा नवरा लहानपणापासून परागदा होता व तो वारला अशी तुमची सर्वांची समजूत होती, तेव्हां तो तुझ्याकडे प्रेमाची मागणी करायला आला होता. पुढें तू त्याला निष्ठुरपणानें बोलून त्याची निर्भर्त्सना केलीस, त्यानतर त्याने प्रतापरावाच्या जिवावरचें सकट स्वतःच्या जिवावर ओढून घेऊन तुझें सौभाग्य अढळ राखलें, अशा बऱ्याच गोष्टी त्या बैराग्याकडून मला कळल्या. "

" पण आपण तरी कशासाठीं म्हणून एवढी चौकशी त्या बैराग्यापाशीं केली बरें ? "

" अगदीं खरें सागू ? माझ्या गळ्याची शपथ आहे कुठें बोलशील तर. तो बैरागी त्रिकालज्ञानी आहे असें मला कोणींतरी सागितलें होतें. "

" मींच सागितले असेल तें आपल्याला. "

" असेल. त्याला मीं मागें माहुलीला गेल्ये होत्यें तेव्हा मुद्दाम वाड्यांत आणवून विचारलें कीं राजमाता व्हायचा योग माझ्या नशिबीं आहे कीं नाहीं ? त्यानें मला सागितलें कीं योग नाहीं, पण कष्टेंकरून प्राप्त होऊं शकेल. त्या बैराग्याच्या भविष्यकथनाप्रमाणें राजपुत्राच्या मृत्यूचें रहस्य

उलगडण्याला एकटा रावजी जगदाळाच काय तो समर्थ आहे. महाराज वगैरे सर्वांचें म्हणणें पडतें कीं राजपुत्र जिवत आहे. पण मला पक्कें माहीत आहे कीं राजपुत्र ठार मारला घेला."

"आपणाला पक्कें माहीत आहे?"

"हो! गमाजीनें त्याचें मुडकें कापून आणून देखील मला दाखविलें होतें, व रावजी जगदाळ्यानेंच गमाजीच्या वतीनें ती कामगिरी पार पाडली असावी. त्यानें भेटून जर हा खरा प्रकार आपल्या तोंडानें कबूल केला, तर महाराजाचा व इतराचा भ्रम तरी दूर होईल, आणि कुठचा तरी गुराखी माझ्या माडीवर बसून माडी विटाळायची व वश वाटावयाचा, तो प्रसग टळेल. मला त्या बैराग्याने आणखी असेंही सागितलें कीं राजपुत्राबाबतचा निर्णय समाधानकारक लागावा यासाठीं तो सध्या ह्या प्रातात भटकत असतो, व तो केव्हातरी राजवाड्यात प्रगटही होण्याचा सभव आहे. तो वेळींच प्रगट झाला तर उपयोग."

"खरें. पण आपल्या पायाशपथ सागत्यें मी, मला त्याची कांहींच माहिती नाहीं."

पुढें पुतळेच्या मुखावाटे शद्ब उमटेना, व डोळेही अश्रूनीं डबडबून आले.

"तुला इतकें वाईट का बरें वाटलें?"

"वाईट वाटलें नशिबाचे खेळ आठवून. काटेरी कुंपणावरून रेशमी झिरझिरीत वस्त्र ओढावें तसें देव माझें आयुष्य सकटाच्या कांटेरी कुपणावरून रोज ओढतो आहे. सुखाचा वाटा मागच्या जन्मीं मीं देवापाशीं दिलाच नाहीं, तो या जन्मीं देव तरी मला कुठून देईल!"

"होय बाई! तू त्या दृष्टीनें अभागी दिसतेस खरी. प्रतापरावाचा तसा शेवट, तुळाजीचा असा शेवट,—मी तरी काय करू साग बरें! आता तुझें रावजीवर प्रेम असेल, आणि तो भेटला, तर मी त्याला शिलेदारी देईन, आणि मग तूं त्याच्याशीं लग्न करून सुखी हो."

पुतळा तेव्हा काहीं बोलण्याच्या अथवा ऐकण्याच्याही मनस्थितींत नव्हती. ती एखाद्या वेडीप्रमाणें राणीला म्हणाली, "आईसाहेब! माझें डोकें आतां ठिकाणावर नाहीं. मी घरीं जाऊन जरा पडत्यें." आणि राणीच्या परवागीची देखील वाट न पाहता ती तेथून निघून गेली.

पुतळा गेल्यावर प्रतिनिधि भेटीला आले. त्यांच्याबरोबर मुतालिक पिता-पुत्रही होते. त्यांच्यापाशींही राणीनें रावजीची गोष्ट काढली. शिळया कढीला कढ आणण्यासारखा हा प्रकार आहे हें माहीत असूनही त्याना यावेळीं रावजीचा तपास लागणें हितावह वाटू लागलें व त्या उद्योगाला ते लागले. कारण रावजीच्या मुखानें राजपुत्र मेल्याचें सिद्ध झाल्यावर त्याचें दत्तकाबाबतच्या योजनेचें तारू त्याना पुन्हा समुद्रात लोटावयाला संधी मिळणार होती.

## प्रकरण २३ वे

# वैराग्याची शेवटची भेट

राणीचा निरोप घेऊन पुतळा बिऱ्हाडीं गेली, तरी तिला काहीं सुचेना कीं काहीं रुचेना. भुजगाच्या मस्तकातील हिरा कोणीं अरण्यातून चोरून नेल्यावर प्रकाशहीनतेमुळें पगू झालेला भुजग त्या हिऱ्याच्या शोधार्थ अरण्यात सैरावैरा हिंडू लागावा, त्याला कोठेतरी तो हिरा असल्याचे त्याच्या अधुक प्रकाशकिरणाच्या भासानें वाटावे, व त्याचा शोध करण्यासाठीं त्याच्या अंतः-करणाला तळमळ लागून कुठे जाऊ आणि काय करू असे त्याला होऊन वणवण हिंडता हिंडता त्रिभुवन अपुरें पडावें, तशी पुतळेची अवस्था झाली. प्रतापराव हयात असताना तिनें रावजीचें प्रेम झिडकारलें, तरी तें केवळ पतिव्रताधर्म म्हणून. एरव्हीं रावजीच्या प्रेमाची थोरवी प्रतापरावाच्या प्रेमा-हून विशेष आहे, हें तीही ओळखून होती परतु प्रतापरावानें राजपुत्राच्या जिवावरचें सकट टाळून पानगावाहून परत आल्यावेळीं रावजी आता माघारा येणें शक्य नाहीं असे विश्वासनीय माहितीवरून सागितल्यामुळें तिनें आजवर त्या हरपलेल्या श्रेयाचा नाद सोडला होता. कुठें पानगाव आणि कुठें सातारा ! पुतळेला मनातून खूप वाटले कीं रावजी सुखी व्हावा, तो आपणाला भेटावा. पण उपयोग काय ? ती परतत्र स्त्री पडली. नवऱ्याला सशय येऊ नये म्हणून रावजीचें गुणवर्णन करण्याची देखील तिला चोरी. ती मनातल्या मनात हळहळण्यापेक्षा आणखी काय करणार ! विशेषतः ती स्वतः प्रतापरावासमवेत सुखाचा ससार करीत असताना रावजीनें केलेल्या आत्मयज्ञाची घडोघडीं आठवण होऊन तिनें एकान्ताच्या जागीं बसून केव्हा केव्हा पोटभर रडावें. तोच रावजी जर तशाच सासारिक जीवनाच्या बेचिराख स्थितींत राणी म्हणाली त्याप्रमाणें ह्या प्रातीं आला असला, आणि त्याचा जन्माचा प्रीतिविषय होऊन बसलेली ही त्याची सजणा—त्याची पुतळा माहुली-

ऱ्या स्मशानातील एका तरुण बैराग्यावर प्रेम करीत असल्याचें त्याला कळून आलें, तर तो मनात काय बरें म्हणेल ?

पुतळेने तेव्हा मनात उसळणारे विचार मनालाही न सागता ती एकदम वडूथला रावजीचें घर होतें तेथे शोधार्थ गेली. जाताना ती साकसुरतपणें रावजीचा शोध करण्याच्या कामगिरीवर राणीला सागून निघाल्यामुळें तिला मागील कसलीच चिंता करण्याचे कारण नव्हतें. पण ती तेथें जाऊन पाहते तों रावजी तिथें नाहीं !

" रावजी इकडे आल्याची खबर मिळाली म्हणून आल्यें." पुतळा रावजीच्या आईला म्हणाली.

म्हातारी कष्टाने उत्तरली, " माझा बाबा इकडे आला असता, तर मला भेटल्याखेरीज कसा राहिला असता ? तो आलाच नाहीं. मीं ऐकलें आहे कीं सजणा नावाच्या कोणा सटवीने त्याचा विश्वासघात करून अपमान केल्या-मुळें तो जो बार्शी—पानगावाकडे कसल्याशा कामगिरीवर म्हणून निघून गेला, तो माघारा आलाच नाहीं मीं त्याचा पुष्कळ तपास केला. पण त्याचा पत्ताच नाहीं. जिने माझ्या बाबाला असे राखेत बसविले तिला देव तशीच राखेंत बसवील."

म्हातारीच्या शापाचा वज्राघात पुतळेनें शातपणे सहन केला. तिला म्हातारीचा राग मुळीच आला नाहीं, उलट म्हातारीच्या शापवाणींत उमट-लेला देवाघरचा न्याय तिला ततोतत पटला. ती काहीं तरी बोलावयाचें म्हणून, व बोलल्याशिवाय राहवेना म्हणून गभीर वाणीनें म्हणाली, "आजी ! मीं ऐकलें आहे कीं परमेश्वरानें त्या सजणेलायथायोग्य प्रायश्चित दिलें आहे. ती सटवी नुक्तीच चार महिन्यापूर्वी विधवा होऊन हालअपेष्टा भोगीत आहे."

" खरेंच ? अरेरे !" म्हातारीचें अतःकरण लगेच द्रवले. ती हळहळत उद्गारली, " रागाच्या भरात मी बोलून गेल्यें इतकेंच. पण देवानें असा कुणाचा अत पाहू नये. कुणाचेंही बरे भले व्हावें. माझा रावजी जर आला तर त्याला मी हे अवश्य सागेन पण का ग, माझा आणि माझ्या बाळाचा तळतळाट त्या सजणेला बाधला, म्हणूनच ती विधवा झाली. आतां तरी तिनें माझ्या बाळाशीं पाट लावायला काय हरकत ? म्हणावें तोही सुखी अन् तीही सुखी होईल. थांब, मीच आता चार दिवसानीं महाराजाच्या

पायापांशीं येत्यें, आणि त्याना माझें गाऱ्हाणें सागत्यें. त्यानीं माझ्या बाळाचा शोध करून त्याचा ससार थाटून दिला पाहिजे. आम्ही रयतेनें राजासाठीं जन्मायचें आणि राजासाठीं मरायचें. मग आमच्या सुखदुःखाची काळजी राजानीं नाहीं तर कुणीं घ्यायची ?"

म्हातारी सहज शुद्ध मनानें बोलत होती. पण धर्मशील द्विजानीं सध्येच्या रूपाने दिलेल्या अर्घ्यांचे बाण सूर्यरिपूचीं काळजें चिरून त्याना जर्जर करतात असें म्हणतात, त्याप्रमाणें म्हातारीचा एकैक शद्व पुतळेचे काळीज कापून जात होता. जणूं काय पुतळेमुळें राखेंत बसलेल्या रावजीच्या मातेची ती शापवाणीच पुतळेला भोंवत होती. तिच्या मनात तेव्हा सारासार विचाराचें तुमुल युद्ध पुन्हा पूर्ववत् सुरू झालें.

"एका दृष्टीनें विचार करता मी परपत्नी, रावजीच्या जिव्हाळयाच्या मित्राची पत्नी मी. रावजीचें माझ्यावर निःसीम प्रेम होतें हें कबूल. पण मीं परस्त्री असताना त्याच्या प्रेमाचा आदर कसा करणार ? बाकी, त्याचें प्रेम निःस्वार्थी खरें, म्हणूनच त्यानें आपले जीवित संकटात घालून माझ्या पतींचा जीव वाचविला. आणि त्यानें या देशाचें नाव अजिबात सोडलें, तें तरी माझी वारंवार भेटगाठ होऊ नये म्हणून. इतका पराक्रमी व कर्तबगार तरुण तो, तो आजवर लग्नाशिवाय थोडाच राहिला असेल ? निराळा ससार त्यानें तिकडे थाटला नसेल कशावरून ! माझ्या मनातदेखील त्याच्याविषयीं कमी प्रेम नव्हतें. पण माझे लग्नाचे पति येताच त्या प्रेमाला मी देवधर्माच्या भयानें लाथाडू शकल्यें कीं नाहीं ? रावजी त्याच्यापेक्षा कितीही पराक्रमी, प्रेमळ व सुदर असला, तरी तो परपुरुषच. पूर्वजन्मीं आम्हीं एकमेकाच्या नांवानें तीळतादूळ खाल्लेच नव्हते, म्हणून या जन्मीं ससारात आमचें मीलन अशक्य झालें. हें दैवाचें दान मीं जसे शातपणानें व विवेकानें पदरीं पडलें तसें गोड मानून घेतलें, तसेंच रावजीनेंही केलें नसेल कशावरून ! मला सदैव फुलात घालून वागविण्याची इच्छा बाळगणाऱ्या प्रियकराच्या अतःकरणाचा पाटव मी जर तिरस्कार व उपेक्षा या काटेरी वेलावरून फरफरा ओढून त्याच्या चिंधड्या करण्याला ओशाळल्यें नाहीं, तर असल्या पाषाणहृदयी पुतळेची पर्वा तो तरी कोठवर करील ? माझ्याप्रमाणेंच आपल्या संसाराचा नवा मांड त्यानें खास माडला असेल......"

खळवळणाऱ्या वेगवान प्रवाहातील पाण्याच्या लाटा केव्हा कोणत्या खडकावर आदळतील व कपाळमोक्ष करून घेतील याचा काहींच नेम नसतो. आदळत आपटत डोके फोडीत जाणे हेंच त्याचें जीवन. तीच अवस्था पुतळेच्या उचबळून आलेल्या विचाराचीही होती. मनाचा विरगुळा करण्यासाठीं तिने रावजीला आपणाप्रमाणेंच संसारी बनवून सोडले खरें. पण लगेच तिचे तिलाच वाटलें, "पण मग रावजी आपल्या आईला का भेटला नाहीं? संसारात रगून जन्मदात्या आईला विसरण्याइतका कृतघ्न वृत्तीचा तो आहे काय? नाहीं. नाहीं. रावजीनें खरोखरच हा प्रेमयज्ञ केला असला पाहिजे."

"आणि तो प्रेमयज्ञ कोणासाठीं?" पुतळेचें अनुतापदग्ध मन बोलू लागले, "तो प्रेमयज्ञ कोणासाठीं? तर आजवर वैषयिक प्रेमाच्या धुदींत जिला असल्या प्रेमिकाची आठवणही झाली नाहीं, वैधव्य कपाळीं आल्यावर देखील, रावजी जशी जन्मभर माझ्यासाठीं भूकतहान न म्हणता पृथ्वी धुडाळीत होता, तसे त्याला धुडाळून पाहण्याची बुद्धि ज्या मला झाली नाहीं, तिच्यासाठीं. जवळच्या तरुण बैराग्यावर माझें मन चटकन् बसले, पण रावजी मात्र आठवला नाहीं. त्यापेक्षा रावजीसाठीं त्रिभुवन पालथें घालण्याची बुद्धि मला का नाहीं झाली? पुतळेसाठीं आजन्म विरहयातनात होरपळत वणवण करण्यात रावजीला जसें सुख लाभले, तशा सुखाचा लाभ करून घेणें ह्या पुतळेला का बरें सुचलें नाहीं?" पुतळा क्षणभर थाबली. तिनें त्या एका क्षणात मनाचा निर्धार केला, "बस्स! तो तरुण बैरागी माझा कोणी नव्हे व मी त्याची कोणी नव्हे. तो माझा पाठीराखा भाऊ व मी त्याची पाठची बहीण. त्याला मी सागणार कीं रावजीचा शोध मला करायचा आहे, त्या वृक्षाचा आधार ह्या वेलीला हवा आहे. तो आधार मिळाला नाहीं तर ही वेल विरहाने तापलेल्या जमिनीवर होरपळून वाळून मरून जाईल पण दुसऱ्या वृक्षाचा आधार घेणार नाहीं...आणि रावजीची आई पुत्रविरहानें जन्मदुःखी होऊन बसली, याला कारण तरी मीच चाडाळीण! त्या पापाचें अंशतः प्रायश्चित्त घेण्यासाठीं मला त्या म्हातारीचें शेष जीवन सुखाचे करण्यासाठीं झटलें पाहिजे."

पुतळेच्या मनाचा निश्चय झाला. ती म्हातारीला म्हणाली, "आई, तुम्ही अवश्य साताऱ्याला या. माझें घर राजवाड्याशेजारींच आहे. कोणीही

विचारलें तरी थोरल्या राणीसाहेबाच्या पुतळा दासीचें घर तुम्हाला दाखवून देईल. तुम्ही या, मग आपण रावजीचा तपास करू. तो तुम्हाला भेटेतो मीच तुमचा रावजी आहे असे समजा. तुमच्या म्हतारपणीं मी तुम्हाला अंतर देणार नाहीं."

कुठची कोण पुतळा, आणि ती इतकी आपणाला धीर देते, असे पाहून म्हातारीला आनंदाने व अभिमानानें आकाश ठेंगणें झाले. तिने लौकरच पुतळेपाशी जावयाचे कबूल केले. दरम्यान मार्गात जर रावजीचा शोध लागला तर लावण्यालाही सांगितले. ती पुतळला आणखी असे म्हणाली, "तुझ्या-एवढ्याच वयाची माझी सून होती हो! ती एव्हाना तुझ्याएवढीच दिसली असती. देवाने मला तिच्या पोटीं एक नातूही दिला होता. पण तिला काय गुण आठवले, ती कुणाच्या तरी नादानं मुलगा सहा महिन्याचा असताना टाकून घरातून निघून गेली. तेव्हापासून तिचा पत्ता नाहीं. रावजी भेटला तर बोलायचें नाहीं बर त्याच्यापाशीं हं! लाजेची गोष्ट म्हणून आम्ही कुठे बोलत नाहीं. लोकांना सांगतो कीं रावजीचें लग्नच झालें नाहीं. करणार काय! आपला नाग आणि लोकांत हसे! साताऱ्यातच कुठे तरी माझी सूनबाई निघून गेली होती. आता जिवंत आहे कीं मेली नकळे! तिचा मुलगा जर पाहिलास, तर थेट बापासारखा सुंदर आहे बघ! बिचाऱ्याची काय दशा झाली असेल भगवान जाणे!

पुतळेच्या मनात निराळेच गंभीर विचार घोळू लागल्याने म्हातारीच्या ह्या अखेरच्या उद्गाराकडे तिचे लक्ष्य नव्हते. ती नुसती हो हो म्हणून मोकळी झाली, व म्हातारीला साताऱ्यात आपल्या घरीं यावयाला आग्रह-पूर्वक सांगून बाहेर पडली. तिने थेट सातारा–माहुलीचा मार्ग धरला. जर रावजीची काहीं माहिती असेल तर ती त्या बैराग्यालाच असेल, शिवाय तो त्रिकालज्ञानी असल्याने तो रावजीचा शोध करण्याची नक्की दिशाही दाखवून देऊ शकेल, अशी तिला आशा होती. त्या आशेबरोबरच आणखी एक इच्छा—केव्हा एकदा त्या तरुण बैराग्याला तू माझा पाठीराखा भाऊ आहेस असे सांगून आपण त्याचा संदेह दूर करतो असे तिला होऊन गेले होतें.

पुतळा त्या रात्रीं साताऱ्याला जाऊन पोहोचली, व उजाडताच उठून माहुलीला गेली. आज मुकुंदा जागा होता व बरोबर येणार असा हट्ट करू

लागला, तेव्हा तिला त्याला बरोबर घेणे भाग पडले रस्त्याने जाताना मनात घोळणाऱ्या विविध तापदायक विचाराची तीव्रता कमी करण्याला, उन्हाचा ताप वाऱ्याच्या झुळुकानी सुसह्य होतो त्याप्रमाणे, मुकुदाचे बाळबोल तिला फारच सुखावह झाले.

तरुण बैरागी तेव्हा आपल्या झोपडीसमोर उगवत्या सूर्याचे कोंवळे उन्ह अगावर घेत बसला होता. राई त्याच्या जवळच रेतींत पहुडली होती. पुतळा जवळ जाताच राईने जवळ जाऊन तिचे हातपाय चाटून व तिच्या अगावर उड्या मारून तिचे प्रथम स्वागत केले राईला पाहून मुकुदाला त्या दिवशींची—त्याच्या घराला प्रतापरावाच्या पिशाच्चाने आग लावली त्या दिवशींची आठवण झाली, व तो प्रेमाने तिच्याशीं खेळू लागला

पुतळेने त्या तरुण बैराग्याच्या पाया पडून आपली कर्मकहाणी त्याला निवदन केली रावजीच्या आईची भेट झाल्याचा मजकूरही त्यात येऊन गेला. शेवटी तिने पुन्हा दोन्ही हात जोडून त्याला विनविलें, " आपण अतर्ज्ञानी आहा आपण माझे गुरू आहा. पाठीराख्या भावाप्रमाणे आपण मला या वेळी हात दिला पाहिजे, रावजींची भेट मला झाली पाहिजे "

" तो जिवत आहे कीं नाहीं हें तरी कसे समजावयाचे ? ' बैरागी मध्येच म्हणाला. पण लगेच दुसऱ्याच क्षणाला त्यानें जीभ चावली राणी-पाशीं तो रावजी जिवत असल्याचे बोलून गेला होता, व पुतळेने आताच राणीच्या भेटीचा उल्लेखही केला होता ती आपली चूक त्यानें लगेच सावरून घेतली, " इतक्या दिवसात त्याने आपल्या जिवाचे काहीं बरे वाईट करून घेतले नसेल कशावरून ? "

रावजीच्या जिवाच्या बऱ्यावाइटाचा शद्ब कानीं पडताच पुतळेच्या डोळ्यात गगायमुनाचा उगम झाला.

" तुला त्याची भेट व्हावी अशी इच्छा आहे ? " बैराग्यानें विचारलें.

" होय. "

" कशासाठीं ? "

" त्याची म्हातारी पिल्लू हरवलेल्या पाखरासारखी टाहो फोडीत बसली आहे, तिच्या समाधानासाठीं. राजवटींत आज राजपुत्राच्या अस्तित्वाविषयीं जबरदस्त गैरसमज माजून राहिला आहे, त्या गैरसमजाचें योग्य निराकरण

हाऊन राणीचे दात तिच्या घशात पडण्यासाठीं आणि आणि "
एवढें बोलून पुतळा अडखळली.

"का? अडखळलीस का?" बैराग्याने विचारलें

पुतळा बैराग्यासमोर दोन हात व तिसरें मस्तक जोडून गद्गद स्वरानें उद्गारली, "ते आपण मला कृपा करून विचारू नये. आम्हा प्रापंचिकाचीं अंतःकरणें प्रापंचिक सुखदुःखानीं नेहमींच व्यापलेलीं असायचीं."

बैराग्यानेही तेवढ्यात समाधान मानून घेतले, व क्षणभर गंभीरपणें स्वतःशीं डोळे मिटून एकाग्रतेनें विचार केल्यावर तो पुतळेला म्हणाला, "जा तू. परमेश्वराची तुझ्यावर पूर्ण कृपा आहे. तो सर्व काहीं तुझ्या मनाजोगें करील. आता यापुढे तू माझ्या भेटीला येण्याचा प्रयत्न करू नकोस. मी तुला कधींच भेटणार नाहीं आणि माझा तुला असा आशिर्वाद आहे कीं, माझ्याकडे साह्यार्थ धावून येण्याजोगे संकटही यापुढे तुझ्यावर कधीं ओढवणार नाहीं."

"पण आपल्या पायाचे दर्शन पुन्हा "

"नाहीं जा तू ईश्वर तुझे कल्याण करील, तुझ्या मुलाचेही कल्याण करील. राणीला सांग कीं आजपासून आठव्या दिवशीं शुक्रवारीं रावजी जगदाळा येऊन भेटेल, व तुमची आणि सर्वांचीच संशयनिवृत्ति करील. यापेक्षा जास्त मला काहीं विचारू नकोस माझी आठवण म्हणून तुला काहीं पाहिजे असेल तर ती राई—तो मुका जीव आपल्या स्वाधीन करून घे, व तिचें नीट संगोपन कर." असें म्हणून बैराग्यानें राईला हाक मारली. ती उड्या मारीत जवळ आली. त्यानें प्रेमानें तिला आंजारून गोंजारून तिचे मुके घेऊन पुतळेच्या स्वाधीन केले. त्या मुक्या जीवाला बैराग्याची भाषा व त्याचे विचारही कळत होते म्हणून कीं काय, बैरागी एका घोंगडी कफनीनिशीं तेथून तीरासारखा नाकासमोर जाऊ लागला, तेव्हा ती त्याच्या मागो माग न जाता नुसती त्याच्याकडे टक लावून पाहत होती.

बैरागी दिसेनासा होईपावेतों पुतळा त्याच्याकडे टक लावून बसली होती. तो झाडाझुडपाच्या व घराच्या आडवशाला जाऊन दिसेनासा झाल्यावर ती त्याच्या झोंपडीला भक्तिभावानें नमस्कार करून जड अंतःकरणाने मुकुंदा व राई यांच्यासह साताऱ्याकडे वळली.

## प्रकरण २४ वें

# महाराजांचें प्राणोत्क्रमण

" आईसाहेब ! आपण बोलता ते आपले बोल कंठाच्या वरचे आहेत. अंतःकरणाच्या ओलाव्यात त्याचा उगम मुळींच नाहीं."

बैरागी व पुतळा यांची भेट झाल्याच्या आठव्या दिवशींची गोष्ट. महाराजांना, आतां आपला घडीचा तरी भरवसा आहे कीं नाहीं याचीही भ्रांत पडल्यामुळें त्यांनीं राणीची मनधरणी करून पेशवे, चिटणीस, प्रतिनिधि, सुमंत, अमात्य, देवराव मेघःश्याम, मुतालिक, राजाज्ञा, शिंदे, होळकर, फत्तेसिंग बाबा भोंसले, वगैरे जी जी कारभारी मंडळी राजधानींत अथवा आसपास होती, त्यांच्या अखेरच्या भेटीचा योग जुळवून आणला, त्या दिवशींचा हा प्रकार. ह्या कारभारी मंडळीखेरीज ताराबाईदेखील आपल्या कारभाऱ्यांसह तेथें राणीच्या विनंतीवरून उपस्थित होती. महाराजांचे शय्यागृह हीच त्या दिवशीं दरबारची जागा शोभत होती. महाराज आसन्नमरण स्थितींत शय्येवर पडले होते त्यांच्या प्रकृतीविषयीं आशा करण्याला जागा नसल्यानें सर्वांच्या चर्येवर औदासीन्याची काळी छाया पडली होती. आज कैक दिवस महाराजांच्या आज्ञेवरून त्यांच्या शय्यागृहांत विद्वान ब्राह्मणांकडून संस्कृतांत व प्राकृतांत हरिनामाचा गजर अष्टौप्रहर सुरू असे. अशानें प्रकृतीला आराम न पडतां ती जास्त बिघडेल मात्र, असें वैद्यराजांनीं आग्रहानें वारंवार सांगितलें असतांही ' आमचा अंतकाळ आतां अगदीं समीप आला आहे, आतां आम्हांला परमेश्वराघरीं जाण्याची ओढ लागली आहे. त्याचें नामश्रवण घडल्यानें आम्हांला अंतसमयीं चित्तशांति लाभणार आहे. त्या शांतीच्या आड कोणीं येऊं नये ' असें सांगून आपल्या शय्यागृहाचें हरिकीर्तनालय बनवून सोडलें होतें. आज त्यांनीं सर्व मंडळीचें शेवटचें दर्शन घेण्याचें ठरविलें तें देखील केवळ स्वतःच्या इच्छेमुळें नव्हे, तर बहुतेक कारभाऱ्यांची व राणीचीही

तशी इच्छा म्हणून ! एरव्हीं ते स्वतः सर्व प्रकारचे भवपाश तोडून प्रभु-चरणीं विलीन होण्यासाठीं पचत्वाप्रत जाण्याला अगदीं सिद्ध होते याचा अर्थ, त्यांनीं आपल्या पश्चात् राजवटीची नीट व्यवस्था कशी होईल याची काळजी केली नव्हती असा मात्र नाहीं. त्या बाबतींत काहीं दिवसापूर्वी त्यानीं पेशव्याना एक आज्ञापत्र दिलेंच होतें, व शिवाय आणखी एक आज्ञापत्र स्वतःच्या सहीसह त्यानीं त्याच दिवशीं सकाळीं शेटीमार्फत गुप्तपणे पेशव्या-कडे पाठविलें होते पेशवे कसल्याही परिस्थितीशीं तोंड देण्याला पूर्ण समर्थ आहेत अशी त्याची निरनिराळया सरदाराच्या व कारभाऱ्याच्या भेटीगाठी-अतीं पूर्ण खात्री झाली होती आपल्या पश्चात् राजारामाला गादीचा वारस त्यानीं अगोदरच ठरवून टाकलें होते तरीपण खरा राजपुत्र जिवत नसून पेशवे वगैरे कारभारी कपूने सर्व सत्ता स्वतःच्या हातीं राहावी या हेतूने भल-ताच कोणीतरी गुराख्याचा पोर राजाराम या नावाने आणून गादीवर बसविण्याचा अट्टहास चालविला आहे अशी राणीची भुणभूण एकसारखी सुरू होती, व ती महाराजाना अगदीं असह्य झाली होती ते राणीचें समाधान करण्या-साठीं आज सर्वांना महाराजानी राणीच्या आग्रहावरून भेटीला बोलावलें होतें.

राणीला तो योग जुळवून आणण्याला कारण पुतळा ! बैराग्याने तिला सर्व काहीं तुझ्या मनाजोगे होईल असे आश्वासन दिले होतें, व शुक्रवारीं रावजी जगदाळा भेटून सर्व खुलासा करील असे भविष्यही वर्तविले होते पुतळेचा बैराग्यावर पूर्ण भरवसा होता. रावजीच्या भेटीने काहीं अनिष्ट प्रकरण उपस्थित होणार नाहीं अशीही तिला आशा होती तसें घडणार असते तर तिच्या कैवारी बैराग्याने तिला तशी आगाऊ सूचना दिली नसती का ? रावजी आला तर तो खरेंच सागणार याविषयीं तिला शका घेण्याचें कारणच नव्हते. परतु तिने राणीला फक्त रावजी अमूक दिवशीं येऊन भेटेल असे बैराग्यानें भविष्य वर्तविलें तेवढेंच सागितलें. राणीची ठाम समजूत कीं राजपुत्र ठार मारला गेलाच आहे, व तो रावजीच्याच हातून मारला गेला आहे. त्यानें पुढें येऊन तशी साक्ष दिली कीं औरस राजपुत्राची भानगड मिटली. मग पेशवे आहेत आणि आपण आहो पुतळेप्रमाणेंच राणीचाही त्या तरुण बैराग्यावर पूर्ण विश्वास होता त्याने भविष्य वर्तविल्याप्रमाणें रावजी येणार, त्याच्या तोंडची कबुली ऐकण्यासाठीं पेशव्यासह सर्व बुद्रुक

लोक तेथें हजर असलेले चांगले, असें मनात आणून तिनें आजचा हा योग मुद्दाम जुळवून आणला होता

पुतळा त्या कामीं राणीला मधून मधून उत्तेजन देऊन रावजीच्या जिवाचे कारभारी मंडळी काहीं बरे वाईट तर करणार नाहीं ना, असे भय प्रगट करीतच असे, व मीं रावजीला पाठीशीं घातले आहे, त्याची काळजी तुला नको, असे वारवार आश्वासन देऊन राणी पुतळेचे समाधान करीत असे.

असा प्रयत्न या दिशेने चालला असताना राणीने ही गाजराची पुंगी वाजली तर वाजली नाहींतर मोडून खाल्ली अशा दुटप्पी वृत्तीने कोल्हापूरकराना साताऱ्यावर स्वारी करण्याला चिथावणी देण्याचे कार्य सुरू ठेवलेच होते त्यात तिचा दुहेरी हेतु असा कीं, "राजपुत्राचा वध खरोखर झाला असे कळल्यावर तरी पेशवे वगैरे कारभारी आपल्याकडे वळले, तर ते परस्पर कोल्हापूरकराना परतून लावतीलच बरे, रावजी आला नाही व राजपुत्राच्या वधाची शाबिती न होता पेशव्याचा डाव सिद्धीला जाण्याची वेळ आली, तर त्याच्या हातीं राज्य जाण्यापेक्षा कोल्हापूरकराच्या हाती जाऊन साताऱ्याची गादी नष्ट झालेलीही पुरवली माझ्या हाती सत्ता नाहीं तर नाहीं, पण ती मी पेशव्याच्या हाती कदापि राहू देणार नाहीं."

राणी कारस्थानें करण्यात जितकी पटाईत होती तितकेच पेशवे तीं ओळखण्यात पटाईत होते हे जरी खरे, तरी हे कारस्थान पेशव्यानाही कळू नये इतक्या चतुरपणे राणीने केले होतें एकट्या विश्वासू पुतळेखेरीज दुसऱ्या कोणापाशींच तिने त्याची वाच्यता केली नव्हती आणि पुतळेपाशीं वाच्यता म्हणजे चोराच्या हातीं जामदारखान्याच्या किल्ल्या! कोल्हापुराकडे जरूरीचा खलिता घेऊन राणीचा सांडणीस्वार रवाना होण्यापूर्वीच पुतळमार्फत पेशव्याच्या कानीं ती खबर गेली, व सांडणीस्वार वेशीपार होतो न होतो तोंच सकाळीं त्याला पेशव्याच्या शिपायानीं त्याला धरून त्याच्याजवळचा खलिता हिसकावून घेतला होता सुद्धा! नुसता खलिता घेऊन ते शिपायी स्वस्थ बसले नव्हते, त्यानें माघारीं जाऊन राणीपाशीं चुगली करू नये म्हणून त्यानीं त्याला नीट बदोबस्ताने कैदेत ठेवलें होते.

पेशव्याच्या मनातून हा प्रकार होता होईतो अगदीं गुप्त ठेवावयाचा होता. परतु राणी महाराजाचे मन आपणाकडे वळविण्यासाठीं साळसूद–

पणाची सूज अगावर आणू लागली, पेशव्यावर विश्वास दाखवून व त्यांची स्तुति करून कोल्हापूरकराविषयीं अनुदार उद्गार काढू लागली, तेव्हा पेशव्याना तें सहन होईना. त्याना बोलल्याखेरीज राहवेनाच. त्यानी एकदम आवेशाच्या भरात राणीवर दुटप्पी वर्तनाचा प्रारभीं सागितल्याप्रमाणें उघड उघड आरोप केला.

"नाना! हा निव्वळ कृतघ्नपणा आहे. मी तुमच्याविषयीं इतका आदर व विश्वास दाखवीत असताना——"

"त्याचा कोल्हापुरी पुरावा माझ्यापाशीं आहे दाखवू काय?" पेशव्यानी रागानें विचारलें.

"दाखवा पाहू!" राणी मनातून चपापून हळूच पुतळेकडे पाहत म्हणाली.

पुतळेनें राणीला दिसेल अशा प्रकारें पेशव्याच्या नावानें बोटें मोडून आपली बाजू खंबीर केली.

पेशव्यानीं आगरख्याच्या खिशातून सकाळीं प्राप्त झालेला खलिता महाराजासमोर ठेवून म्हटलें, "हा पाहा पुरावा. हें हस्ताक्षर कोणाचें, ही मोहोर कोणाची वगैरे याची याहूनही जास्त वाच्यता इथे व्हावयाला पाहिजे आहे काय?"

महाराजाना बोलण्याची शक्ति नव्हतीच. ते आयुष्याचीं अखेरचीं घटका पळें मोजीत तें सर्व सभाषण ऐकत होते. ते हस्ताक्षर यमाजीचें होतें, व त्या कारस्थानात प्रतिनिधीही सामील होते ती सर्व मडळी एकमेकाच्या तोंडाकडे पाहूं लागली. अमात्य, सुमत, देवराव, वगैरे मडळीही आश्चर्यचकित होऊन एकमेकाकडे पाहू लागली. सर्वजण काय ओळखावयाचें तें ओळखून चुकले.

"आग लागो त्या कागदाला! असलीं आणखी किती बालटें वाट्याला यायचीं आहेत परमेश्वर जाणे!" असें म्हणून राणीनें तो कागद पेशव्याच्या हातून हिसकावून घेतला, व डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोच त्याच्या फाडून चिंध्या चिंध्या करून टाकल्या.

पेशवे यमाजी व प्रतिनिधि याच्याकडे मर्मभेदक दृष्टीनें पाहून म्हणाले, "त्याला आग लावावयाची होती ती लावता आली नाहीं, त्या अर्थी आता ती आग लावण्याच्याच योग्यतेचा."

असा प्रकार आता महाराजाच्या शय्यागृहाच्या दिवाणखान्यात चालला आहे, तोंच शेटीनें राणीपाशीं येऊन हळूच तिच्या कानात सागितलें, "बाहेर रावजी जगदाळा नावाचा कोणी मनुष्य आला आहे. तो आपली भेट घेऊं इच्छितो."

रावजी जगदाळ्याचें नांव कानीं पडताच राणी चमकून बाहेर पाहूं लागली. पुतळेच्या अधीरतेला तर पारावार राहिला नाहीं. राणीनें गमाजीला आज्ञा केली, "गमाजी, जा आणि रावजीला आत घेऊन ये."

गमाजी बाहेर गेला, व थोड्याच वेळात एका शिडशिडीत अगाच्या पण तेजस्वी मुद्रेच्या मराठा तरुणाला आत घेऊन आला राणी व गमाजी याखेरीज इतर सर्वजण असे बुचकळ्यात पडले कीं हा तर फाटका मराठा गडी दिसतो. याचें राणीपाशीं इतकें महत्त्व कशासाठीं? ते सर्व रावजीकडे नजरा खोंचून खोंचून पाहू लागले त्याच्या शिपाई बाण्याची साक्ष देण्याला एक तरवार काय ती त्याच्या कमरेला लटकत होती.

पुतळा रावजीकडे बुभुक्षित दृष्टीनें पाहत होती तिला त्याच्या पूर्वीच्या आणि आताच्या रूपात बराच फरक पडलेला दिसला इतकेच काय पण... पण तें इतक्यात कशाला?

रावजी तेथें येताच प्रथम महाराजाना, नतर पेशव्याना व त्यानतर ताराबाई वगैरे इतराना मराठशाही मुजरे करून महाराजासमोर दोन्ही हात जोडून उभा राहिला व विनम्र भावानें म्हणाला, "महाराज, थोरल्या आईसाहेबाच्या इच्छेवरून माझ्या गुरूनें मला धाकटे सरकार श्रीमत राजाराममहाराज याच्या मृत्यूचा खुलासा करण्यासाठीं इथें पाठविलें आहे."

राणी मध्येंच मनातील आनदाच्या उकळ्या दाबण्याचा प्रयत्न करीत म्हणाली, "मी काहीं साधुमहाराजाना तसें स्पष्ट सागितलें नव्हतें. पण त्यानी माझ्या मनातील भाव बिनचूक ओळखला. साधुमहाराज त्रिकालज्ञानी आहेत खरे!"

"माझे गुरुमहाराज खरोखरच त्रिकालज्ञानी आहेत." रावजी राणीकडे वळून हात जोडून उद्गारला.

राणीला खात्री होतीच कीं रावजी आता राजपुत्राचा वध झाल्याचें सांगणार. ती बेफिकीरपणें पेशव्याकडे पाहून पण महाराजासह सर्वांना उद्देशून

म्हणाली, “ राजपुत्र जिवत आहे असा आपणा सर्वांना जो भ्रम आहे, तो भ्रमनिरास ह्या रावजीच्या तोंडून आता होईल कारण त्या कारस्थानात याने स्वत.च खरा पुढाकार घेतला होता केवळ सत्यान्वेषण होण्याला मदत व्हावी म्हणून महाराजाच्या वतीने मी ह्याला ह्याच्या सर्व अपराधाची क्षमा केली आहे ” ती रावजीकडे वळून म्हणाली, “ रावजी! तू परमेश्वराला स्मरून खरा प्रकार काय असेल तो निर्भयपणे निवेदन कर ”

“ मी निवेदन करतों पण मी आता ज्या गोष्टी बोलेन त्या कोणत्याही प्रकारे माझ्या जिवावर बेतणार नाहींत, असे महाराजाच्या चरणाना साक्ष ठेवून मला सर्वांचे वचन पाहिजे आहे ” रावजी म्हणाला

“ सर्वांच्या तर्फेने मी तुला वचन देत्ये कीं कोणी तुझ्या केसालाही धक्का लावणार नाहीं आता साग खरें काय ते ” राणीने पुन्हा आश्वासन दिले.

रावजी महाराजासमोर हात जोडून उभा राहून सागू लागला, “ मागल्या वर्षी एथे बसलेल्या माझ्या धन्याकडून धाकट्या सरकाराचा खून करण्याच्या कामीं माझी पानगावीं रवानगी झाली होती धन्याची आज्ञा तर मला शिरसामान्य असली पाहिजेच पण धन्यापेक्षा मी धन्याच्या धन्याला जास्त मानतों. मी जगदाळयाच्या कुळात जन्मलेला आहे, व बक्षिसाच्या अथवा शिलेदारीच्या लोभानें माझ्या कुळात कोणीही आजवर राजाशीं दगलबाजी करणारा बद्अस्सल निपजलेला नाहीं मी त्या कामगिरीवर गेलो, पण तो धाकट्या सरकाराचा जीव रक्षण करण्याची मनोमय शपथ घेऊन मीं तिथे माझ्या धाकट्या धन्याच्या मनगटाला मनगट घासून काम केले पण ते करून मीं साधलें काय, तर धन्याना नकळत राजाशीं इमान! मी धाकट्या सरकाराचें मुडकें म्हणून जे माझ्या धाकट्या धन्याकडे आणून दिले, आणि जें त्यानीं थोरल्या आईसाहेबाना दाखवून धाकट्या सरकाराचा नाश झाल्याबद्दल त्याची खातरजमा करून दिली असेल, ते मुडके धाकट्या सरकाराना वाचविण्यापायीं बळी पडलेल्या एका तरुण कुणब्याचे होते मी तेवढ्यावरच स्वस्थ बसलों नाहीं, तर आजवर केवळ धाकट्या सरकाराच्या केंसाला तरी कोणी धक्का लावील तर डोळयात तेल घालून जपत होतों. मात्र माझ्या हालचाली कोणाला समजू नयेत यास्तव मी प्रगट झालो नव्हतो ह्या गुप्त वेषामुळेच मी धाकट्या सरकाराचेच काय पण श्रीमत पेशवे सरकार व श्रीमत चिटणीस

सरकार याचेही प्राण वाचवू शकलों आहे. याची थोडक्यात साक्ष पाहिजे असेल तर—" असें म्हणून रावजीनें आपल्या कमरेची तरवार म्याना-सकट सोडून सर्वांच्या मध्यभागीं टाकली, व सांगितलें, " जी तरवार त्या नीच तुळाजीच्या कमरेला चिटणीस सरकार व पेशवे सरकार याचा विश्वास-घाताने खून करण्यासाठीं लटकत होती, जी त्याला त्याच्या धन्याकडून खास देणगी म्हणून मिळाली होती, जिच्यावर धन्याच्या नावाची ढळढळीत खूणही आहे, व जिने त्या तुळाजीला कटस्नान घालून उभयता श्रीमताचा बचाव केला, ती ही तरवार पाहून त्या गोष्ट खरी, मीं माझा राजनिष्ठ बाणा सार्थ करण्यासाठीं दगलबाजाचे खून, त्याच्या घराची जाळपोळ असे अनन्वित अत्याचार केले पण त्याबद्दल मला सर्वांच्या वतीने थोरल्या आई-साहेबांकडून अभय मिळालेच आहे, तेच अखेरपावेतों मिळो म्हणजे झालें. यापेक्षा माझें आणखी काहीही मागणं नाहीं " असे म्हणून रावजीनें पुन्हा सर्व मंडळीला त्रिवार मुजरा केला

राणीने दात ओठ खात एकदम तेथें पडलेल्या तरवारीला हात घातला. तोच महाराज क्षीण स्वरात कण्हत कण्हत उद्गारले, " हा ! त्याला मीं अभय दिले आहे त्याला माराल तर मला माराल ! "

तेव्हा मात्र राणीचा निरुपाय झाला. तिने ती तरवार तशीच खालीं फेंकून दिली, व दात ओठ चावीत रावजीवर आग पाखडली, " हराम-खोरा ! विश्वासघातक्या जा चालता हो ! अगोदर इथून काळे कर ! "

" जशी थोरल्या आईसाहेबाची आज्ञा ! " असे म्हणून रावजी तेथून बाहेर निघून गेला त्याच्या मागोमाग राणीही पाय आपटीत बाहेर जाऊ लागली पण ताराबाईने त्या बैठकींत आल्यापासून प्रथमच तोंड उघडलें, " सूनबाई ! असा त्रागा करू नकोस. तुला शाहूच्या पायाची शपथ आहे. थांब. मी माझ्या नातवाचे किती कष्टानीं रक्षण केले आहे, हें आता सर्वांना कळून चुकले आहे. तथापि हा राजपुत्र खरा आहे याविषयीं आणखी खातरजमा कोणाला पाहिजे असल्यास हे अमात्य इथे आहेत यानी श्री-कृष्णामाईची शपथ घेऊन सांगावें."

अमात्यानीं ताराबाईच्या आग्रहावरून राजारामाच्या जन्मापासून आपण त्याचे कोणकोणत्या आपत्तींतून कसकसे रक्षण केले तो सारा वृत्तान्त सर्वांना

शपथेवर निवेदन केला. तो सपताक्षणीं राणी तेथून बाहेर निघून गेली. पण प्रतिनिधींनीं तिची उणीव भासू दिली नाहीं त्यांनीं अमात्याना विचारलें, "पण धाकट्या शिवाजीराजाच्या आणि भवानी राणीसाहेबाच्या पोटीं पुत्र जन्मला होता तरी का ?"

"असली शका घेणें आपणाला शोभत नाहीं." अमात्य म्हणाले.

ताराबाईला प्रतिनिधींचा प्रश्न अपमानास्पद वाटला. तो अपमानही तिनें मुकाटपणें गिळला असता. पण ती नुसती सहन करण्याची बाब नव्हती. प्रतिनिधि आज इतकी शका घेतात ते उद्या राजपुत्राला तो राजपुत्रच नव्हे असें म्हणण्यालाही कमी करणार नाहींत इतका दूरवर विचार करून ती अमात्याना म्हणाली, "तुम्हाला सर्व परिस्थिती माहीत आहेच. प्रतिनिधि आता तुमच्याबरोबर माहुलीला येतील. त्याच्या समक्ष कृष्णोदक हातीं घेऊन त्यांची खातरजमा करून द्या."

"कबूल आहे." अमात्य म्हणाले.

"चला तर." प्रतिनिधि म्हणाले.

लगेच महाराजाची नावापुरती अनुमति घेऊन ते दोघे माहुलीला निघून गेले. लगेच ताराबाईही महाराजाची सहानुभूतिपूर्वक विचारपूस करून गडावर गेली. जाताना तिला महाराजाची अतकाळची अवस्था पाहून रडू कोसळलें. महाराजांच्या मनाला यातना होतील म्हणून त्याच्यासमक्ष शोकावेग तिनें कसाबसा आवरून धरून व्यवहार म्हणून त्याना चार धीराच्या गोष्टी सागितल्या. पण ती मनात हळहळून परमेश्वराला विचारीत होती, "निष्ठुर परमेश्वरा! हा लहान वयाच्या आप्ताचा सहार पाहण्यासाठींच तूं मला जिवत ठेवलें आहेस कारे! हे माझे भोग सपणार तरी कधीं! हा राजवटीचा आधारस्तभ आज कोसळतो आहे, त्यापेक्षा मला मरण देऊन माझें शेष आयुष्य त्याला दिलें असतेंस, तर किती चागलें झाले असते!"

महाराजाचा शक्तिपात एकसारखा झपाट्यानें होत होता. आजची रात्र तरी निभेल कीं नाहीं याचाही भरवसा नसल्यानें चिटणीस व पेशवे महाराजापार्शींच बसून होते. इतराना मात्र महाराजानीं निरोप दिला. प्रसगानुरूप जी काय व्यवस्था करावयाची, ती पेशव्यानीं चिटणिसाच्या विचारें ठरवून आपले मुतालिक पुरधरे याना बोलावणें पाठविलें, व त्याना सर्व धोरण नीट

समजावून दिलें. 'अमात्य व प्रतिनिधि माहुलीहून येईपावेतों थाबा. अमात्यांनीं कृष्णोदक हातीं घेऊन राजपुत्राच्या खरेपणाची शपथ घेतल्याचें कानीं पडलें कीं माझ्या मनाचे समाधान होईल ' असें सागून महाराजानीं पेशवे व चिटणीस याना मुद्दाम जवळ बसवून घेतलें होतें. ते दोघेही, त्याना त्या शपथेविषयीं शका होती म्हणून मुळींच नव्हे, तर या शकेने महाराजाचा विचार आयुष्याच्या अखेरच्या क्षणीं डळमळून राणी त्याच्याकडून एखादें निराळें आगलावें आज्ञापत्र तर घेणार नाहीं ना, या भयानें तेथें थाबले. महाराज बोलण्याच्या स्थितींत नसल्यानें ते दोघेच एका बाजूला बसून पुढील वाटाघाटी करीत होते. तेवढ्यात पुतळेने सर्वांचा डोळा चुकवून येऊन वर्दी दिली, " महाराजाच्या अतकाळीं प्रतिनिधि व मुतालिक याच्या साह्यानें चागलाच बखेडा करण्याचे थोरल्या आईसाहेबाचे धोरण मुक्रर झालें आहे."

तेव्हा मात्र पेशवे चिटणिसाचा निरोप घेऊन उभ्या उभ्या स्वतः आपल्या वाड्यात जाऊन आले, व थोड्याच वेळात तिकडे त्याच्या आणि शिंदे-होळकराच्या सैन्याच्या नाकेबदीच्या हालचाली सुरू झाल्या. खुद्द रगमहाला-बाहेर पण थोडया अतरावर पेशव्याचे इतके चौकीपहारे बसले कीं त्यातून पारख पटल्याखेरीज मुगीलाही आत बाहेर रीघ मिळू नये.

सूर्यास्ताच्या समयीं प्रतिनिधि व अमात्य माघारे आले. अमात्यानीं शपथ घेतल्याचे व राजपुत्राच्या औरसपणाच्या बाबतींत आपलें काहीं म्हणणे नसल्याचें प्रतिनिधींनीं आपण होऊन महाराजाच्या कानावर घातले. तें ऐकून महाराजाना सतोष वाटला यापुढें तरी सर्वांनीं एकविचारे वर्तून राजवटीचें यथान्याय प्रतिपालन करावें असें पुन्हा पुन्हा सागून महाराजानीं त्यांना निरोप दिला.

चार घटका रात्रीच्या सुमाराला महाराजानीं शेटीला आज्ञा केली, "शेटी! आमचा अतकाळ समीप आला. तरी तूं भस्म, रुद्राक्ष, पांढरी घोंगडी व दर्भासन आण पाहू! आणि जाताना पेशव्याना एकट्यानाच आंत पाठवून दे."

स्वामिनिष्ठ शेटीच्या मनाची तेव्हा काय अवस्था झाली असेल, ती शद्बानीं काय वर्णन करावी! त्यानें साहित्य आणतां आणता पेशव्याना आंत बोलावून घेतले. तें साहित्य पाहून पेशव्याना लौकरच ओढवणाऱ्या अनर्थाची

ठाम कल्पना झाली शेटीने महाराजाच्याच आज्ञेवरून त्याच्या कपाळीं भस्म चर्चिलें व गळ्यात रुद्राक्षमाळा घातल्या. त्याला दर्भासनावर पाढरी घोंगडी आथरावयाला सागून महाराज पेशव्याना म्हणाले, "नाना! दोन आज्ञापत्रद्वारा आम्हीं तुला सर्वाधिकार दिले आहेतच, आता काहीं सागावयाचे असें बाकी राहिलेलें नाही आम्हीं देवब्राह्मणाना धर्मादाय अग्रहार वगैरे जे जे दिले आहे, जी खैरखैरात केली आहे, त्याप्रमाणेच जवळचे अथवा दूरचे भाऊबद, गोत्रज व इतर कुणबी मराठे लोक वगैरे नाना जातींस चाकरीबद्दल, सरजाम म्हणून, अथवा जहागिरी गावे व जमिनी कोणाला इनाम दिलीं असतील तीं आमच्या मागे यथावत् चालवावीं! कोणास त्याविषयीं अटकाव करू नये आमच्या हातच्या देणगीला बाध आणल्यास व आम्हीं मान दिलेल्या लोकाचा छळ वगैरे केल्यास तुम्हाकडे पेशवाईपद परमेश्वर कायम टिकविणार नाहीं हे ध्यानीं असू द्यावे अखेरचे हेंच सागणे. आणि आता सर्वजण स्वस्थानीं जा यापुढे कोणीही दर्शनार्थ येऊ नये. हरिचिंतन करीत आम्हाला देह ठेवू द्या." लगेच त्यानीं शेटीला आज्ञा केली, "शेटी! आम्हाला घोंगडीवर शयन करण्यापुरता हात दे पाहू!"

पेशवे महाराजाची आज्ञा शिरसावंद्य मानून जड अंत:करणाने तेथून गेले, ते चिटणिसाना महाराजाचा मनोदय कळवून त्याच्यासह राजवाड्याबाहेर निघून गेले शेटजींच्या हाताच्या आधाराने महाराजानीं आपला जीर्ण शीर्ण देह दर्भासनावर आथरलेल्या घोंगडीवर ठेवला महाराजानीं डोळे मिटून घेऊन 'श्रीरामनाम' व 'शिव हर' असा अकरा वेळा शद्बोच्चार केला, व—हरहर! ते इहलोक सोडून गेले!

* * *

पेशवे व चिटणीस गेल्याची संधी पाहून काहींतरी मतलबी लेख प्रतिनिधींनीं तयार करून दिलेला त्याला महाराजाची मान्यता मिळविण्यासाठीं राणी आत येते तों काय! .

राणी महाराजाचें देहावसान झालेलें पाहून हातपाय गळाल्याप्रमाणे मटकन खालीं बसली व आक्रोश करू लागली. त्या दु:खात महाराजाच्या निधनाबद्दलचें दु:ख किती होतें व अखेरचा डाव फसल्याबद्दलचें किती होते, तें एक ती जाणे, आणि दुसरा तिचा अतरसाक्षी परमेश्वर जाणे!

प्रकरण २५ व

# राणी सती गेली !

इकडे महाराजाचे कलेवर पडले होतें, व तिकडे राणी पेशव्याच्या कडेकोट बदोबस्ताबद्दल त्याना लाखोली वाहून आपल्यातर्फेच्या लोकाना बडाची चिथावणी देण्यात गुतली होती !

याचा अर्थ काय, ते सभोवारच्या लोकाना कळेनाच ! भलत्या वेळीं भलते उपद्व्याप राणी करीत आहे आपल्या व महाराजाच्या थोर नावाला काळिमा आणीत आहे, असेच सर्वांना वाटू लागले पुतळेपाशी तर राणी तशा प्रसगी बोलूनदेखील चुकली की हे सुतक सपण्याच्या आत पेशव्याच्या घरच्या मडळीला मी सुतकात बसवीन आणि माझ्या राज्यातून पेशवाईची पाळें मुळें खणून काढीन तर नावाची सकवार ! त्याखेरीज तिला रावजी जगदाळ्याचा शोध घेऊन त्यालाही भर मोती चौकात हत्तीच्या पायाशीं बाधून ठार करावयाच होतें, व साधल्यास माहुलीच्या त्या तरुण सन्याशालाही सुळीं द्यावयाचे होते

"त्या गुलामाचे असें वाटोळे झाल्याखेरीज माझेदेखील समाधान व्हावयाचें नाहीं" राणी एकान्तात पुतळेपाशीं आपले हृदय उघडे करून सागू लागली तेव्हा पुतळेने तिच्या सुराशीं आपला सूर भिडविला. ती आणखी असेही म्हणाली, "मीं असे ऐकले आहे कीं रावजीची आई त्याच्या शोधार्थ इथे साताऱ्यात आली आहे. तिच्याकडे रावजीचा शोध खास लागेल. त्याला पळून जाऊ देता उपयोगी नाहीं. तो तिथे भेटला नाहीं तर ती म्हातारी आणि तो दोघे माहुलीला त्या बैराग्याच्या झोपडींत खास भेटतील."

"मग तू असे कर ना, बारकाव्याने त्याचा तपास करून ये. तीं नक्की अमक्या ठिकाणी आहेत असे कळताच त्याच्या मुसक्या आवळून त्यांना पकडून आणण्याची व्यवस्था इकडून होईल." राणी म्हणाली.

"बरें आहे." असे म्हणून पुतळा निघाली.

"आणि हें पाहा, जाशील ती तशीच प्रथम प्रतिनिधि व यमाजी याना भेटून निरोप साग कीं, राजवाड्यावर पेशव्याचे चौकीपहारे बसले असले तरी धीर खचू देऊ नका. काय सृष्टि उलथीपालथी करायची असेल ती खुशाल करा. यावेळीं पेशव्याना राजवटींतून खणून काढण्यासाठीं तुम्ही जे जें काहीं कराल तें तें मजूर."

पुतळा नियोजित कामगिरीवर निघून गेल्यावर इकडे राणी ती काय कामगिरी फत्ते करून येते याची चातकीप्रमाणें वाट पाहत बसली होती. पण मध्यरात्रीचा समय झाला, मध्यरात्र उलटली, पहाट झाली, उजाडू लागलें तरी पुतळेचा पत्ता नाहीं!

उजाडताच पहिली अशुभवार्ता राणीला ऐकावयाला मिळाली ही कीं प्रतिनिधि व मुतालिक पितापुत्र ह्या दोघानाही पेशव्यानीं कैद करून त्याच्या हातापायात जड लोखडी बेड्या ठोकून रातोरात निरानिराळ्या किल्ल्यावर पाठविलें देखील! आणि पेशव्याचे हत्यारबद घोडेस्वार शहरातील मोठ-मोठ्या रस्त्यावरून लोकाना दहशत बसविण्यासाठीं फेऱ्या घालू लागले! पेशव्यानीं ताराबाई व प्रतिनिधि वगैरे मडळीचे डावपेंच ओळखून साताऱ्या-च्या आसपास निरानिराळ्या माळावर व खिंडींत मिळून पस्तीस हजार ताज्या दमाचें सैन्य खडें ठेवलें होतें. प्रतिनिधि व यमाजी हे राणीचे दोन मोहरे कैद होऊन बदीवासात रवाना झाल्यावर त्याच्या सैन्याचें धैर्य गळालें. नेत्याच्या अभावीं तें सैन्य हालचाल ती काय करणार? पेशव्याच्या सैन्यानें त्या सैन्याला ठायीं ठायीं हुडकून काढून त्याची पुरी दाणादाण उडवून सोडली. अजिमतारा गडावरही पेशव्याच्या शिबदीचा मजबूत पहारा बसून गड पेशव्याच्या पूर्ण ताब्यात आला.

उजाडल्यावर महाराजाच्या शवाच्या दर्शनासाठीं राजनिष्ठ नागरिकाची यात्रा रगमहालाकडे लोटू लागली. तेव्हा पेशव्यानीं आपल्या वाड्यात प्रति-निधींखेरीज बाकीच्या सर्व प्रधानमडळाची व शिंदेहोळकरादि महत्त्वाच्या सरदाराची सभा भरविली, व त्या सभेसमोर महाराजानीं त्याना दिलेलीं दोन आज्ञापत्रें वाचून दाखविलीं. त्या दोन आज्ञापत्राच्या आधारें पेशव्यानीं भावी छत्रपति राजाराम ऊर्फ रामराजा याच्या व त्याच्या वशजाच्या वतीनें

वशपरंपरेच्या मुखत्यारीनें राज्य करण्याचा आपला हक्क सर्वांना पटवून दिला. महाराजाच्या पश्चात् राजाराम हाच गादीचा खरा वारस आहे हेंही सर्वांना पटलें, व सर्वानुमतें नव्या छत्रपतींना पानगावाहून त्याच्या थोर मानाला शोभेशा थाटामाटानें आणण्यासाठीं ताबडतोब सैन्य व लवाजमा रवाना झाला.

लगेच यापुढें राणीची काय व्यवस्था करावयाची, हा प्रश्न विचारासाठीं पेशव्यानीं पुढें आणला. तेव्हा जो तो म्हणू लागला, "का बरें ? आम्ही तर राणीच्या विश्वासू दासीकडून असें ऐकलें आहे कीं महाराजाच्या शवाबरोबर सती जाण्याचा राणीचा पक्का निर्धार झाला आहे."

"त्या सती गेल्या तर उत्तमच. पतिव्रता म्हणून त्याच्या नावाचा डका त्रिभुवनात गाजेल. पण मला हें तितकेंसें खरें वाटत नाहीं. तथापि आपण बाबाजी शिर्क्यांना बोलावून काय ते विचारू. ते राणीसाहेबाचे बधु आहेत, ते या बाबतींत राणीसाहेबाचें अतरग उघड करून सागू शकतील." लगेच बाबाजी शिर्क्यांना बोलावून आणण्यासाठीं स्वार रवाना करून पेशवे पुढें म्हणाले, "राणीसाहेब जर सती गेल्या नाहींत, तर त्या राजाराम छत्रपतींना तोतया ठरविण्याची शिकस्त करतील, व नवा कोणीतरी दत्तक घेतील. मग कोल्हापूरकराचाही हात आत शिरकून सबध राज्यभर गोंधळ आणि बंडबंडाळी माजेल. बरें; त्याना कैदेंत ठेवावें तर त्यामुळें अतस्थ प्रकार माहीत नसणाऱ्या लोकाच्या भावना राणी कैदेंत पडली असें पाहून दुखावल्या जातील. मग दमाजी गायकवाडासारख्या नेहमींच राजवटीशीं फटकून वागणाऱ्या बलाढ्य मराठे सरदारांना बडावा माजविण्याला आयती सबब सापडेल. त्यापेक्षा परमेश्वर राणीसाहेबाना सती जाण्याची सुबुद्धि देईल तर सोन्याहून पिवळें होईल.

याप्रमाणें वाटाघाटी चालल्या आहेत इतक्यात बाबाजी शिर्के तेथें आले. त्यांना पेशव्यानीं विचारलें, "राणीसाहेब सती जाणार असें ऐकतों. तें खरें काय ?"

बाबाजींना वास्तविक यातील काहींच माहीत नव्हतें. ते नुक्तेच राणीच्या समाचारासाठीं राजवाड्यात जाणार होते. तेवढ्यात ते पेशव्याचा स्वार गेल्यामुळें इकडे आले. पेशव्याच्या प्रश्नाला 'माहीत नाहीं' असा जबाब देणें त्यांच्या जिवावर आलें. शिवाय राणीनेंदेखील सती न जाणें ही शिक्षा,

महाराजाना व शिर्के कुलालाही मोठी नामुष्कीची बाब! महाराजाची धाकटी सखू नावाची रक्षाही सती जाणार आहे, असें त्याना सकाळींच कळलें होतें रक्षा सती जाते आणि राणी निपुत्रिक असूनही मागे राहते हा केवढा मोठा कलक! बाबाजी शिर्के स्वाभिमान व कुलाभिमान स्मरून एकदम बोलून गेले, "ती सती जाईलच. ती शिर्क्यांची माहेरवाशीण आहे. ती सती न जाऊन आपले उभय कुळींचे बेचाळीस पूर्वज नरकात कधींच लोटणार नाहीं. ती सती जाईल, व गेलीच पाहिजे. आपण सर्वजण त्या तयारीला लागा. मी जाऊन तिची समजूत घालतों."

बाबाजी जे पेशव्याच्या वाड्यातून निघाले ते राजवाड्यात येऊन पोहोंचण्यापूर्वीं वाटेंतच ठिकठिकाणीं राणीसाहेब सती जाणार म्हणून त्याच्या नावाचा जयजयकार सुरू असलेला राणीच्या कानापावेतों जाऊन पोहोंचला होता. मोठमोठ्या सरदाराच्या बायका राणीच्या शेवटच्या पुण्यदर्शनार्थ राजवाड्याकडे लोटू लागल्या होत्या. ती वार्ता राणीच्या कानीं जाताच मात्र तिची कबर खचली. ती मनात म्हणाली, "हा कोणता नवीन कर्मभोग उभा राहिला! मी सती जाणार असें ह्या लोकाना सागितलें तरी कोणीं? मी सती गेल्यावर राज्य कोण साभाळील? दत्तक कोण घेईल? पेशव्याचा निःपात कोण करील? नाहीं—नाहीं. मी सती जाणार नाहीं. मी जिवत राहणार, व ताराबाई सासूबाईनीं राजवट गाजविली नाहीं इतकी गाजवणार. त्या अयशस्वी झाल्या, मी यशस्वी होणार. मी जिवत रहाणार, मला पसंत असणारा दत्तक घेणार आणि मुखत्यारीनें राज्य करणार."

इतक्यात पुतळा आली. ती जी राणीच्या महालात प्रविष्ट झाली, ती अगदीं दुःखी कष्टी! राणी एक दुःखी तर ती सात दुःखी!

"पुतळे! तुला इतका उशीर का ग लागला?" राणीने विचारलें.

"काय सागू बाईसाहेब! वाटेंत पावलोपावलीं अडवणूक!" असें म्हणून पुतळा पेशव्याच्या ठिकठिकाणच्या चौकीपहाऱ्याचा इतिहास त्याला तिखट मीठ लावून सागून मोकळी झाली.

"पण काम झालें कीं नाही?" राणीनें विचारलें.

पुतळा शरमल्यासारखें करून खालीं मान घालून उत्तरली, "प्रतिनिधि आणि यमाजीराव पूर्वींच कैद्र होऊन तुरुगात रवानाही झाले होते."

"काय; ते दोघे कैद झाले?"

"होय आईसाहेब!"

"मग काय, सर्वच आटोपले. माझे डावे उजवे हात तुटले, आता जगण्यात प्रतिष्ठा नाही. सगळे वाटोळें झालें, योजिलेले सर्व बेत वाया गेले. माझें दैव दुबळें व पेशव्याच्या दैवाची सद्दी जोरावर आहे हाच याचा अर्थ. असो. ईश्वराची इच्छा तशी आहे. त्याला इलाज नाहीं."

राणीने नतर रावजी व तो बैरागी याची विचारपूस केलीच नाही.

इतक्यात बाबाजी शिंदे तेथे येऊन पोहोंचले. त्यानीं येताक्षणींच विचारलें, "सरकार! महाराज तर गेलेच, आता पुढचा काय विचार आहे?" महाराजाच्या पश्चात् कलहाग्नि चेतवीत राहून उभय कुळे नर्कात लोटावयाची आहेत, कीं सती जाऊन आपल्या पतिव्रता धर्माचा त्रिलोकीं झेंडा लावावयाचा आहे?"

राणी त्या पहिल्याच शब्दाच्या माऱ्यानें बरीच नमल्यासारखी झाली. तिला विचार करावयाला वेळ कुठें होता? आणि सर्वत्र 'राणी सती जाणार' असा बोभाटा झाल्यावर नाहीं म्हणण्याला तिला तरी तोंड कुठें होतें? ती उद्गारली, "महाराजाच्या चितेवर मलाही जाळून टाकून आपला मार्ग पूर्ण निष्कटक करून घेण्यासाठीं पेशव्यानी माझ्या इच्छेविरुद्ध ही सती जाण्याची बातमी सर्वत्र फैलावून दिली असली पाहिजे. करा म्हणावें त्याना, काय पाहिजे तें करा. आज दैव तुम्हाला अनुकूल आहे; तुम्ही मुठींत माती धरली तरी तिचें आज सोनें होऊ शकतें आहे."

बाबाजी अंमळ रागानें म्हणाले, "तू सती न गेल्यानें पेशव्याच्या बागड्या थोड्याच पिचणार आहेत! त्याच्या कुळाची बेअब्रू थोडीच होणार आहे? ते कशाला तुझ्या ह्या भानगडींत पडतील?"

"बाबा! तुम्हाला तें माहीत नाहीं." जवळच पुतळा उभी होती तिच्याकडे वळून पाहत राणी बाबाजीला म्हणाली.

"मला सर्व काहीं माहीत आहे. पण मला साग तूं, सर्वतोपरी अपयश पदरीं पडल्यावर जगून तू काय साधणार?..."

बाबाजींच्या तोंडचे वाक्य पुरें होण्यापूर्वी पुतळा मध्येंच म्हणाली, "मला तरी वाटतें कीं श्रीमंत पेशवे आईसाहेबाना कैदेंत लोटून त्याची शस्य तितकी

अप्रतिष्ठा करायला कचरणार नाहींत. आणि असें करण्यात त्याना सर्व थोर थोर लोकाचा पूर्ण पाठिंबाही मिळेल. प्रतिनिधि व यमाजीराव याना नाहीं का त्यानीं डोळ्याचें पातें लवतें न लवतें तों कैदेत डाम्बलें? तेव्हा त्याना असें काय करता असें विचारणारा कोणी पुढें आला का? गमाजीराव तरी जीव मुठींत घेऊन पळाले म्हणून बचावले."

"ऐक! सकवार, तुझ्या साम्राज्याची ही दशा ऐक! प्रतिस्पर्ध्यांच्या दावणीला बाधलेली गरीब शेळी होऊन तुला ह्या जगात राहावयाचें आहे काय?..."

मध्येंच पुतळा पुन्हा म्हणाली, "मी असेंही ऐकलें आहे की धाकट्या सखूबाईसाहेब देखील सती जाण्याची तयारी करीत आहेत."

"ऐक! सकवार, तुझी सवत ती महाराजाची यःकश्चित् रक्षाही सती जाणार, आणि तू? तू?"

राणी जितकी लोभी, जितकी दुराग्रही, व तितकीच मानीही होती. तिने क्षणभर आपल्याशीं काय विचार करावयाचा तो केला आणि सागितलें, "मी सती जाणार. पहिली सती मी जाणार. महाराजाच्या मागें अशा अपमानास्पद स्थितींत जगून मला काय करायचें आहे?—जा पुतळे, माझी सती जाण्याची तयारी कर. मला माझ्या पूर्ण सौभाग्यालकारानिशीं महाराजाबरोबर जायचें आहे. इहलोकीं मी महाराजाची सहचारिणी होतें, तशीच परलोकींही असेन. ...जा बाबा! पेशव्याना सागा, सर्व कारभाऱ्याना सागा, कीं राणी सती जाणार आहे, हें जाणून महाराजाच्या स्मशानयात्रेचा कार्यक्रम ठरवा."

बाबाजी शिर्के राणीला तिच्या ह्या धैर्याबद्दल धन्यवाद देऊन पुढील सारी व्यवस्था पेशव्याच्या विचारें करण्यासाठीं त्याच्या वाड्याकडे गेले. राणी सती जाणार ही वार्ता वाऱ्याप्रमाणें हा हा म्हणता सर्वत्र पसरली. राणीनें सर्व ऐहिक बंधनें तोडून आत्मयज्ञ करण्याचा निश्चय केल्यावर त्या यज्ञाच्या पहिल्या आचेसरसे तिच्या मनातील सारे द्वेषभाव जळून खाक झाले, व वाऱ्यावर कापसाच्या म्हाताऱ्या उडाव्या तशा तिच्या महत्त्वाकाक्षाही कुठच्या कुठें नाहींशा झाल्या. आता पेशवे वैरी उरले नाहींत, प्रतिनिधि साम्रकारी उरले नाहींत, राज्यकर्तृत्वाचा लोभ राहिला नाहीं, कीं काहीं नाहीं. जिकडे

तिकडे आनदी आनद ! पण एका जीवाला मात्र त्यामुळें आनदानें कोठें राहू व कोठें जाऊ असें झालें होतें. पुतळा राणीच्या सहगमनाची तयारी करीत असताना मनात म्हणत होती, " चाडाळणी ! माझ्या आयुष्याची होळी तू पेटविली होतीस, तशी तुझ्या आयुष्याची होळी मीं पेटविली. तुझीं कृष्णकारस्थानें जगाला कळतील, तरी पण तुला महाराजाच्या चितेंत जिवत जाळण्याचें माझें कारस्थान सृष्टीच्या अतापावेतों कोणालाही कळायचें नाहीं. एका जीवावर केवळ वैयक्तिक सूड याप्रमाणें उगविणें हें चागलें नाहीं, हें पाप आहे, असें मला या क्षणाल्राही वाटतें परतु तुला सती घालवून मी राजवशाचें रक्षण सुलभ करीत आहें. ह्यामुळें माझ्या पदरीं पडणाऱ्या राजनिष्ठेच्या पुण्याईकडे पाहून परमेश्वर मला त्या पापाची क्षमा करील अशी माझी खात्री आहे. माझ्या पतींना मी त्याच्या अखेरच्या क्षणीं वचन दिलें होतें, त्याचें योग्य परिपालन माझ्याकडून झालेलें पाहून त्याना स्वर्गांत सतोष होईल."

पुतळेचा हा आत्मविश्वास अन्यथा नव्हता. महाराजाच्या निधनानतर राणीला त्याच्या चितेवर जिवत जाळावयाचेंच असें योजून तिनें राणी सती जाणार अशी सर्वत्र खोटीच ओरड केली, आणि त्या ओरडीमुळेंच अखेर राणीला पेंचात पडल्यासारखे होऊन सती जावें लागलें. हें पुढें कधीं कोणाला कळलें नाहीं, व कळण्याचाही सभव नाहीं. इमारतीच्या पायाचे दगड कुणाला दिसत नसतात, इमारत तेवढी दिसते. राणीला वाटलें, पेशव्यानीं कृष्णकारस्थान रचून आपणाला जिवत जाळलें. पेशव्याना वाटलें असेल, बधूच्या आग्रहामुळें राणी सती गेली. बाबाजी शिर्क्यांना वाटलें असेल, सकवारला शेवटीं तरी आपली व आपल्या उभय कुळाची अब्रू राखावीशी वाटली, ती सती गेल्यानें तिच्याबरोबरच तिचीं सर्व पापें जळून गेलीं व तिच्यासह आपले बेचाळीस पूर्वज उद्धरून गेले. रयतेला वाटलें असेल, राणी खरी साध्वी पतिव्रता. ती महाराजाच्या आयुष्याच्या अखेरच्या क्षणापावेतों स्पर्धेनें मानवैभवाच्या लालसेला बळी पडून झगड झगड झगडली; पण वेळ आली, तेव्हा आपल्या सतीधर्माला स्मरली. धन्य राणी !

त्या दिवशीं सायकाळीं महाराजाची स्मशानयात्रा निघावयाचें सर्वांनुमतें ठरलें. त्या दिवशीं राणीनें आपलीं वस्त्राभरणें लेवून आनंदानें एका

शृंगारलेल्या हत्तीवर आरोहण केलें. ही सतीची मिरवणूक अजिमतारा किल्ल्याच्या महादरवाजापासून वाजत गाजत मोठ्या थाटाने नगरातून निघाली. मार्गानें नगरसुवासिनी जागोजागीं राणीला देवता समजून पचारत्या ओंवाळून हळदकुंकु वाहून तिचा आशिर्वाद मिळवीत होत्या. राणीवर एकसारखी पुष्पवृष्टि होत होती. ती इतकी कीं, सतीचा मार्ग पुष्पानीं आथरलेलाच आहे कीं काय असें पाहणाराला वाटावें. राणी याप्रमाणे मिरवत मिरवत माहुलीला संगमक्षेत्रावर जाऊन पोंहोंचली, तेव्हा तिला दुःखवटा देण्यासाठीं प्रचंड लोकसमूह उघड्या मस्तकानीं तिची वाट पाहत तेथें उभा होता. त्याना राणीचें दर्शन होताच त्या लोकसमूहातून 'हर हर महादेव' अशी गर्जना सुरू झाली, ती जणू काय ब्रह्माण्ड भेदून वर देवलोकीं जाऊन देवांच्या कर्णरंध्रात घुमली असेल. राणी सतीचें महा दुर्घट व्रत पाळून शिवस्वरूप झाली, अशा पूज्यभावनेनें सर्व लोक राणीचा जयजयकार करीत होते. अशा वेळीं देखील कोणीतरी राणीचा कैवारी तिला सती जाण्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करील तर त्याचा प्रतिकार करण्यासाठीं ज्यानीं गुजराथ—नर्मदेपावेतों आपला विजयध्वज फडकाविला आहे व ज्याच्या मशालींनीं मोंगल साम्राज्याच्या दिल्ली राजधानीलाही दग्धवदन केलें आहे, अशा रथी महारथी मराठा सरदाराच्या सैन्याचीं पथकें जागोजागीं शस्त्रास्त्रें परजून उभीं होतीं. परंतु राणीच्या मनावर त्या बंदोबस्ताचा काहींच परिणाम झाला नाहीं, तिच्या अमर्याद स्वाभिमानाला पदरीं पडलेल्या ताज्या पराजयाचा अथवा सती जाण्यामुळें ओढवणाऱ्या मरणकाळच्या असह्य शारीरिक वेदनांचा लवमात्र धक्का बसला नाहीं. जणू काय भूत आणि भविष्य याची लवमात्र क्षिति आपणाला नाहीं अशा निर्भयतेनें ती क्षणात सभोंवारच्या शुभ्रवस्त्राधारी लोकसमूहाकडे, क्षणात अजिमताऱ्याच्या तटाकडे तर क्षणांत समोर दिसणाऱ्या जरंड्याच्या टेकडीकडे दृष्टिक्षेप करीत होती. जणूं काय जरंडेश्वर त्या धीरवती राणीला सतीचें महाव्रत पाळण्याला धीर देत होता, व खऱ्या पतिव्रतेचें हेंच पवित्र कर्तव्य होय असें तिला वत्सलतेनें समजावून सांगत होता, व तें ती ऐकत होती.

याप्रमाणें सर्वांना दर्शन दिल्यावर राणी हत्तीवरून खालीं उतरली. तिच्या हातांत पुरोहितानें दर्भ व तीळ दिले. मंत्रघोष तेथें जमलेल्या ब्रह्मवृंदानीं

सुरू केला. पुरोहितानें सांगितल्याप्रमाणें तिनें दिशांदिशांना अभिवादनपूर्वक तर्पण केले नतर तिनें नारायणाला नमस्कार करून औपचारिक रीत्या आपलें मनोगत सर्वांना विदित केलें, "मी माझ्या परमपूज्य पतींचा स्वर्गातदेखील चिरसहवास मला घडावा, व माझ्या आणि माझ्या पतींच्या सर्व पूर्वजांचें पापक्षालन होऊन त्याना चिरमुक्ति मिळावी म्हणून आज माझ्या पतींबरोबर सती जात आहे." ह्या आपल्या सकल्पाला साक्षी म्हणून तिनें दशदिग्पाल, सूर्य चद्र, पचमहाभूतें, स्वतःचा अतरसाक्षी परमेश्वर, मृत्युराज यमधर्म, दिवा, रात्र व सधिकाल ह्या सर्वांना पाचारण केले. महाराजाची चिता चंदनकाष्टांनीं रचिलेली होती, व वर गवत, कापूर वगैरे ज्वालाग्राही व सुगधी पदार्थ पसरण्यात आले होते. त्या चितेंत राणी हास्यवदनानें प्रविष्ट होऊन बसली, व लगेच महाराजाचें कलेवर तिच्या बाजूला ठेवण्यात आलें. आपण सर्व ऐहिक मोहपाश तोडले आहेत व क्रोध दभ-मत्सरादि षड्रिपूंना जिंकून सर्व मतभेद, सर्व भाडणतटे अजिबात विसरून गेलों आहों, अशी सर्वांनी शेवटचा खात्री पटवून देण्यासाठीं कीं काय, तिनें पेशव्याना जवळ हाक मारली.

राणीप्रमाणेंच पेशव्याचें मनही त्या वेळेपुरतें तरी राणीविषयीं अगदीं निर्मत्सर झालें होतें. तिच्या अपूर्व आत्मयज्ञानें त्याचे डोळे दिपून गेले होते, व तिच्या असामान्यतेची पुरेपूर साक्ष त्याच्या मनाला पटली होती. त्या रोमहर्षण प्रसगीं डोळयात उभीं राहिलेलीं आसवें उपरण्याच्या सोग्यानें पुसून ते हात जोडून पुढे गेले, तेव्हा त्याच्या मुखावाटे आज्ञाधारकपणाचा एकच शब्द निघाला, "आईसाहेब!"

राणीनें आपल्या हातानीं आपलीं मणिमुक्ताजडित कर्णफुलें काढून पेशव्याना प्रसादादाखल देऊन अखेरचा आशिर्वादात्मक सदेश दिला, "तुम्ही न्यायानें राज्यकारभार चालवून गोब्राह्मण प्रतिपालन करा, व प्रजेला शांति–सौख्य–समृद्ध करा. तुम्हीं सर्वत्र विजयी व्हाल असा माझा तुम्हाला आशिर्वाद आहे."

लगेच राणीनें पुतळेला हाक मारून आपल्या रत्नजडित बागड्या काढून तिला प्रसादादाखल दिल्या व 'सुखी हो' असा आशिर्वाद दिला. तेव्हां पुतळेचें राणीच्या बाबतींत आजवर पाषाणाचें बनलेलें हृदयही द्रवलें, व मनाला हुरहुर लागली, "मीं ह्या थोर साध्वीच्या आत्महत्येला कारण

झाल्यें, हें घोर पातक तर माझ्या हातून घडलें नाहीं ना ? " तिनें त्या क्षणीं राणीला हात जोडून झाल्या गेल्या अपराधाची क्षमा मागितली, व राणीनें-ही उदार अंतःकरणानें तिच्या समजुतीसाठीं तिला क्षमा केली, तेव्हां तिच्या मनाला थोडी शांति मिळाली.

शेवटीं राणीनें दोन हातांत दोन प्रदीप्त कर्पूरदीप घेतले, व सभोंवार जमलेल्या आप्तांना प्रसन्नतापूर्वक सांगितलें, "चितेला अग्नि द्या."

चिता प्रदीप्त झाली. ज्वालांनीं राणीचा देह व महाराजांचें शव हीं पूर्ण वेष्टिलीं जाऊन दिसेनाशीं झालीं. राणीच्या मुखावाटे आरोळी अगर किंचाळी निघाली नाहीं. सती जाणाऱ्या स्त्रीला चितेंतून बाहेर पडतां येऊं नये, तें अत्यंत अशुभ आहे, यास्तव तशी वेळ आल्यास मोठमोठीं काष्ठें चितेंत लोटण्यासाठीं लोक चितेसभोंवार उभे होते. पण तशी वेळच आली नाहीं. इतकें राणीचें विलक्षण मनोधैर्य पाहून तिच्या वैऱ्यानादेखील तिच्या पूर्वा-कृत्याचा विसर पडला व सर्वत्र तिच्याविषयीं धन्यवाद निघाले.

चितेबरोबर राणी व धाकटी सखू ह्या दोघी जिवंत जळून भस्मसात झाल्या. पण त्यांची सतीत्वाची कीर्ति मात्र अमर होऊन राहिली.

# उपसंहार

रावजी जगदाळ्याची आई महाराजाच्या निधनापूर्वी दोन दिवस सातान्यात पुतळेच्या घरीं येऊन राहिली होती तिनें तेथे येताक्षणींच पुतळेला बरोबर घेऊन माहुलीला जाऊन शोध केला. पण तेथें पाहतात तों काय, तेथें तो बैरागीही नाहीं व रावजीही नाहीं! तरीही पुतळेनें बैराग्याच्या वाणीवर विश्वासून म्हातारीला आश्वासन दिलें होतें कीं रावजी आज ना उद्या खास भेटेल.

त्याप्रमाणें रावजी राजवाड्यात प्रगट होऊन गोपनस्फोट करून गेला. पण तो कोठे गेला याचा पुतळेला अगर कोणालाच पत्ता लागला नाहीं. तो घरीं जाऊन म्हातारीला तरी भेटला असेल अशी पुतळेला आशा होती, पण घरीं जाऊन चौकशी करता तिची तीही आशा फोल ठरली.

पुढें दोन दिवस पुतळा राणीच्या सहगमनाच्या गडबडींत गढून गेली होती. परतु तिचें मन मात्र मधून मधून तर्कवितर्कांचे हेलकावे खात होतें, "रावजी मला नाहीं तर आपल्या आईला तरी भेटायला आलाच पाहिजे... तो भीतीमुळें दोन दिवस तोंड लपवील, चार दिवस तोंड लपवील; पण आज ना उद्यां तो अवश्य येईल.. कदाचित् तो कोथरूडला जाईल; पण तेथें आई नाहीं असें पाहून तरी माघारा येईल कीं नाहीं?...तो आल्यावर मी त्याच्याशीं कशीं बरें वागू? तो मला धर्मपत्नी म्हणून पदरीं घेईल का? त्याच्या आईला तें आवडेल का?..."

रावजीच्या आईलादेखील सर्व हकिकत ऐकून पुतळेसारखेंच वाटत होतें कीं रावजी आपल्या भेटीला कोथरूडला गेला असेल. तेथून तो इतक्यांत माघारा येईल." आपल्या रावजीसारखा मातृभक्त पुत्र जगात दुसरीकडे सांपडणार नाहीं असें म्हातारी अभिमानानें म्हणे. तें तितकेंसें खरें नसलें, तरी रावजी मातृभक्त होता हें कांहीं खोटें नाहीं.

राणी सती गेली त्या रात्रौ पुतळा माघारी आली व राणीकडून मिळालेला प्रसाद दोन्ही म्हाताऱ्यांना दाखवू लागली, तेव्हा त्या दोघींत रावजी व पुतळा हीं म्होतुरानें पतिपत्नी व्हावीं व त्यांचा सुखाचा संसार थाटला जावा असें संभाषण चाललें होतें. तोंच पुतळेनें त्या बांगड्या दाखवितांच रावजीची आई हर्षून म्हणाली, "मुली! आईसाहेबांनीं तुला हें चुडेदानच केलें आहे."

पुतळा तें ऐकून गोंधळून गेली. इतक्यांत तिच्या परिचयाचा तो तरुण बैरागी अचानक तेथें दत्त म्हणून उभा!

"माझें भविष्य खरें झालें ना?" बैराग्यानें पुतळेला विचारलें.

पुतळा हात जोडून उत्तरली, "अर्धें खरें झालें, व अर्धें खरें व्हायचें आहे. राजवटीवरील संकट टळलें. पण मी कुठें सुखी झाल्यें?"

"काय झालें म्हणजे तू सुखी होशील?" बैराग्यानें विचारलें.

"आमचा रावजी आम्हांला भेटला म्हणजे आम्ही आणि तीही सुखी होईल." रावजीची आई उत्तरली.

बैराग्यानें आपली बनावट दाढी काढून टाकली, कफनी अंगांतून काढली व म्हातारीच्या पायांवर मस्तक ठेवून म्हटलें, "आई! मीच तुझा रावजी!"

आणि खरेंच, तोच तिचा रावजी होता. म्हातारीनें त्याला ओळखलें, व पोटाशीं घट्ट आवळून धरलें. पुतळा मात्र तोच रावजी असें कळतांच लाजून दूर उभी राहिली.

"आई! ह्या मुलाला तू ओळखलेंस?" रावजीनें मुकुंदाकडे बोट दाखवून म्हातारीला विचारलें. "त्याच्या हनुवटीवर बारीक चामखीळ आहे तो पहा. आपल्या बाळाच्या हनुवटीवरही तसाच नव्हता का?"

म्हातारीनें मुकुंदाकडे पाहून म्हटलें, "खरेंच! हा आपला बाळच का?"

तेव्हां कोठें पुतळा व तिची आजी यांच्या डोक्यांत प्रकाश पडला कीं आपण अनाथाचा मुलगा म्हणून पाळला तो रावजीचा मुलगा होता. म्हातारीच्या तोंडून कोथरूड मुक्कामीं पुतळेनें रावजीच्या पहिल्या लग्नाचे धिंडवडे झालेले ऐकलेच होते. त्याचा पडताळा तिला आतां पडला.

"ही त्या मुलाची आई, आणि तू त्याचा बाप!" म्हातारी हसत हसत म्हणाली. पुतळा व रावजी दोघेंही अधिकच लाजलीं.

मुकुंदानें आपल्या बाळबुद्धीला अनुसरून पुतळेच्या गळयाला मिठी मारून तिला विचारलें, "आई, ही नवी आजी आता काय म्हणाली ग? हे माझे बाबा का ग?"

पुतळेला पेंच पडला. आता होय किंवा नाहीं तरी कोणत्या तोंडानें म्हणावें? ती गप्प राहिली. राई तिच्या सभोंवार नाचू लागली. तिलाही तें रहस्य उमगलें असेल!

योगायोगानें एकत्र झालेल्या त्या जीवाना आनदीआनंदाचा उपभोग घेण्यासाठीं एथेंच गोड एकान्तात सोडून आपण दूर निघून जाणें बरें.

महाराजाचें देहावसान झालें, त्याच दिवशीं पेशव्यानीं राजपुत्राला आणण्यासाठीं सैन्य व राजपुरुषाला शोभण्याजोगे वस्त्रालकार पाठविले होते त्यापूर्वींच म्हणजे राजपुत्राला रक्षणार्थ पानगावीं पाठविताना ताराबाईनें बहुमोल राजचिन्हें योग्य वेळीं कामीं यावीं म्हणून गुप्तपणें पाठविलीं होतीं. लिंबाजी अनत व इद्रोजी कदम या दोन विश्वासू सरदारावर राजपुत्राला इतमामानें सुखरूपपणें साताऱ्याला आणण्याची जबाबदारी होती. आयत्या वेळीं गैरसमजाला जागा राहू नये म्हणून ताराबाईने इद्रोजी कदमापाशीं आपली मुद्रिकाही देऊन ठेवली होती. त्या दोघा सरदाराना, जिनें आजवर राजपुत्राचें जिवापलीकडे पालनपोषण केलें होतें, ती दर्याबाई निंबाळकर मार्गातच पाच हजार घोडेस्वारानिशीं सामोरी आली.

"आपण ताराबाई आईसाहेबाच्या आज्ञेवरून आला याला पुरावा काय?" दर्याबाईनें दूरदर्शीपणाचा प्रश्न केला.

इद्रोजी कदमानें ताराबाईची मुद्रिका काढून दर्याबाईपाशीं दिली. तेव्हा दर्याबाईची खात्री पटली. ती त्या दोघाही सरदाराना राजपुत्र राहत होता त्या घरापाशीं घेऊन गेली. त्या सरदारानीं पेशव्याच्या वतीनें नजरनजराणे राजपुत्राला अर्पण केले, व ज्या तुळजापूरच्या गोंधळयानीं इतके दिवस राज-पुत्राला मोठया चातुर्यानें लपवून ठेवून त्याचें रक्षण केलें होतें, त्याना पाच हजार रुपये इनाम वाटले. नतर राजपुत्रासह ते सरदार राजधानीला यावयाला निघाले.

साताऱ्यानून निघाल्यापासून बरोबर बाराव्या दिवशीं राजपुत्रासह सर्व मंडळी कृष्णाकाठीं वडूथ मुक्कामीं येऊन पोहोंचली. तेथें ताराबाई राजपुत्राला

सामोरी गेली, व तिनें त्याचा जाहीर सत्कार केला. पुरोहितांच्या मतें भावी छत्रपतींना राजधानींत प्रवेश करण्याला अनुकूल असा शुभ दिवस सांपडे-पावेतों त्या मडळीला तेथेंच मुक्काम करावा लागला, व आणखी नऊ दिवसांनीं नगरप्रवेश करावयाचें ठरलें तोंवर भावी छत्रपति राजाराम कृष्णा काठीं वडूथ एथेंच निरनिराळ्या सरदाराच्या भेटी घेत व नजराणे स्वीकारीत थांबला होता पेशव्याच्या वतीनें त्याचे चुलतभाऊ सदाशिवराव भाऊ हे तेथेंच नजराणा घेऊन भेटीला गेले. ठरलेल्या शुभ दिवशीं राजपुत्र राजाराम साताऱ्याला जावयाला निघाला. भावी छत्रपतींच्या आगमनाप्रीत्यर्थ राजधानी रगीबेरगी पताका, तोरणें व पुष्पमाला यानीं चागलीच शृगारली होती, व नगर मार्गही सडासमार्जन करून व रागोळया घालून अत्यत सुशोभित केले होते. राजपथाच्या दुतर्फा असलेल्या घराच्या गच्चींतून व माड्याच्या खिडक्यातून तरुण सुवासिनी राजपुत्रावर मगलाक्षता उधळून त्याला अभिष्ट चिंतीत होत्या. नगरात ह्या आनदोत्सवाप्रीत्यर्थ सर्वत्र नृत्यगायनादि आनद विहार चालू होते. नगराच्या वेशीपाशीं भावी छत्रपति येऊन पोहोंचताच श्रीमत पेशवे यानीं त्याला सामोरे जाऊन त्याला खास स्वारीसाठीं बहुमोल वस्त्रालंकारानीं शृगारलेल्या हत्तीवर सोन्याच्या अबारींत नेऊन बसविले, व स्वतः त्याच्या मागें अबारींत बसून त्याच्यावर चौरी ढाळीत त्याना राजधानी-तून मिरवीत आणलें. राजमार्गानें जेथें जेथें देवदेवालयें लागलीं तेथें तेथें स्वारीचा हत्ती उभा राहावा, व भावी छत्रपतींच्या हातून पेशव्यानीं देवाला नारळ व दक्षिणा अर्पण करावी. अशा डौलानें ती मिरवणूक रगमहाला-समोर आली व भावी छत्रपति हत्तीवरून खालीं उतरले, तेव्हा अनेक सुंदर सुवासिनी राजस्त्रियानीं त्याना सोन्यारुप्याच्या पंचारत्या ओंवाळल्या, व त्यांच्या राज्यारोहणात काहीं विघ्न येऊ नये म्हणून निंबाचा पाला त्याच्या-वरून ओंवाळून टाकला.

राजवाड्यात प्रवेश करताच भावी छत्रपतींना प्रथम देवघरात नेण्यांत आलें. तेथें त्यानीं प्रथम भोंसल्याच्या कुलस्वामिनीला श्रीफळ ठेवून आपलें बाळपणापासून आजवर रक्षण करून गुराख्यापासून छत्रपतीच्या श्रेष्ठतम पदाला आणून पोंचविल्याबद्दल कृतज्ञतापूर्वक साष्टांग नमस्कार केला. नंतर पवित्रोदकाचें अभ्यगस्नान त्याना सुवासिनींकडून घालण्यांत आलें, व लगेच

त्यांना पेशव्यांनीं श्रीशिवाजीमहाराजानीं राज्याभिषेक करून घेतला होता तसा विधिपूर्वक राज्याभिषेक करवून त्याना सिंहासनावर बसविलें. महाराजांचें मूळचें नाव जरी राजाराम असे होतें, तरी ताराबाई तें आपल्या पतीचें नांव असल्यानें त्याना रामराजा असें म्हणत असे. तेंच नाव सर्वांना मान्य होऊन गोब्राह्मणप्रतिपालक क्षत्रिय कुलावतंस श्रीमान् छत्रपति रामराजा महाराज याच्या नांवाची द्वाही नगरात फिरवून हत्तीवरून साखर वाटण्यांत आली.

मराठशाहीच्या इतिहासात हा मगल दिवस उगवण्याला ज्याचे ज्यांचे श्रम कारणीभूत झाले, त्या त्या सर्वांचा महाराजाच्या हस्तें जाहीर दरबारात गौरव करण्यात आला. त्यात रावजी जगदाळ्याचा तर गौरव झालाच; पण त्याबरोबरच त्याच्या सौभाग्यवतीला—पुतळेलाही सौभाग्यवस्त्रालंकार देण्यात आले. रावजी व पुतळा हीं नुक्तींच मुहूर्तानें विवाहबद्ध झाल्यामुळें पुतळेला कुंकुमतिलक ललाटीं लावून राजदरबारात आनंदाने प्रवेश करता आला.

महाराजाच्या हस्तें मिळालेल्या अहेराखेरीज खास पेशव्याकडूनही त्या जोडप्याचा निराळा यथोचित सत्कार झालाच. पेशव्यानीं रावजीला आपल्या खास पथकात शिलेदार नेमून प्रशस्त इनामतही तोडून दिली.

याप्रमाणें शाहूमहाराजाच्या पश्चात् मराठी साम्राज्याची घडी पुन्हा पूर्वीपेक्षांही नीट बसली. श्रीमंत नानासाहेब पेशवे शाहूमहाराजाच्या आज्ञापत्राप्रमाणें मुखत्यारीनें राज्यकारभार हाकू लागले. छत्रपति रामराजाचें वय राज्यारोहणसमयीं सत्तावीस वर्षांचें होते, व पेशवेही त्याच वयाचे ऐन तरुण होते. पण इतक्या लहान वयात त्यानीं आपल्या पेशवाई अधिकाराचें महत्त्व इतकें वाढविलें, हा खरोखरच **पेशवाईचा मध्यान्ह** होय, असे धन्योद्गार ज्याच्या त्याच्या तोंडावाटे निघू लागले.

**इत्यलम्**

# कादंबरींतील ऐतिहासिक व्यक्तींची ओळख

**छत्रपति शाहू महाराज :** हे छत्रपति शिवाजीचे नातू व संभाजीचे पुत्र होत. संभाजीच्या वधानंतर यांना औरंगजेब बादशहानें दिल्लीला आपल्या बादशाही कैदेंत नेऊन ठेवलें. त्यांचें सर्व बाळपण बादशाही जनानखान्यांतील विलासी वातावरणांत गेलें. मराठशाहींत फूट पाडण्यासाठीं त्यांना बादशहानें आपला मांडलिक मानून मराठशाहीचें राज्य करण्यासाठीं इ. स. १७०८ मध्यें दक्षिणेंत पाठविलें. तेव्हां त्यांची चुलती राणी ताराबाई राज्य करीत होती. बादशहाचा हेतु सिद्धीला गेला. ताराबाईचें व शाहूमहाराजांचें वैमनस्य आलें व ताराबाईनें कोल्हापूर एथे आपला सवता सुभा स्थापन केला. शाहू-महाराज सज्जन पण विलासी व नकर्ते होते. त्यांच्या दीर्घ कारकीर्दींत मराठ-शाहीची जी भरभराट झाली व हिंदुपदपादशाहीला जें विराट् व उज्ज्वल स्वरूप प्राप्त झालें, तो सर्व त्यांच्या कारभाऱ्याचा पराक्रम होय. उलट 'नवें करूं नये व जुनें मोडूं नये' अशा शाहूमहाराजांच्या मिळमिळीत धोरणा-मुळें पेशव्याचा नाइलाज होऊन त्यांच्या धडाडीचा व कर्तबगारीचा व्हावा तसा उपयोग होऊं शकला नाहीं. शाहूमहाराज इ. स. १७४९ मध्यें मरण पावले.

**ताराबाई :** ही छत्रपति राजारामाची राणी. राजारामाच्या पश्चात् त्याचा पुत्र दुसरा शिवाजी हा गादीवर बसला. पण तो वेडा होता. त्यामुळें सर्व राज्यकारभार ताराबाईच पाहत असे. ती अत्यंत पराक्रमी, धोरणी राज-कारणकुशल व महत्त्वाकांक्षी स्त्री होती. शाहूमहाराजांच्या सुटकेनंतर तिचें व त्यांचें पटलें नाहीं, बहुतेक सर्व कारभारी शाहूला जाऊन मिळाले; व तिचा नाइलाज झाला. तरी तिनें हिंमतीनें कोल्हापूर एथें जाऊन स्वतंत्र राज्य स्थापन केलें. तेंच सध्याचें कोल्हापूरचें राज्य होय. पण पुढें तिच्या राजकारणांतील उलाढालींमुळें तिला अखेरपावेतों सातान्याच्या किल्ल्यांत छत्रपतींच्या म्हणजे पर्यायानें पेशव्याच्या कैदेंत राहावें लागलें.

**बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे :** छत्रपति शाहू महा-राजांच्या कारकीर्दींत श्रीवर्धनकर भट घराण्यांतील बाळाजी विश्वनाथ यांच्या-

कडे पेशवाई आली. थोरले बाजीराव हे बाळाजी विश्वनाथाचे पुत्र व दुसरे पेशवे होत, व नानासाहेब हे थोरल्या बाजीरावाचे चिरंजीव. याना वयाच्या अवघ्या एकोणिसाव्या वर्षीच इ. स. १७२० साली पेशवाईपदाचा लाभ झाला. नानासाहेब लढवय्ये नव्हते तरी पहिल्या प्रतीचे राजकार्यकुशल होते.

**सकवारबाई व सगुणाबाई** : ह्या शाहूमहाराजाच्या एकंदर चार राण्यां-पैकीं दोन राण्या होत. सकवारबाई ही शिर्क्यांची माहेरवाशीण. ती फार तडफदार, दुराग्रही, महत्त्वाकांक्षी, उपद्व्यापी पण अत्यंत कोत्या व स्वार्थी विचाराची होती. शाहूमहाराजाचा विलासी व बालबोध स्वभाव, व राण्या सर्व कमी अधिक प्रमाणात भांडखोर ! त्यामुळें शाहूमहाराजाना त्यांच्या आयुष्याच्या अखेरीला शांतता कशी ती मुळींच लाभली नाहीं. तिनें शेवटीं सर्व दृष्टींनीं—विशेषतः दत्तकाच्या बाबतींत तर कहर केला. अखेर तिला शाहूमहाराजाबरोबर सती जावें लागलें.

**बाबूजी नाईक बारामतीकर** : हा पेशव्याचा अत्यंत निकटचा आप्त, व इरसाल सावकार केवळ श्रीमतीच्या व पेशव्याच्या नातलगपणाच्या जोरावर बाबूजीनें तत्कालीन मराठी राजकारणात पुष्कळच लुडबुड केली, व त्याचा पेशवाईवरही डोळा होता. शाहूमहाराज कर्जबाजारी झाले असताना अखेरीला त्याना द्रव्यसाह्याचें आमिष दाखवून पेशवाई हबकण्याचा प्रयत्न करण्यासही बाबूजीनें कमी केलें नाहीं, व पेशव्यानाही सावकारीच्या जोरावर भयंकर त्रास दिला.

**यमाजी शिवदेव** हा पंतप्रतिनिधीचा मुतालिक. हा पेशव्याशी नेहमींच विरुद्ध वागे, व सकवारबाईसारख्या पेशव्याच्या विरोधकाना सामील होऊन राज्यकारभारात नसते बखेडे सतत उत्पन्न करी

**गमाजी** : हा प्रतिनिधींचे मुतालिक यमाजी शिवदेव याचा मुलगा. मुतालिकाचे पेशव्याशीं प्रारंभापासून वैमनस्य होतें. अर्थात् ते सकवार-बाईच्या पक्षाचे होते. गमाजी हा अत्यंत क्रूर होता. तो सकवारबाईचा एक हस्तक होता.

**जगजीवनराव प्रतिनिधि** : श्रीपतराव पर्शरामपंत प्रतिनिधि हे शाहू-महाराजाच्या अष्टप्रधानांतील एक, व अत्यंत जिव्हाळ्याचे मित्र. श्रीपतराव वारल्यावर त्याचे बंधु जगजीवनराव यांना प्रतिनिधि नेमण्यात आलें.

**रामचंद्रपंत अमात्य :** हे व याचे चिरंजीव भगवतराव हे ताराबाईच्या राजवटींत वहिवाटलेले व तिच्या पक्षाचे होते. पण त्यांची स्वामिनिष्ठा राजनिष्ठेशीं विसंगत नव्हती. रामराजाला कोल्हापुरकराच्या वक्र दृष्टींतून वाचविण्यासाठीं अमात्यानीं ताराबाईच्या वतीनें अखेपावेतों पराकाष्ठा केली. किंबहुना अमात्याचें पाठबळ नसतें तर रामराजाचें रक्षण होणे शक्यच नव्हतें. अमात्य पितापुत्र मोठे राजकारणी पुरुषही होते.

**गोविंदराव चिटणीस** छत्रपतींच्या निःसीम स्वामिनिष्ठ सेवकांत चिटणिसाचें घराणें अग्रस्थानीं शोभतें. छत्रपति संभाजीनें ज्या बाळाजी आवजी चिटणिसाना हकनाहक हत्तीच्या पायाला बाधून ठार मारलें, त्याचेच गोविंदराव हे चिरंजीव. हे शात स्वभावी, राजकार्यकुशल, फर्ड्या कारकुनी बाण्याचे असे राजवटीचे एकनिष्ठ सेवक होते.

**मलिक शेटी** हा शाहूमहाराजाचा एक अत्यत विश्वासू सेवक होता. नानासाहेबाना पेशवाईवरून काढल्यावर पुन्हा पेशवे म्हणून नेमीपावेतोंच्या पत्रोपत्रीं चाललेल्या उलाढालींत मलिक शेटी विश्वासानें पत्रें व निरोप नेत आणीत होता.

**दमाजी गायकवाड** . हा बडोद्याच्या गायकवाड घराण्याचा पूर्वज. हा फार पराक्रमी पण पेशव्याशीं स्पर्धेनें वागणारा होता. शाहूच्याच कारकीर्दीत जे सरंजामदार अरेरावीने वागू लागले, त्यापैकीं हा एक.

**रघूजी भोंसले** शिवाजीच्या मदतनिसात परसोजी भोंसले हा पराक्रमी पुरुष होता. शाहू बादशाही कैदेतून सुटून आल्यावर त्याला पहिली मदत परसोजी भोंसल्याची मिळाली. छत्रपति राजारामाच्या कारकीर्दींत त्याला सेनासाहेबसुभा हा किताब मिळून नागपुराकडील सत्ता मिळाली. याच वंशातील रघूजी भोंसले हा फार पराक्रमी व शाहूच्या मर्जींतील होता. पेशव्यांशीं भोंसल्याचें कधींच पटलें नाहीं.

# कादंबरीमय पेशवाई

## आजवरच्या कादंबऱ्या

पेशवाईचें पुण्याहवाचन
पेशवाईची प्राणप्रतिष्ठा
पेशवाईचें ध्रुवदर्शन
पेशवाईचा ध्रुव ढळला?
पेशवाईचा पुनर्जन्म
पेशवाईचें पुनर्वैभव
पेशवाईचा दरारा
पेशवाईतील दुर्जन
पेशवाईतील पश्चिमदिग्विजय
पेशवाईतील धर्मसंग्राम
पेशवाईतील उत्तरदिग्विजय
पेशवाईवरील गण्डान्तर
पेशवाईचें मन्वंतर
पेशवाईचा पुनर्विकास
पेशवाईचा मध्यान्ह
[पुढील १६ वी कादंबरी]
पेशवाईचें दिव्य तेज

मुख्य विक्रेते :
**परचुरे, पुराणिक आणि मंडळी**
बुकसेलर्स व पब्लिशर्स, मुंबई नं. ४